# घरटी



लेखक

पं. महादेवशास्त्री जोशी



प्रथमावृत्ति

[ सन १९५५ ]



ज्ञानराज प्रकाशन

४२१, शनिवार पेठ, पुणें



मूल्य अडीच रुपये

प्रकाशक
सौ. **सुधा महादेव जोशी**
ज्ञानराज प्रकाशनाकरितां
४२१ शनिवार पेठ,
पुणें २

* * *

मुखपृष्ठ
**दीनानाथ दलाल**

ठसे
**मोघे अँड् सन्स्**

* * *



* * *

मुद्रक
**श्रीपाद जगन्नाथ गानू**
राजगुरु प्रेस
४०५ नारायण पेठ,
पुणें २

हा माझा आठवा कथासंग्रह आहे. एकूण नऊ कथांचा यांत समावेश आहे. यांतल्या बऱ्याच कथांची पार्श्वभूमि गोमंतक असून कांहीं कथा गोव्याबाहेरच्या पार्श्वभूमीवर आहेत. 'एका पाडीची आत्मकथा' ही 'वृषोत्सर्ग' हें धार्मिक विधान मध्यवर्ती कल्पून लिहिलेली आहे. मागच्या सर्व कथासंग्रहांचें मराठी वाचकवर्गानें जसें स्वागत केलें तसेंच तो याचेंहि करील, असा विश्वास वाटतो.

—**लेखक**

## कथानुक्रम

# घररिघी

आश्विनाचा महिना होता. दिवसाचा चौथा प्रहर होता. एकाएकीं आकाश मेघांनीं भरून आलं होतं. सूर्य झांकोळला होता. दिशा अंधारून आक्रसल्या होत्या. शरदांतला वळिवाचा पाऊस गडगडत, तडतडत पृथ्वीवर उतरला होता. पिकून पिवळीं व्हायला आलेलीं समोरचीं भातशेतं अर्ध्या तासाच्या झोडपण्यांत त्यानें आडवीं घातलीं होतीं. रानांतलीं गुरं शेपट्या उभारून घराकडे येऊं लागलीं होतीं. मांडवावरचे दोडक्यापडवळाचे वेल खालीं आले होते. अंगणाबाहेर सर्वत्र वाढलेल्या तेरड्याची अवस्था दयनीय झाली होती. जिकडून तिकडून पावसाचे फेसाळ ओहोळ उताराकडे धावत होते. बाहेर जाणं अशक्य असल्यामुळें मी पडवीवर रिकामा बसलों होतों आणि क्वचित् सरळ तर क्वचित् तिरक्या अशा पर्जन्यधारांचं नृत्य पहात राहिलों होतों. पाहतां पाहतां माझी तंद्री लागली होती.

" ऐकलंत का ? जरा मागील दारीं या. कोणाची तरी एक मुलगी भिंतोडीला येऊन उभी राहिली आहे. " बायकोच्या या आकस्मिक शब्दांनीं माझी तंद्री भंगली. मीं मान वळवून विचारलं.

" मुलगी ? कोणाची ? "

" माझ्या ओळखीची नाहीं. पण कोणी तरी ब्राह्मणाचीच आहे. तुम्ही येऊन पहा. "

बायको पुढें अन् मी मागें, अशीं दोघंहि परसदारीं गेलों. पाहतों तर एक मुलगी भिंतोडीला चिकटून उभी आहे खरी. तिच्यासमोर कौलारू पाख्याच्या पागोळ्या हारीनें धार धरून गळत आहेत आणि तिथल्या शेवाळलेल्या अंगणांत जलधारा आणि बुडबुडे यांचा नटनाच चाललेला आहे.

आम्हीं दोघांनीं आमचे चार डोळे तिच्यावर रोखले. तिनें आपल्या बदामी डोळ्यांनीं आमचा वेध घेतला. सकृद्दर्शनीं तीहि निःशब्द अन् आम्हीहि निःशब्द ! बाहेर पाण्याचा पूर अन् आमच्या अंतरांत आश्चर्याचा पूर. ती मुलगी चौदा-

पंधरा वर्षांची असावी, असं तिच्या आंगठशावरून दिसत होतं. कसलंहि आसरण न घेतां पडत्या पावसांतून ती आली होती आणि त्यामुळेंच नखशिखान्त चिंब भिजली होती. तिची नेसलेली जीर्णशी साडी तिच्या सावळ्या अंगाला चिकटून बसली होती आणि केशबंधांतून गळणारी पाण्याची धार पागोळीसारखी तिच्या नितंबावर पडत होती. पुढच्या बाजूच्या बटा तिच्या गालांवर नि गळ्यावर अभिषेक करीत होत्या. तिच्या चोळीची गांठ पक्की बसलेली होती. तिथल्या खोलगट भागांत गळ्यावरून उतरलेलं पाणी क्षणभर घोटाळत होतं आणि मग तिच्या कोंवळ्या तकतकीत पोटावरून खालच्या निऱ्यांत मुरत होतं. कुळागराच्या बाजूनें केळी–पोफळींना कांपवीत पश्चिमवारा नाचत-कुदत आला कीं त्याच्या दाबानें पागोळ्या आंतल्या अंगाला वळून तिच्यावर रोख धरीत होत्या आणि त्या सोसाट्यानें तिची काया पुनःपुन्हा शिर्‌शिर् शहारत होती. आम्ही तिच्याकडे एकटक पहात होतों; पण ती आमच्या गांवची कोणाची नसल्यामुळें बायकोलाहि तिची ओळख पटली नाहीं आणि मला तर नाहींच नाहीं.

"अग, कुणाची तूं? आलीस कुठून?" बायकोनें तिला प्रश्न केला. त्यासरशीं तिनें आमच्यावरची दृष्टि आवरून घेतली आणि पायांच्या नखावर जडवली. तिनें दुसरी कसलीहि हालचाल केली नाहीं. 'मी कुडकुडतें, मला घरांत घ्या' अशी उत्कंठाहि दर्शविली नाहीं. बायको पुन्हा पुन्हा तिला तोच प्रश्न विचारायला लागली तेव्हां मीं तिला म्हटलं.

"तूं तिला आधीं घरांत घे. ती गारठली आहे अन् बावरलीहि असेल."

"चल ग, घरांत ये" म्हणतांच ती मुकाट्यानें आंत आली. वासरींत उभी राहिली तर तिथली जमीन भिजून पाणी वाहूं लागलं. बायकोनें एक जुनं लुगडं आणून तिला नेसायला दिलं. खुंटीवरची चोळी ओढून तिच्या हातीं दिली. पण तिचे केस कोरडे झाल्यावांचून तिला कोरडं नेसायला देण्यांत कांहींच अर्थ नव्हता. बायकोनें दांडीवरचा एक चुरचुरीत पंचा तिच्या अंगावर टाकून तिला केस कोरडे करायला सांगितलं. तिनें सांगितल्याप्रमाणें सगळं मुकाट्यानें केलं. एवढ्या अवधींत तिची एकदाहि वाचा उमटली नाहीं. 'तिला घोटभर चहा करून पाज अन् मग सगळी चौकशी कर' म्हणून मीं बायकोला म्हटलं अन् पुन्हां पडवीवर येऊन बसलों. ती मुलगी माझ्या डोळ्यांआड झाली; पण तिच्याविषयींचा विचार मात्र मनाआड झाला नाहीं.

एवढ्या अवधींत पाऊस ओसरला. आकाश निवळलं. मांडवावरच्या दोडकीच्या फुलांनीं पावसाला नमवलेल्या माना वर उचलल्या. मी बाहेर पडून जरा शेतावर नजर टाकावी असा विचार करूं लागलों. एखाद्या कुणग्यांत जर खूपच पाणी सांठलं असेल तर तें निचरून जाण्यासाठीं मेरांना खांवटीं करणं भाग होतं. पण एवढ्यांत दोघे गृहस्थ आमच्या पडवीवर चढले. त्यांपैकीं एक होता आमचाच गांवकरी अन् दुसरा शेजारच्याच गांवचा गजा जोशी. त्यानें बसायच्या पूर्वीच मला प्रश्न केला.

" इथं एखादी मुलगी आली आहे का? सुमारें चौदापंधरा वर्षांची, सांवळ्या रंगाची, आंखूड नाकाची, बदामी डोळ्यांची अन् जुनेर नेसलेली..."

" अरे हो, पण! आधीं बैस तर खरा. मुलगी आली आहे. घरांत बसली आहे. मघांच्या पावसांत भिजत, कुडकुडत आली अन् परसदारीं भिंतोडीला उभी राहिली. विचारलं तर बोलत नाहीं. कोणाची म्हटलं तर सांगत नाहीं."

" तुला तो नाचणवाडीचा शिवराम भाटीकर ठाऊक आहे का?"

" आहे माहीत. गेल्या महिन्यांतच आला होता आमच्याकडे. भात विकायचं आहे का विचारीत होता."

" त्याचीच मुलगी. नांव चिमा. तो रांडेचा एक अर्बुज तर बायको सात अर्बुज. खंडीभर पोरं मात्र झालीं आहेत. पोसायची कुवत नाहीं नि राखायची अक्कल नाहीं."

" पण तुला कुठें गवसली ही?"

" कुठें अन् काय! ती एक कथाच आहे. गेले पंधरा दिवस ती घर सोडून वाटेल तिथें भटकते. आज या गांवांत तर उद्या त्या गांवांत. दुपारचं जेवण एकाच्या घरीं तर वस्ती दुसऱ्याच्या घरीं. वयावरची मुलगी अन् बाप खुशाल घोरत पडला आहे."

" कमाल आहे बुवा पोरीपुढें!" मीं म्हटलं.

" ही कसली कमाल? कमाल ती याच्यापुढेंच आहे. आज सकाळचीच गोष्ट. मी वाळपईहून परत येत होतों. वेळसईची तर उतरलों, वरचा चढाव चढलों आणि तिथून खालच्या उतारावर नजर टाकली, तर काय? तिथल्या नाल्यावर एक लहानसा पूल आहे. त्याच्या कँठड्यावर दोन विशीपंचविशींतले

पोरगे अन् त्या दोघांच्यामध्यें एक मुलगी. ते हंसताहेत, खिदळताहेत, त्या मुलीची मस्करी करताहेत. मुलगी हंसते, मुरडते अन् त्या पोरांना उत्तेजन देते. असं सगळं दृश्य !

मी चाट पडलों तें पाहून. म्हटलं हें कांहीं तरी चावट प्रकरण आहे. ते तिला कुठें तरी फूस लावून नेण्याच्या विचारांत होते, तिला कांहीं तरी आमिष दाखवीत होते आणि ती हुरळलेली पोरगी त्यांच्या बेताला मान तुकवण्याच्या बेतांत होती असं मला दिसलं. मी झपाझप पावलं टाकीत तो उतार उतरून पुलावर आलों. मला त्यांनीं दुरूनच पाहिलं. ते जरा तिच्यापासून बाजूला झाले. मीं जवळ जाऊन त्यांना हटकलं.

"काय रे ! ही मुलगी कोणाची ?"

माझ्या शब्दांतला तिखटपणा जाणून ते जरा कचरले. त्यांतला एक जण म्हणाला, "आम्हाला काय ठाऊक ! रस्त्यानं चालली होती एकटीच. आम्ही तिला विचारीत होतों कीं तुला कुठं जायचं आहे ? ती म्हणाली कीं, वाळपईला. आम्हीं म्हटलं, एकटी जातेस ती आमच्या सोबतीनें चल."

"अस्सं, अस्सं ! इतक्या जवळून सोबत करावी लागते वाटतं ?" ते ओशाळलेले दिसले तेव्हां मीं त्यांना म्हटलं, 'चालू लागा आपल्या रस्त्यानं.' ते निघाले तर ही चालली कीं बया त्यांच्या मागून. मीं पुढें होऊन तिला अडवली. मीं मागें तिला एकदां पाहिली होती; त्यावरून मला ती शिवराम भाटीकराची मुलगी असा अंदाज झाला. तिला विचारून मीं तो खरा करून घेतला. 'चाललीस कुठें ?' म्हणून दरडावलें तर गुलुमुलु. वाटलं कीं दोन तोंडांत वाजवाव्या. पण म्हटलं, पोरगी दुसऱ्याची; आपल्याला काय अधिकार तिला हात लावायचा !

'चल माझ्याबरोबर' म्हटलं तर प्रथम लागली कां कूं करायला. मग मात्र तिचं मनगट पकडावं लागलं. माझे वटारलेले डोळे पाहून मग सरळ निघाली. तिला घरीं आणली. जेवायला घातलं. पण एवढयानं जबाबदारी कुठें संपते ! घरीं नेऊन बापाच्या स्वाधीन करावी म्हणजे मोकळा झालों, अशा विचारानें तिला घेऊन निघालों. वाटेंत या गोपाळच्या घरीं गेलों. त्याला एक निरोप होता तो सांगितला. त्यानें पाळं पुढें केलं म्हणून तंबाकू खाल्ली. आतां उठावं म्हणून

बाहेर येतों तर आंगणांत मुलगी आहे कुठें ! माझ्या डोळ्यांतलं काजळ चोरून पसार ! म्हटलं, ‘ चल बाबा माझ्याबरोबर जरासा. या लावसटीला शोधून काढूं. ’ निघायचा विचार करतों एवढयांत धो धो पाऊस सुरू झाला. दडक ओसरेपर्यंत थांबणंच भाग पडलं. मग निघालों. वाटेंत भेटली एक कुळवाडीण. तिनें सांगितलं कीं, एक अनोळखी मुलगी तुमच्या घराच्या दिशेनें पळत गेली आहे. म्हणून हा इथें आलों... ”

चिमाविषयीं मला जिज्ञासा होती ती अपेक्षेच्या बाहेर पूर्ण झाली. वाटलं कीं मुलगी वाह्यात आहे. हिला कोणीं आवरलं नाहीं, वळण लावलं नाहीं, तर ही पुढें आईबापांच्या नांवाला काळोखी लावील आणि स्वतःच्या आयुष्याचीहि नासाडी करून घेईल. मीं गोपाळ जोशाला म्हटलं.

“ पुढें काय करणार आतां ! ”

“ तिला बाहेर बोलव. मी तिला बापाकडे पोंचती करणार आहें. तिच्या बापालाहि चार शब्द सुनावणार आहें. ”

मी उठलों आणि घरांत गेलों. बायकोनें चुलीवर चहाचं आधण ठेवलं होतं अन् चिमा चुलीपुढें हातपाय शेकीत बसली होती.

“ काय ग ! तुझं नांव चिमा ना ? ”

तिनें होकारार्थी मान हालविली.

“ तो गोपाळ जोशी बाहेर येऊन बसला आहे. तुला दिवसा उजवडीं घरीं पोंचवायचं म्हणतो. चहा घे अन् बाहेर ये. ”

तिनें लगेच माझ्याकडून दृष्टि वळवली आणि बायको मोठ्या डब्यांतली साखर बारक्या डब्यांत काढीत होती तिजकडे लावली.

“ काकी ! माझ्याच्यानं आतां उठवत नाहीं. गारठून हुडहुडी भरली आहे मला. मी आजची रात्र तुमच्याकडे रहातें. उद्या जाईन. हं ऽ ! राहूं ना ? राहूंना काकी ? उद्यां नक्की जाईन. ”

हा तिचा पवित्रा अगदींच निराळा होता. तिनें आपल्या जातीला कौल लावला होता. ‘ काकी ’ म्हटलं होतं, तोंड वेंगाडलं होतं. आणखी काय हवं ! बायको मला म्हणाली.

“ मुलगी कोणाची तें कळलं ना ? मग एवढं गयावया करते तर राहूं दे

आजची रात्र. उद्यां नेऊन पोंचवा. नाहीं तर तिच्या बापालाच निरोप धाडा. येईल अन् घेऊन जाईल. "

बायकोनेंच तिला आसरा दिल्यावर पुढें काय बोलायचं ! मी बाहेर येऊन गोपाळ जोशाला सांगितलं. ' तूं जा घरीं. मी उद्यां पोंचवतों तिला. पावसानें गारठली आहे तो. उठवत नाहीं म्हणते.' गोपाळ जोशी ' बरं ' म्हणून निघून गेला. मी उठून माझ्या कामाला लागलों. गोठ्यांत जाऊन गुरांचं ठाकठोक पाहिलं. माळ्यावरचा पेंढा उपसून त्यांच्या पुढ्यांत थोडासा टाकला. मग पन्हळीवर जाऊन हातपाय धुतले. येतांना तिथल्याच गुलबाक्षीचीं फुलं तोडून धुपारतीसाठीं आणलीं अन् कातरवेळीं घरांत येऊन धोतर पांघरून देवापुढें संध्येला बसलों. मुलांनीं ' शुभं करोति ' सुरू केली आणि एका दमांत ती संपवून तीं घरांत पळालीं. बायको चुलीशीं बसून स्वैंपाक करीत होती आणि चिमा तिथेंच ठाण मांडून बसली होती. दोघींचीं प्रश्नोत्तरं बसल्या जागेवरून मला ऐकायला येत होतीं.

" काय ग, तुला भावंडं किती ? "

" भावंडं होय ! मोजलींच पाहिजेत. थांब हं ! मी सर्वांत मोठी. माझ्या मागचा प्रभ्या. त्याच्या मागचा दिनू. त्याच्या मागची गंगा. तिच्या मागचा दामू. दोन वर्षांची सुंद्री. अन् सहा महिन्याची तान्ही गोदी. म्हणजे किती झालीं ... ? "

चिमा हसली आणि तिच्याबरोबर बायकोहि. मीहि इकडे आचमन घेत होतों तो हात थांबवून हसलों.

" एवढ्या मुलांचं उरकतं बरं ग तुझ्या आईला ? "

" अगे काकी ! उरकायचं काय ? अन् तिला कशाला उरकायला हवं ! मला काय खारांत का घालायची आहे ! चिमे, दामूचं ढुंगण धू. चिमे, सुंद्रीला फिरवून आण. चिमे, गोदीला पिठी घाल. अन् ही ? हिला जेवल्यावर उठवत नाहीं. तिथेंच हातावर पाणी घालील, गोदीला पदराखालीं घेऊन आडवी होईल, कीं डाराडुर. उष्टीं तिथेंच लोळताहेत. मागील दारांतून कावळे आंत शिरून पानं उस्कटताहेत. असा कारभार सगळा. गांवांतलीं लोकं तिला काय म्हणतात सांगूं ?...डुकरीण. "

" वडलांना बरं मानवतं हें ?"

" अगे, त्या आईचा तो नवरा."

मी बसलों होतों तिथूनच त्या महामायेला हात जोडले. कार्टी विजापात्र खरी. आईबद्दल प्रेम नाहीं. बापाबद्दल आदराचा लेश नाहीं. भावंडं मोजायला बोटं घालते. एवढ्यांत बायकोच्या पळींतली फोडणी पातेल्यांत चुर्र वाजली. क्षणभर थांबलेली तिची रसवंती लगेच सुरू झाली.

" आः ऽ ऽ ! किती छान वास आला फोडणीचा ! केळ्याची भाजी केली आहेस ना ?"

" होय. तुमच्या घरीं नाहीं वाटतं करीत ?"

" आमच्या घरीं भाज्या 'बोटमुळां'च्या. कुळागरांत केळी होत्या त्या मेल्या. पोफळी मरायला आल्या आहेत. बाप कधीं शिंपायला जायचाच नाहीं. त्याचं सदाच आंग किसकिसतं अन् कणकणतं. आम्हांला म्हणतो, 'पोरांनो, चला शिंपून या !' आम्ही पोरं काय शिंपडणार आमचं मढं ? हा आपला बसला आहे पडवीवर विड्या फुंकीत. समोर ही कोलतांची रास. एक विझलं कीं दुसरं. गांवांतले लोक आमच्या तोंडावर म्हणतात कीं, 'गाढवानं सोन्यासारखं ठिकाण आळसानं पाड घातलंन्.' "

" अग, लोकांनीं म्हटलं म्हणून आपण म्हणूं नये तसं." बायको तिला सदुपदेश करूं लागली.

" नसतं म्हटलं. पण तो आम्हाला वेळीं अवेळीं बदडतो. त्याला एकच गोष्ट चांगली येते. उठ सोट्या घे पाट—"

" ठिकाणांत उत्पन्न नाहीं तर जेवतां कशीं तुम्ही इतकीं माणसं ?"

" कुठलीं जेवतों म्हणतेस तूं काकी ! आठ आठ दिवस नुसतीं पेजेवर असतों आम्ही. अशी आग पडते म्हणतेस पोटांत ! वाटतं कीं आईलाच चावून खावी. बापालाच उभा गिळावा."

" शी ग !"

" शी काय ! तुला दुसरी अंदरकी बात सांगतें. चार आठ दिवसांनीं कधींतरी भात शिजतो आमच्या घरांत. पण तो आमच्यासाठीं नव्हे. आम्हाला नाचण्यांची भाकरी, कधीं वऱ्यांचे तांदूळ अन् वर पसाभर तांदूळ घालून केलेलं पातेलंभर

आटवल. दुपारीं तसं रात्रीं. आम्हाला झोपवून मग आई भात शिजविते. अन् दोघं बसून प्रहर रात्रीं तो जेवतात. मी सगळं पहातें हें. चांगल्या ढेकरी देत उठतात कीं मग आढारलीं एका हांतरुणावर शेजारीं शेजारीं. "

" चल चावट कुठली. असं बोलूं नये. "

" काय झालं त्यांत ! मला सगळं माहिती आहे. जीव विटून गेला माझा. दिवसभर मी मरमर मरायचं अन् खायचं काय, तर आईच्या गाळी अन् बापाचा मार. पळालें झालं एक दिवस घरांतून. गेले पंधरा दिवस मी सारखी भटकतें. प्रकृति सुधारली बघ माझी तेवढ्यानेंच. जिथें गेलें तिथें शिळंपाकं का असेना ; पण पोटभर जेवायला मिळालं. पण कोणी टिकूं देईल तर ना ! जो तो म्हणतो. ' घरीं चल ; आमच्याकडे राहूं नको. चल मी तुला पोंचवतों. ' सगळे मेले मला त्या घरच्या उकिरड्यांत नेऊन घालायला बघायचे. काय भीक लागली असती यांना मला चार दिवस जेवायला घातलं असतं तर ! "

" लोकांना वाटतं, कीं तूं अशी भटकत राहिलीस तर बिघडून जाशील. आजच सकाळीं त्या कुठल्या तरण्याताठ्या पोरांबरोबर चालली होतीस ना ? "

" मी कुठें चाललें होतें ? तेच आले माझ्या मागून. मला म्हणाले, ' आम्ही तुला सोबत करतों. ' मीं म्हटलं, ' बरं झालं. ' मला गंमत वाटली त्यांच्याबरोबर जायला ! माझी त्यांना कित्ती कित्ती दया वाटली. सगळ्यांनीं मला हिडिसफिडिस केलं ; पण ते किती गोड बोलले माझ्याशीं —"

" अगदीं मूर्ख आहेस चिमा तूं. शहाणपण मात्र सांगतेस ! आज गजा जोशी तुला भेटला नसता तर—अशी कीर्ति करून ठेवलीस तर उद्यां कोणी पत्करायचा नाहीं हो तुला. "

" मग काय करूं तर ? तूं घालतेस मला जेवायला दोन्ही वेळां पोटभर ? तुझ्या घरीं खूप आहे. भाताचा तटा भरलेला आहे. नाचण्यांच्या मुड्या बांधलेल्या आहेत. शाकभाजीसुद्धा आहे. या बघ दांडीवर कांद्यांच्या माळा लटकतायत्. आमच्याकडे कोणाला झीट आली तर नाकाशीं धरायलासुद्धा कांदा मिळायचा नाहीं. तूं घाल मला जेवायला. मग बघ तुझ्या अर्ध्या वचनांत वागतें. कोणाकडे डोळा उचलून बघितलं तर थोबाडींत मार माझ्या. "

यावर बायको काय बोलणार ! चिमाचा सवाल सरळ होता. तिला कोरडा उपदेश नको होता. ती पुढचा पोंच धरून बोलत नव्हती. तिची दृष्टि दूरवर जाऊं शकत नव्हती. तिला तात्कालिक रोगांतून तात्कालिक सुटका हवी होती. आंतून पेटलेली भूक. वरून आईबापांचा जाच. या दोन्ही आपत्ति तिला सोसतां येत नव्हत्या. बापाची सदाची मरगळ ती पहात होती. आईचा आचरटपणा तिला भोंवत होता. आणि दोघांचं आपस्वार्थी खोटेंपण तिच्या अनुभवाला येत होतं. तिला कोणीं मायेचा ओलावा दाखवलेला नव्हता. आपल्या तोंडचा घांस काढून तिच्या तोंडीं कोणीं घातलेला नव्हता. तिला कोणीं भक्तिप्रेमाच्या पाशांनीं बांधलेलंच नव्हतं. त्यामुळें मुळांतच चपळ, अवखळ असलेली चिमा त्या पोखरलेल्या, ढासळलेल्या घरांतून सटकली होती. मुक्तच होती ती अतिमुक्त झाली होती. तिला त्याबद्दल लाज नव्हती. तिला कोणाची भीड नव्हती. जें पाहिलं, अनुभवलं तें रोखठोक शब्दांत सांगत होती ती.

मीं मनांत म्हटलं, ही मुलगी म्हणजे चूड आहे. आजची वस्ती राहील तेवढी बस्स ! सकाळीं उठतांच मीं माझ्या गड्याला तिच्या बापाकडे पाठवला. प्रहर दिवसाच्या सुमाराला बाप आला आणि पडवीवर बसला. त्याचं सगळं दैन्य-दारिद्र्य त्याच्या चर्येवर दिसून पडत होतं. त्याचा आळशीपणा, त्याचा आचरटपणा त्याच्या धोतरावर, सदऱ्यावर, डोक्याला टापशीसारखं बांधलेल्या उपरण्यावर, पुटापुटांनीं चढला होता. मूर्खपणा आणि अहंकार यांचं एक चमत्कारिक मिश्रण त्याच्या डोळ्यांत प्रतीत होत होतं. कपाळपट्टी उंच अन् डोळे खोल, आंगकाठी सडसडीत अन् उंचाडी मान, गोऱ्या तोंडावर सूक्ष्मसे काळसर तांबूस ठिपके, हा त्याचा देहाकार मला अप्रियच वाटला. कदाचित् गेल्या रात्रीं चिमानें त्याचं जें स्वभाववर्णन केलं त्यामुळेंहि ही अप्रीति निर्माण झाली असेल.

त्या दिवशीं आमच्याकडे ललितापंचमीची पूजा होती. ब्राह्मण जेवायला यायचा होता. आमची बायको सकाळींच स्नान करून स्वैंपाकघरांत गेली होती. मुगांचं पुरण तयार करून तिनें त्याचे उंडे बनवून ठेवले होते आणि ते ती तांदुळाच्या पातळ पिठांत बुडवून तळून काढणार होती. चिमा हें सगळं पहात होती. तिच्या जिभेला केव्हांचं पाणी सुटलं होतं. ते शकुनउंडे तळून निघतां निघतां मानासिक क्रियेनें तिच्या पोटांत जात होते. ती स्वैंपाकघरांतून हालायला तयार नव्हती. तिच्या नशिबानेंच जणूं आज आमच्या घरीं गोड धोड होत होतं.

एवढ्यांत चिमानें पडवीवर बसलेल्या बापाचं खाकरणं ऐकलं. ‘ आला काळ. ’ ती म्हणाली. ‘ कोण ग ? ’ बायकोनें विचारलं. ‘ माझा बाप. ’ चिमाचं उत्तर. ‘ येऊं दे; बरं झालं. ’ बायकोचं प्रत्युत्तर. ‘ म्हणजे चिमाची एकदा पीडा जाऊं दे, असंच ना ? ’ चिमाचा सवाल. ‘ हो तसंच. ’ बायकोचा त्रासिकपणाचा उद्गार.

“ काकी, तुझे शकुनउंडे किती छान होणार आहेत !... मला जेवायला घातल्याशिवाय पाठवूं नकोस हं ऽ ! माझी आस्ता राहील बघ. ”

“ बरं बरं, जेवूनच जा हो ! ”

मीं हा सगळा संवाद माजघरांतूनच ऐकला होता. त्यामुळें मला कांहीं सांगावं लागलं नाहीं. बाहेर जाऊन मीं शिवराम भाटीकराला म्हटलं. ‘ हें बघ, आज आमच्याकडे आहे ललितापंचमी. आयता ब्राह्मण आला आहेस. तेव्हां दुपारीं जेव अन् मग मुलीला घेऊन जा. ’

शिवराम आढेवेढे घेईल अशी माझी कल्पना होती. पण त्यानें तसं कांहीं केलं नाहीं. चिमाच केवळ बुभुक्षित नव्हती; तर तोसुद्धा तसाच होता. आंतल्या तळणाचा वास त्याच्यासुद्धा नाकावर आलाच होता. शिवराम मला एकापरी गरीब, भाबडाच वाटला. पण त्यानें दुपारीं पानावर बसल्यावर आपल्या स्वभावाची चुणूक दाखविली. पंगतींत पाण्याचा तांब्या ठेवायला चिमा बाहेर आली त्या वेळीं तिच्यावर डोळे वटारून त्यानें म्हटलं.

“ झालं का भटकून पुरे ? थांब तूं; घरीं ये. म्हणजे तूं आहेस अन् मी आहें.”

त्यावर मीं म्हटलं. “ जेवायच्या वेळेला कांहीं बोलूं नको बाबा. ”

तो दबकला. मग जेवण होईपर्यंत कांहीं बोलला नाहीं. चिमा वास्तविक समोरच्या मुलांच्या पंगतींत जेवायला बसायची. पण तिनें आपलं पान स्वैंपाक-घरांतच मांडायला लावलं. सगळे पदार्थ ती मोठ्या चवीनें जेवली. खरोखर तिचा त्या वेळीं फोटोच घ्यायला हवा होता. चार-पांच शकुनउंडे तुपांत घोळवून तिनें पहिल्या सपाट्याला उठवले. पुन्हा बायको तिच्या पानांत दोन वाढायला लागली तर तिनें म्हटलं.

“ परातींत सात-आठ आहेत तेवढे सगळे वाढ मला.

" एकदम नको. हे संपले कीं पुन्हां वाढीन. तुला हवे तितके खा. खूप केले आहेत मीं. "

चिमानें त्या दिवशीं खाण्याचा कहर केला. उंट पाणी एकदमच भरून घेतो तसं तिनें अन्न भरून घेतलं. ती आतां दुष्काळांत जाणार होती आणि त्यासाठीं दोन तोन दिवसांचं जणूं एकदाच जेवून घेत होती. बायकोला वाटलं कीं, ही पानावरच उलटून घालणार. तिला एकापरी घृणा आली, एकापरी दया आली. पानाशेजारीं हात टिपतांना तिनें बायकोला म्हटलं. ' काकी खूप जेवलें. अगदीं इथें, गळ्याला येऊन भिडेपर्यंत. मला तूं अधाशी म्हटलं असशील, होय ना ? ' आणि टचकन् तिच्या डोळ्यांत पाणी आलं. बायको त्यावर कांहीं बोलली नाहीं. कारण ती जें म्हणणार होती तें चिमानें स्वतःच म्हणून घेतलं होतं.

शिवराम भाटीकरानेंहि बाहेर माझ्या पंगतीला तीच अवस्था केली. बायको पसांपायलीचं नव्हे; तर खांडीपिंडीचं करणारी, म्हणूनच त्या दिवशीं तिची अब्रू बचावली. जेवल्यावर लगेच त्याला निघणंच शक्य नव्हतं. तो आंचवून आला आणि पडवीवर दोन तास सुस्तपणें झोपला. तो उठल्यावर बायकोनें चिमाला स्वतःची साडी चोळी नेसायला लावलं आणि विचारलं. ' आज तरी सरळ जाशील ना घरीं ? '

" काकी ! मी पळपुटी, निलाजरी ठरलेंच आहें. वाजती ढोल झालेंच आहें. मला पळायचं असतं तर एवढा वेळ तुला दिसलेंच नसतें इथें. पण मी आज तरी तसं करायची नाही. तुला अपेश द्यायची नाहीं. तूं मला गोडधोड वाढलं आहेस. मी अगदीं दावं लावलेल्या वासरासारखी घरीं जातें. तूं काळजी करूं नको. "

' आतां काय म्हणावं या पोरीला ! ' बायको आंतल्या आंत पुटपुटली. तिनें आपलं बासन सोडून एक खण तिच्यापुढें केला.

" काकी, कशाला देतेस तूं हा ? तो मला का मिळायचा आहे ! तो आईच्या डोंबल्यावर पडायचा. "

" बरं, बरं ! शहाणपणा नको करूं. दिलेलं मुकाट्यानें घ्यावं. " म्हणून बायकोनें त्याची तिकोनी घडी तिच्या हातांत कोंबली. मग बाहेर येऊन शिवरामाला म्हटलं. ' पोरगी जरा वेगळी आहे. तिला शहाणपणानें वागवून घ्या. शक्य तर येत्या मार्गेसरांत तिचं लग्न करून टाका. उगाच मार बडव करूं नका. '

“ तें कांहीं सांगूं नको तूं. सगळा वाह्यातपणा बाहेर काढतों मी तिचा. चांभाराच्या देवाला--”

मीं चिमाकडे पाहिलं. पण तिच्या डोळ्यांत भयाऐवजीं निसुकपणाचीच छटा दिसली. ती बापाच्या पाठोपाठ चालूं लागली. शेताच्या बांधावरून उजवीकडे वळतांना तिनें आमच्यावर एक दृष्टि टाकली. मला वाटलं होतं कीं ती जातांना रडेल. रडली असती तर आमच्या मायेनें रडली म्हणून आम्हांला आमचं मोठेपण वाटलं असतं. पण ती जितक्या उदासपणें आमच्या पागोळींत उभी राहिली तितक्याच उदासपणें निघून गेली.

त्या रात्रीं मला तिचंच स्वप्न पडलं. चिमाच्या पाठीवर, पोटऱ्यांवर माराचे वळ उठले आहेत आणि ती आमच्यासमोर आपलं आंग उघडं करून आम्हांला म्हणते आहे. “ पहा, पहा, हा माझ्या बापाचा पराक्रम ! मी पळून गेलें म्हणून तुम्ही माझा तिरस्कार करीत होतां नाहीं का......”

आमचं सगळं घर मग भातकापणीच्या उद्योगांत गढून गेलं. सगळं भात मळून घरांत घालीपर्यंत दिवाळी जाऊन कार्तिकी एकादशी उजाडली. मग आलं सुपारीचं पाडप. ती पाडणं, घरांत आणणं, सोलणं, उकडणं, वाळवणं, म्हणजे दोन महिन्यांचा अखंड यज्ञच. त्या कामाच्या सपाट्यांत आम्ही आम्हालाच विसरलों होतों; तिथें चिमाची कुठली आठवण ! पण आम्ही विसरलों तरी चिमा आम्हांला विसरली नव्हती.

मार्गशीर्षाच्या पहिल्या पक्षांत एका सकाळीं ती सूर्याच्या किरणांबरोबरच आमच्या घरीं दाखल झाली. मी पडवीवर रात्रीं सोललेल्या सुपारीचीं सालं भरीत होतों आणि बायको सडा टाकीत होती. तिच्यापुढें उभी राहून चिमा घाबऱ्या-घुबऱ्या म्हणाली. ‘ काकी, मला आधीं कुठें तरी लपव. ’

आम्हां दोघांचेहि हात एकदम स्तंभित झाले. तिला चांगलीच धाप लागली होती. ऐन थंडींत सकाळच्या रामपारीं ती नखशिखांत घामानें न्हाली होती. तिचं आंखूड पण फुललेलं नाक लाल झालं होतं. गालहि तांबडे झाले होते. ती चालत आली नव्हती; तर धावत, झेपावत आली होती. तिच्या डोळ्यांत भय भरलं होतं आणि ती पुनःपुन्हा मागें वळून पहात होती.

“ पुन्हा आलीस ना पळून ? ” बायकोनें नाखुषीनें तिला विचारलं.

" होय, आलें. जिवाच्या आकांताला आलें. मला आधीं लग्न. तो आत्तां येईल."

" अग, तो कोण ?"

" बाप !"

" मग येऊं दे. बाप म्हणजे कोणी वाघ नव्हे ना ?"

" वाघाच्या पुढचा. मला विकायला निघाला आहे तो. या काकाएवढ्या माणसाला. काळा डोम आहे तो माणूस. एका डोळ्यांत फूल पडलं आहे बुबुळभर. बायको मेली आहे त्याची अन् खंडीभर पोरांची फटावळ आहे. कुठला आहे तिकडचा बांद्या-सावंतवाडीकडचा. नोटांचं पुडकं घेऊन आला आहे. रात्रीं बापानं त्या मोजून घेतल्या. सकाळीं निघायचं ठरलं. त्याच्या गांवीं जाऊन 'सुमुहूर्त सावधान' करायचं. रात्रभर डोळ्याला डोळा लागला नाहीं माझा. वाटलं कीं, पडवीवर झोपलेल्या त्या शुक्राचार्याला नखांनीं फाडून काढावा. पण...पण... नाहीं जमलं तें. मग पहांटे हळूच मागच्या दारांतून निसटलें अन् धूम ठोकली. वाट पाहिली नाहीं, आडवाट पाहिली नाहीं. सरळ इथें आलें..."

" अग पण आमच्यामागें तुझी कां पीडा ही ! इथें कां आलीस सांसणायला ?" बायको तुसडेपणें म्हणाली.

" काकी, रागावलीस माझ्यावर ? तुझ्यावर विश्वास होता अन् अन्य कुण्णा कुण्णावर नव्हता म्हणून तुझ्याकडे आलें. तूं त्या दिवशीं मला पावसांतून घरांत घेतलंस. तुझं लुगडं मला नेसायला दिलंस. चुलीशीं बसवून चहा पाजलास. इतर अनेक घरीं मी गेलें; पण सगळ्यांनीं 'हड् हड्' करून, मी जात नाहीं असं पाहून, माझ्या पुढ्यांत गोळाभर अन्न वाढलं. केवळ त्यांच्या अन्नावर माझी दृष्ट पडूं नये म्हणून. पण तूं तसं केलं नाहींस. तुझे शकुनउंडे अजून माझ्या काळजांत आहेत. जातांना मला खण दिलास. जणूं या घरची मी माहेरवाशीणच होतें....म्हणून इथें धाव घेतली."

" मग मीं दार उघडलं तो अन्यायच केला म्हणायचा."

" तसं म्हण, हवं तें म्हण. पण मी घरांत जाऊन लपणार आहें. मी इथें आल्याचं सांग मात्र बापाला ! तुझ्यावर हत्याच घालीन."

आणि ती एकदम घरांत घुसली. आम्ही दोघे बघतच राहिलों. तोंच धिटाई. तोच सरळपणा. तीच मुलीच्या जातीला न शोभणारी धटिंगण वृत्ति. पण या वेळीं माझें मन तिला निखंदायला तयार होईना. तिच्यावर प्रसंगच तसा होता. ती एका वाघाच्या तोंडीं पडत होती आणि म्हणूनच जिथें विश्वास वाटला, तिथें जीव लपवायला आली होती. पुढचं सगळं आमच्या सारासारबुद्धीवर सोंपवून ती घरांत घुसली होती.

" आतां काय करायचं ? " मीं बायकोला म्हटलं.

" दुसरं कांहीं करायचं नाहीं. बाप आला कीं बखोटीला धरून त्याच्यापुढें उभी करायची. म्हणायचं, कीं ही तुझी मुलगी. वीक नाहींतर विहिरींत लोट. "

" तिचा विश्वासघात् करायचा म्हणतेस ? "

" मग काय जन्मभर तिचं लोढणं गळ्यांत बांधून घेणार ? अन् मुलगी अशी निस्संग ! उद्यां इथूनहि पळाली म्हणजे झालांत कीं नाहीं अपेशाचे धनी... "

" हं...खरं आहे तुझं म्हणणं. "

" घटकाभर लपवलीत म्हणून काय तिला कायमची लपवतां येईल ? आज ना उद्यां तिच्या बापाला कळेलच. मग त्यानें फिर्याद केली म्हणजे ! अमक्या तमक्यानें माझी मुलगी पळवून नेली...."

" त्याचं काय तोंड लागलं आहे फिर्याद करायचं ! उलट त्याला वाटेल, एका पोरीचा भार कमी झाला. "

" मग काय जांवयी शोधायला जुतीं झिजवणार ! स्वतःचीं मुलंबाळं आहेत आपल्याला. अन् उद्यां तिचा बाप पैसे मागायला आला म्हणजे ! ' तो अमका तमका इतकी रक्कम देऊन माझ्या मुलीला नेत होता. तुम्ही आड आलांत त्याच्या. तेव्हां आतां तुम्हीच द्या तेवढे रुपये. ' त्याचं नुकसान होणार या व्यवहारांत. मग तो बरा गप्प बसेल ! विकत श्राद्ध घेऊन हें सव्यापसव्य सांगितलं आहे कोणीं ! "

" हो, तेंहि खरं. "

हेंहि खरं, तेंहि खरं, असंच चाललं होतं आमचं. मन सांगत होतं, ' तिला दवडूं नको. ' बुद्धि सांगत होती, ' हें तुझ्या गळ्याशीं येईल. ' नात्याची नव्हे; पात्याची नव्हे; अशा एका मुलीनें निष्कारण आमच्या अंतरांत वादळ उठवलं

होतं. बायको सांगत होती तें व्यवहाराला धरून होतं. नसत्या भानगडी घेऊन बसायला मला सवड होती कुठें ! अन् कशासाठीं म्हणून घ्यायच्या त्या !

एवढ्यांत शिवराम भाटीकर आलाच. तो तग्रवग्र होऊन आला होता. डोळे लाल करून आला होता. हातांत उसगोची लवलवती छडी घेऊन आला होता. चिमा त्याला या वेळीं दिसली असती तर त्यानें आमच्या देखत तिला फोडून काढली असती. त्याच्या अंगांत कांचनभट शिरला होता.

" चिमा आली आहे का इथें ?" आंगणांतूनच त्यानें प्रश्न केला.

" चिमा...नाहीं...इथें नाहीं आली. " मीं चटकन् उत्तर दिलं.

" नाहीं कशी ? इथेंच यायला हवी. तुम्ही खोटं सांगतां मला. गेले दोन महिने तुमच्याच घरचं गुणगान चाललं होतं तिच्या तोंडून. "

" भाटीकरा ! हें बोलणं बरं नव्हे. मागें ती इथें आली, त्या वेळीं मीच तुला निरोप पाठवून बोलावून आणलं होतं ना ?"

माझ्या या शब्दांनीं तो वरमला. कांहीं तरी पुटपुटत मागच्या पावलीं चालता झाला. एवढा वेळ स्तब्ध राहिलेल्या माझ्या बायकोनें मला विचारलं. " हें काय केलंत तुम्ही ?"

" मीं केलं नाहीं. आपोआप घडलं तें. 'आहे' म्हणायचं तें 'नाहीं' आलं तोंडातून. "

आणि एवढ्यांत चिमा बाहेर आली. तिनें बाप येण्याच्या आधींचा आमचा संवाद ऐकला होता. ती बायकोच्या पुढें उभी राहून म्हणाली. ' काकी, एवढी जड झालें मी तुला ! कशाला मग त्या दिवशीं घरांत घेतलंस ? कशाला माया लावलीस ! तूंच मला उपदेश केला होतास ना, चांगलं वाग म्हणून ? मी चांगलं वागायचं ठरवलं होतं; पण म्हणून काय स्वतःला विकून घेऊं ! काकी, मला कळलं. मीं चांगलं वागायचं ठरवलं तरी माणसं मला चांगलं वागूं देणार नाहींत. अन् त्यांतलीच एक तूं ! मी नाहीं रहात तुझ्याकडे. मग मात्र मला म्हणूं नकोस. याच्याबरोबर कां गेलीस अन् त्याच्याबरोबर कां नाचलीस...'

आणि चिमा एकदम घरांतून बाहेर पडली. मी जाणलं कीं सगळ्या जगांतले अपमान झेलले, सोसले तरी ती काकीच्याकडचा अपमान सहन करायला तयार नव्हती. आम्ही तिच्या जात्या आकृतीकडे स्तंभित होऊन पहात राहिलों. मला

तें सहन झालं नाहीं. तिच्या त्या सडेतोडपणानेंच ती मला आपलीशी वाटूं लागली. मीं तिला ओरडूनच हांक मारली. ' चिमा ! मागं फोर. '

तिनें चटकन् तोंड वळवलं. तिच्या त्या लालसर चेहऱ्यांतून जणूं विजेच्या शलाका बाहेर पडत आहेत असं मला वाटलं. तिथल्यातिथें खुंटासारखी उभी राहून ती म्हणाली.

" अं, हं ! तुम्ही नाहीं. काकीला हाक मारूं दे मला. तरच येईन. "

मी बायकोला म्हणणार होतों कीं ' काय होईल तें होवो ; तूं बोलाव तिला.' पण त्या आधींच ती म्हणाली.

" चल ये मागं. तूं तर अगदीं खमंग भेटलीस मला—"



# वनवासिनी

आमच्या पुरोहितांच्या गांवीं जायचं म्हणजे भाकऱ्याच बांधायला हव्या. प्रथम एक डोंगर उराभोटावर घ्यायचा, पुन्हा तेवढंच खालीं उतरायचं आणि तिथूनहि पुढं पायथ्यापायथ्यानं दोन मैल चालायचं. वाट केवळ प्रादेशमात्र. वर वृक्षवेलींच्या कमानी झाल्यामुळें दिसायला सुंदर. पण संध्याकाळ झाली, सूर्य डोंगराआड झाला, कीं तिथें काळ्यानिळ्या सावल्यांचं गोफ विणणं चालू होतं. मग एकट्यादुकट्याला तिथून जातांना किती दचक वाटत असेल त्याची तुम्हींच कल्पना करा.

बरं, एवढं गेल्यावर तरी पुरोहितांचं घर भरल्या लोकवस्तींत असावं! नांव कशाला! तें आहे ऐरावताच्या पाठीसारख्या एका टेकडीच्या माथ्यावर. प्रथम एक खोल चर ओलांडावा लागतो. चरांत पाणी नसतं हा अधिकच धोका. कारण पतन झालं तर खालच्या अणकुचीदार दगडाशींच गांठ! शिवाय त्या गचकलांत जीवजिवाणूंसुद्धा नसतील असं कुणीं सांगावं?

चर ओलांडल्यावर एक तांबडी, मऊसर वाट झोकदार वळण घेऊन गुरुजींच्या घराकडे चढत जाते. गुरुजींची गृहिणी सावित्री ती वाट नित्य झाडून ठेवते. वाटेच्या डाव्या अंगाला काजूचीं दोन झाडं आहेत अन् उजव्या अंगाला रसबाळ्या केळी आहेत. अंगणाच्या पेळेला लागून एक शेवगा उंच वाढला आहे. त्याच्या फुलांचा सडा अर्धा अंगणांत अन् अर्धा बाहेर पडतो. त्याच्या मुळांत चार घागरी पाणी मावेल असं मोठं आळं आमच्या गुरुजींनीं केलं आहे. त्यांत तरारून वाढलेलं झाड जर लवंगी मिरचीचं नसतं तर त्याला कुणाचीहि दृष्ट लागली असती! त्याच्या त्या हिरव्या, मऊ पालवीची गणना कोण करील! घरमालकिणी-सारखंच तें सर्वांगीं कोवळं होतं. आणि त्याला पानोपानीं फुटलेल्या त्या घोसदार मिरच्या! दिसायला सुंदर पण झणझणीत तिखट. गुरुपत्नीच्या स्वभावाला अगदींच विरुद्ध!

मी तिथें पोचलों अन् आंगणांतूनच हांक मारली. 'गुरुजीऽऽ!' पण प्रत्युत्तर मिळालं नाहीं. दाराकडे पाहतों तर तें लोटलेलं. गुरुजी जवळपास असते तर

प्रथम त्यांनीं असतील तिथून ' ओ ' म्हटलं असतं. पोथीचं पान, चंची, कोयती, जें कांहीं हातांत असेल त्याच्यासह ते लगबगीनें बाहेर आले असते अन् येतां येतांच लांबट हेल काढून त्यांनीं म्हटलं असतं ' ' ये ऽ ऽ ऽ ! '

मी पडवीवर चढलों. पुढचा दरवाजा नुसता लोटलेला होता तो उघडून माजघरांत शिरलों. तिथेंहि कुणी नव्हतं ; म्हणून आणखी चार पावलं पुढं जाऊन सैंपाकघरांत डोकावलों. कसल्याहि प्रकारचा संकोच वाटूं नये इतका त्या घरीं माझा परिचय होता. गुरुजी तर नेहमींच यजमानकृत्यासाठीं आमच्याकडे येणारे. त्यांची बायकोहि विशिष्ट कारणपरत्वें येणारी. मीहि अनेकदा या घरीं आलेला. आणि म्हणूनच मीं आंत इथवर मजल मारली.

सैंपाकघरांत एकच माणूस होतं आणि तें म्हणजे गुरुपत्नी सावित्री. ती चुलीपुढं बसली होती आणि त्यामुळें तिची दाराकडे पाठ होती. चुलींतल्या लाकडांतून धूर निघत होता. तिच्या हातांत फुंकणी असूनहि ती त्यावर फुंकर घालीत नव्हती. ती कसल्या तंद्रींत होती देव जाणे ! मीं तिला हाक मारली.

" सावित्रीआक्का ! "

अचानक पाठींत धपका बसावा तशी ती एकदम दचकली. तिनें जमिनीवर आदळलेली हातांतली फुंकणी आवाज करीत लांब गडगडत गेली हें मीं पाहिलं. तिच्या पाठीवर लोंबणारा पदर झट्कन् आंगभर झाला. रडवे जड डोळे ताबडतोब फुलले. तिनें मला ओळखून चट्कन् ' ये ' म्हटलं. माझ्यापुढें पडवीवर जाऊन तिनें शेंद्री पसरली अन् आधीं पाणी विचारलं. मीं ' नको ' म्हणतांच ती दाराच्या चौकटीला टेकून मला सन्मुख उभी राहिली.

आतां तिच्या चर्येवर मघाचा तो रडवेला भाव नव्हता. ग्रहण सुटलेल्या चंद्रासारखं तिचं मुखमंडल विशद झालं होतं. तिच्यांत एकदम झालेला हा बदल मला जाणवला. मी आलों तेव्हां तिचं कांहीं तरी बिनसलं होतं हें नक्की. मीं तिला पहिला प्रश्न केला तो हा.

" गुरुजी कुठें आहेत ? "

" ते सकाळींच गेले आहेत भिक्षुकीला. "

" कुठें ? "

" इथून एका कोसावर. एका कुळवाड्याच्या घरीं गोंधळीक लग्न आहे. "

" मग यायचे केव्हां ? "

" येतील उत्तररात्रीं, नाहीं तर सकाळीं. "

गुरुजी घरीं नाहींत हें समजून माझा विरस झाला. मी तिथें वस्तीला राहण्याच्या उद्देशानेंच गेलों होतों. मला आज सोंगट्या खेळण्याची सुरसुरी आली होती. गुरुजी आमचे पग लावण्यांत मोठे तरबेज. मोठ्या ईर्ष्येचे खेळाडू. त्यांच्या पडशींत सारीपाट नेहमींच असायचा. ते शकुनीच्या आवेशानं फांसे चोळीत. ' बेतीऽऽबाराऽऽ ' म्हणतांना भीमासारखं घरदार दणाणून सोडीत. दान नेमकं पडलं कीं सोंगटीवर सोंगटी इतक्या जोरानं हाणीत कीं, त्या जड वस्तूनें जणू त्यांचं घोडंच मारलं आहे ! मग त्यांच्या डोळ्यांतलीं तीं घारीं बुबुळं अशीं कांहीं चमकत कीं, ' मारली का नाहीं सोंगटी ' हा सवाल त्यांच्या आधीं त्यांच्या डोळ्यांतल्या बाहुल्याच विचारीत. मी त्यांना चेष्टेनें कंकभटजी म्हणें आणि त्यांना राग येण्याच्या ऐवजीं तो बहुमानच वाटे. बहुतेक डाव तेच जिंकीत. एखादा जरी आमच्या पदरांत पडला तरी आम्ही नशीब समजत असूं.

खेळाचा योग हुकला असं पाहून मला वाटलं कीं, लगेच परत फिरावं. मीं दिवस किती उरला आहे त्याचा अंदाज घेतला आणि जाण्याच्या उद्देशानें चंची बांधली.

" सावित्रीआक्का ! गुरुजी आले म्हणजे त्यांना निरोप सांग. तुम्हांला उद्यां-परवां आईनें भेटून जायला सांगितलं आहे म्हणावं. तिला लक्षवातीच्या व्रताचं उद्यापन करायचं आहे. त्यासाठीं बोलावलं आहे तिनें. मी आतां जातों."

" हें काय ? आतां कसला जातोस ? दिवस तरी उरला आहे का ?"

" दिवसाचं नाहीं मोठंसं. उजेड घेऊन घाटीच्या माथ्यावर पोंचलों कीं मग धबाधब खालीं उतरेन. "

त्यासरशीं एकदम सावित्रीच्या डहाळ्या पडल्या. एवढा वेळचा तिचा उल्हास मावळला. तिच्या गोऱ्या तोंडावर कृष्णछाया पसरली. मीं मनांत म्हटलं. ' असं काय करते ही ? '

" रहा ना आजची रात्र ! " ती अगदीं काकुळती आल्यागत म्हणाली. त्याचा अर्थच मला कळेना.

मीं जिज्ञासा धरून तिला विचारलं. " सावित्रीआक्का, काय झालं आहे तुला आज ? मघाशीं मी आलों तेव्हां तूं चुलीजवळ खिन्न होऊन बसली होतीस. मी आलेला पाहून तुला एकदम उत्साह आला. अन् आतां मी जातों म्हटलं तर—"

" मी एकटी आहें घरांत आज. "

" गुरुजी अधूनमधून बाहेरगांवीं जातात, दोन दोन दिवस राहतात, तेव्हां काय दुकटी असतेस ? "

" नेहमींची गोष्ट वेगळी अन् आजची वेगळी आहे. तुला ठाऊक आहे गांवापासून आमचं हें घर किती दूर आहे तें. मी नेहमीं धीर धरून राहतें. पण आज मी भयानें अर्धमेली झालें आहें. आज वाघरं चाळवलं आहे गांवांत. भर दुपारीं गांवांतल्या अर्जुनगांवकाराचीं दोन गुरं एका होळेवर वाघानें मारून घातलीं आहेत. एक तानपी गाय अन् एक बांगर पाडा. वाघ जवळच कुठेंतरी घळींत लपला आहे म्हणे. गांवकाराची गाय; तेव्हां वाडींतले सगळे झिलगे लाखणी मांडायला गेले आहेत. मघाशीं आमचा शिंपणेकरी आला होता, तो सांगत होता—"

" हात्तेच्या, एवढंच ना ? मग त्यांत भ्यायचं काय आहे ? वाघ कांहीं अडणा घातलेलं दार उघडून तुझ्या घरांत येत नाहीं ! "

" तुला सांगायला काय जातं ? पण मीं हें सगळं ऐकल्यापासून ठिकाणावर नाहीं. तिकडे बंदुकीचा बार उडाला तर इकडे मी धसक्यानेंच मरेन ! दिवस कसा तरी जातो. कुणीतरी माणूस येतं-जातं ; पण रात्र आली कीं सगळं सामसूम. आज तर मुलंसुद्धा घरीं नाहींत. तीं गेलीं आहेत आपल्या आजोळीं. अन् हे म्हणजे अवधूताचे अवतार ! गेले तिकडे गेले; राहिले तिकडे राहिले. घरीं आल्यावर जिवंत असली तर बायको हवी त्यांना. आज तुला देवानेंच पाठवलं असं मी समजतें. तेव्हां आजची रात्र सोबत कर मला. "

सावित्री आपल्या काळजांत दाटलेलं भय वाणीच्या द्वारें बाहेर टाकीत होती. तिचा जीव आज खरोखरच थाऱ्यावर नाहीं हें मला समजून चुकलं. वाघ न दिसतांच तिच्यावर वाघरं पडलं होतं. ज्या कुणीं आजेपणजे—सासऱ्यानें गांवापासून लांब अशा आडवळणाला बिनशेजाराचं हें घर बांधलं, त्याला ती मनोमन बोल लावीत होती. सासू वारल्यापासून गेलीं पांच वर्षे तिनें त्या

घरांत अनेकदां एकलेपणाच्या अनंत व्यथा भोगल्या होत्या. नवरा भिक्षुक; त्यामुळें गांवांना वाहिलेला अन् ही तेवढी घरखुंटीला बांधलेली.

अन् याच कारणामुळें माणूस म्हणजे तिला परब्रह्म झालं होतं. कुणी दारांत दिसलं कीं ती त्याचं मनोमन स्वागत करी. कुणाला भाकरतुकडा, कुणाला पेजपाणी, कुणाला पोहेचहा, असं आतिथ्य देऊन ती त्याला तासन् तास बसवून घ्यायची. ‘ बस रे, जाशील ! ’ किंवा ‘ बस गो, जाशील ! ’ हें तिचं नेहमीं पालुपद असायचं. बाहेर जग म्हणून कांहींतरी आहे अन् त्यांत बऱ्यावाईट घडामोडी चालल्या आहेत, हें तिला अशा आल्यागेल्या माणसांकडूनच कळायचं. नाहींतर कुळागर, घर, गुरं अन् मुलं एवढंच तिचं लहानसं वर्तुळ.

मनुष्य प्राप्त परिस्थितींतून कांहींतरी मार्ग काढतोच; शिरावरचं खांद्यावर आणण्यासाठीं कांहींतरी उपाय शोधतोच. तसंच तिनंहि केलं होतं. ती मग नेहमीं गाणीं गुणगुणत राही. तिला खूप गाणीं येत. लहानसहान नव्हेत; तर मोठीं आख्यानवजा. एकदा ‘ राजसूय यज्ञ ’ तिनें सुरू केला कीं दोन तासांची निचिंती. अधेंमधे मुलांनीं व्यत्यय आणला तर मग एक प्रहर. ‘ जयदेवा रामचंद्रा— ’ म्हणून ‘ रामराज्य ’ सुरू झालं कीं मग तासभर कसली विवंचना नाहीं. तिची ती चोरट्या पण साखरी आवाजांतली गुणगुण बराच वेळ ऐकल्यावर मागें मीं एकदा तिला विचारलं होतं.

“ सावित्रीआक्का, तूं नेहमीं गाणीं काय म्हणत असतेस ? कुळागरांत शिंपणं घालीत असलीस तरी गाणं. लाकडं गोळा करीत असलीस तरी गाणं. रांधीत असलीस तरीपण गाणंच. तुझं तोंड वळत नाहीं का ? ”

त्यावर ती आपला मनोभाव उकलून मला म्हणाली होती.

“ मला ती आतां संवयच लागली आहे. ‘ मुखीं नाम, हातीं काम. ’ तोंडांत गाणं असलं कीं मग एकटेपण जाणवत नाहीं. त्याच नादांत मग मी असतें. त्यांतल्या कथेशीं एकदा तन्मय झालें कीं माझ्याभोंवतीं नवलाख दिव्यांची द्वारका उभी होते. अयोध्यानगरी गजबजूं लागते. पांडवांचं हस्तिनापूर हसूं-खेळूं लागतं. तेवढ्यापुरतं मी भयाला पळवून लावतें. ”

त्या कुकिंदर रानांतल्या आपल्या केंबळी मठींत जीव जडवून घेण्यासाठीं ती आणखी कोणकोणते उपाय करीत होती तें तिचं तिलाच माहीत. आणि म्हणूनच

जेव्हां केव्हां पत्ते किंवा सोंगट्या खेळण्याच्या निमित्तानें आमचे गुरुजी चार परिचित लोक गोळा करून वस्तीला आणीत, तेव्हां सावित्रीला सण-सुदिन होत असे. असेल त्यांत चांगलं करून त्यांच्या पानावर घालतांना, त्यांच्या हास्याचे कल्लोळ ऐकतांना, त्यांचा खेळ उंबऱ्यांत बसून पाहतांना, तिचा अंतर्यामी सहस्रदळांनीं विकसित होत असे. भय, एकांत, शून्यता, यांचा जणूं सूड घेतला जात आहे, असं तिला वाटत असे.

तिची ही वृत्ति मला ठाऊक होती. आणि म्हणूनच तिनें 'रहा' म्हटल्यानंतर माझा पाय उचलला नाहीं. मीं खांद्यावरची शाल खालीं टाकली, टोपी काढून खुंटीला लावली, खिशांतली चंची काढून शेंद्रीवर टाकली अन् इतकं करून चांगले हातपाय पसरून बसलों.

तिला त्या गोष्टीचा परम आनंद झाला, हें तिच्या मुद्रेवर मला स्पष्ट दिसलं. हा आनंद धीर मिळाल्याचा होता. पण मीं तिच्यावर उपकार केला असं मात्र मला वाटलं नाहीं. तें माझं कर्तव्य होतं. सावित्रीला प्रसन्न पाहतांना मला तिच्याहून अधिक गोड वाटत होतं. आतां आजची रात्र ती बिनधसक्यानें घालवणार होती. सावित्री ही चीजच विधात्यानें अशी निर्माण केली होती, कीं आकाशदिव्याच्या कागदांतून आंतला प्रकाश गाळून बाहेर पसरावा, त्याप्रमाणें तिचा आंतला आनंद सभोंवतीं विखुरत असे.

मला थांबवून मग ती घरांतल्या उद्योगाला लागली. गुरावासरांचा उद्योग दुपारींच आवरला होता. वाघानें गांवकाराची गाय झडपली त्या वेळीं गुरांचा सगळा 'हींड' बुजला होता आणि शेपट्या वर करून उधळत घरीं आला होता. सावित्री त्याच वेळीं त्यांना आंगणांतल्या आवश्यांत घालून, त्यांच्यापुढें पेंढा टाकून नि दाराची तडकी लावून मोकळी झाली होती. तें आवसं म्हणजे एक मेढेकोटच होता. आमच्या गुरुजींनीं एकाला लागून एक असे पोटरीएवढे डांब घट्ट पुरून आपल्या आवश्यांत वाघा-वांशेलाचा हातसुद्धा शिरकूं नये, असा पक्का बंदोबस्त करून टाकला होता.

थोड्या वेळानें मांजराच्या पायानें रात्र आली. अंधार भोंवतालच्या सृष्टीवर कबजा करूं पाहातो तोंच चंद्रानें रुप्याच्या 'सळाथी'नें त्याला झाडून टाकलं. सभोंवतींच्या निळ्या घनदाट झाडीवर शुभ्र, ओलसर असं क्षौमवस्त्र पसरलं.

एकान्त करुणगंभीर झाला. माझंहि गांव कांहीं शहरवस्तीचं नव्हतं. मीहि दुसऱ्या एका कुग्रामांतच राहणारा–जिथें शाळा नाहीं, वैद्य नाहीं, पोष्ट नाहीं. पण मी ज्या पाटाचं पाणी खात होतों त्या पाटाला ओळीनें सातआठ घरंद्यां होत्या. दुसऱ्या घरचा कलबलाट अस्पष्टपणें माझ्या कानांवर नेहमीं येत होता. पण इथें ? इथें सगळा 'शून्याचा निष्कर्ष !' रात्र पडली कीं अष्टदिशा आवळून येऊन एकमेकींना खेंव द्यायच्या. अन् आज याच घराच्या कडणीवाश्याखालीं गुरुजी नसतांना रात्र काढायची...

एवढयांत सावित्रीनें मला आंत हांक मारली. माझ्यासाठीं देवापुढें पाट मांडला. अजून जेवायचं झालं नव्हतं. चुलीवर भात खुतखुतत होता. वैलावर आमटी उकळत होती. सावित्री चुलीजवळ बसून लाकडं आंत सारीत होती. गप्पागोष्टीसाठीं म्हणूनच तिनें मला आंत बोलावलं होतं.

सावित्री म्हणजे कोवळिकेचं लेणं. तिचे अवयव कोवळे, बोलणं कोवळं अन् चालणंहि कोवळं. दोन मुलं होऊनहि ती नववधूसारखी सतेज दिसत होती. भोंवतालच्या वेलींकडून जणूं तिनें लवलव उचलली होती. कुळागरांतल्या तळींतलं निळं निर्मळपण तिच्या डोळ्यांनीं घेतलं होतं. तिच्या वरच्या पापण्यांवर एक ऐटबाज धनुकलीसारखी घडी पडे, तीं जणूं पुष्पधन्व्याचीं राखीव धनुष्यंच. आतां चुलीपुढें बसल्यामुळें विस्तवाच्या धगोनें तिचा कलंकरहित मुखचंद्र लाल-सर झाला होता आणि चुलीमागच्या किलकिल्या खिडकींतून आंत शिरणाऱ्या मंद वायुलहरींनीं चुलकट्टयावरची चिमणीची ज्योत हालली कीं तिच्या मुद्रेवर सावल्यांचं लास्य तरळत होतं. कुणींहि लोभ करावा, कुणींहि शब्द झेलावा अशीच सावित्रीच्या तनमनाची रचना होती.

गुरुजी तर तिचे यजमानच. मग ते तिच्यावर प्रेम करतील, हें काय सांगायला हवं ? पण आमच्या गुरुजींचा खाक्याच वेगळा होता. सुवळले कीं सूत नाहीं तर भूत ! एकांतिकपणा हा त्यांचा उठून दिसणारा स्वभावविशेष. त्यांचा 'म्हारू' खवळला कीं सावित्रीच्या कोवाळिकेवर अंगारफुलं पाखडूं लागे. त्यांच्या त्या विरळ, पिंग्या मिश्यांचीं टोकं जणुं सावित्रीच्या काळजांत बोचूं लागत. ते कित्येकदां तिला जीव नकोसा करीत ! एखादे वेळीं तिच्यासाठीं पाण्याच्या घागरी वाहतील, पांचफटीला झाडावर चढून तिच्यापुढें सुरंगीच्या कळ्यांची रास आणून ओततील आणि आपल्या पंचाबरोबर तिचं लुगडेंहि

आपटून आणायला निघतील. पण एकदा का खवळले म्हणजे सावित्रीला चार दिवस चार युगांसारखे. अन् त्यांची दुसरी खोड अशी कीं, सावित्री चार शब्दांनीं जरी उलट उत्तर बोलली तरी घरांतून चालतं व्हायचं. त्यांचे यजमान गांवोगांव होतेच. कुठेंहि गेले तरी त्यांचं स्वागतच व्हायचं.

पण इतकं असूनहि सावित्री आनंदी होती. तिचा स्वभावच तसा होता. भय नाहींसं झालं कीं तो एका क्षणांत पुढें येई. हळुवार भावनांच्या पत्रपुटांतून संसारांतला रस चाखण्याची तिची प्रवृत्ति होती.

आजसुद्धा मला जेवायला वाढतांना ती खूप बोलली. गुरुजींचाच विषय निघाला होता. त्या वेळीं मला कळलं, कीं आजसुद्धा गुरुजी तिच्यावर रागावूनच घरांतून निघून गेले होते. 'लग्न लावायला गेले आहेत' हें मघांशीं तिनें सांगितलं तें तोंडदेखलं होतं. रागाचं कारण तिनें मला सांगितलं नाहीं; पण स्वरूप सांगितलं. ती म्हणाली.

"गेले असतील शेजारच्या गांवीं. तिथें मध्यरात्रीपर्यंत सोंगट्या खेळतील. लहर लागली तर तसेच उठून घरची वाट धरतील. सोबत असली तरी वाहवा; नसली तरी वाहवा! मनांत नसलं तर झोपतील तिथेंच. कुणीं म्हटलं, 'आलांच आहांत ते घरांत एकादष्णी करा' तर ती करतील अन् दुपारीं स्वस्थपणें घरीं परततील."

जेवणं झाल्यावर ती म्हणाली, "तूं माजघरांत झोंप."

"अंऽहं! मी बाहेर पडवींतच झोपतों."

"एकटाच?"

"हो, त्याला काय होतंय? मला कांहीं वाघ खायचा नाहीं!"

"नको बाबा खायला! उगाच कांहींतरी बोलूं नको."

बाहेर शेंद्री होतीच. एक गोधडी, एक पाकडकुटाचं उसं अन् एक काळी घोंगडी एवढा सरंजाम घेऊन मीं पडवीवर आंथरूण टाकलं. सावित्री, माजघरांत दाराजवळच आंतून कडी अडकवून झोपली. तिला झोप लागली कीं नाहीं देव जाणे! पण मला मात्र झोप येईना! तो न पाहिलेला वाघ डोळ्यापुढें येऊं लागला. गावकऱ्यांनीं त्याच्यासाठीं मांडलेली लाखणी दिसूं लागली.

चौफेर लपवून मांडलेल्या बंदुकांच्या त्या कूटयंत्रांत तो यावा, मेलेल्या ऐंसांजवळ आणून बांधलेल्या वेलीला त्याचा धक्का लागावा, ती वेल हालतांच तिच्याशीं संधान जुळवलेले बंदुकांचे चाप ओढले जावे, एकदम सगळे घोडे उडावे, ठो-ठो बार व्हावे, त्यांतली एकतरी गोळी वाघाचं पोटकुळ फोडून आरपार जावी अन् सकाळीं त्या मरून पडलेल्या हिंस्र पशूवर नजर टाकूनच आपल्याला घरीं जायला मिळावं, असे विचार माझ्या मनांत राहूनराहून येत होते.

रात्र वाढूं लागली आणि कधींतरी मग मला झोप लागली. पण थोड्याच वेळांत मी पुनश्च जागा झालों—सहज नव्हे, तर कुठेंतरी खजबजल्यामुळें. क्षणभर मला मी कुठें आहें तेंच कळेना ! मग हळूहळू जाणीव होऊं लागली कीं, मी गुरुजींच्या पडवीवर आहें. पडवी अरुंद म्हणजे माझ्या उंचीइतकीच आहे. पायांखालीं गुडघाभर उंचीची भिंत आहे. भिंतीला लागूनच खालच्या आंगणांत तें मेढेकोट घातलेलं गुरांचं आवसं आहे. माझ्या डाव्या हाताला चार हात अंतरावर पडवी संपली आहे. तिथेंच न्हाणीची मोठी चूल आहे. तिच्यावर रिकामा तांब्याचा हंडा आहे. त्याच्यामागें पुरुषभर उंचीची धड आहे. तिच्याहि खालीं गुरुजींचं घर ज्या टेकाडावर आहे त्याचा उतार आहे. एक आवसं सोडलं तर उरलेलं अंगण मोकळं आहे. त्यांत चांदण्यांचा पूर लोटला आहे. अन् आंगणापलीकडे असलेल्या फणसाच्या झाडाखालीं दोन निखारे फुलले आहेत !

'अरे बापरे ! ही तर वाघोबांची स्वारी. दुपारीं मारून घातलेलं ऐंस सोडून या बाजूला कशाला वळले हे महाराज ! का यांना त्या ऐंसावर लाखणी मांडल्याचा संशय आला ? मोठी वस्ताद दिसते स्वारी. गुरुजींच्या गुरांवर डोळा दिसतोय लेकाचा. तरीच गुरं धडपडून उठलीं तीं ! थोडा वेळ टक लावून पाहिल्यावर त्याची अंधारांतली आकृति मला स्पष्ट दिसूं लागली. तो मागचे पाय दुमडून अन् पुढचे उभे ठेवून ऐटींत बसला होता. त्याची नजर आवश्याकडे लागली होती. डोळे नुसते घिसघिसत होते. मधेंच तो आजूबाजूला आपली सावध नजर टाकी अन् पुन्हा आवश्यावर स्थिर करी. त्याचं लक्ष्य तेंच होतं.

त्याच्याकडे पाहतां पाहतां तशा त्या थंडींतहि मला घाम फुटला. एकदा सपाटून ओरडावं असं वाटलं; पण शब्द फुटतो कशाला ? अन् त्या ओरडीनें तो काळ

सरळ पडवीवर चढला तर ! मग माझा त्राता कोण ? एक नख छातींत रुतलं कीं आमचा अवतार खलास ! पळायचं कुठें अन् लपायचं तरी कुठें !

जवळपास कुणी नाहीं, अशी जेव्हां त्याची खात्री झाली, तेव्हां तो फणसाच्या बुंधांतून उठला अन् संथपणें एकेक पाऊल टाकीत अंगणांत आला. त्या चांदण्याच्या बरसातींत मला त्याचं लख्ख दर्शन घडलं. केवढं लांब धूड होतं तें ! त्याची ती शेपटी मागं वळवळत होती, ती त्याच्या अंगावरच्या ठिपक्यांपेक्षांहि भयावह होती. तो आवश्याच्या रोखानें पुढें पुढें येत होता. त्याच्या अंगाची अन् तोंडाची घाण माझ्या नाकाला येऊन भिडत होती.

आतां पुढें काय करायचं ? त्याला घालवण्याचं सामर्थ्य मजपाशीं नव्हतं. मला फक्त जीव राखायचा होता—आधीं माझा अन् मग शक्य तर त्या गुरांढोरांचा. त्याला आपली चाहूल लागतां कामा नये, ही मुख्य गोष्ट होती. मी बसलों होतों तो आडवा झालों अन् त्या गुडघाभर भिंतीच्या मुळांत सरकलों. कांबळं डोक्यावर ओढून अन् कासवासारखे सगळे अवयव पोटांत घेऊन निपचित पडून राहिलों. आतां मी वाघाला दिसणार नव्हतों अन् वाघहि मला दिसत नव्हता. मी सगळा जीव कानांत आणून त्या गनिमाच्या पुढच्या हालचालींकडे लक्ष दिलं.

मला प्रथम आवश्याच्या मेढेकोटावर नखांचे ओरखडे ऐकूं आले. नंतर ती खडबड जरा दूर गेली. मीं कल्पना केली कीं, वाघ आवश्याभोंवतीं प्रदक्षिणा करून आंत शिरायला फट पाहतो आहे. पण या कामीं त्याची निराशा होणार होती. कारण मेढेकोट पक्का होता. फक्त उड्डाण मारून आंत पडला तर ! मग मात्र गुरांचं समूळ भंजन. पण एवढी उडी त्याची जाणार नाहीं. एवढ्यांत 'कर कर कट्ट' अन् पाठोपाठ धप्प असा आवाज झाला. आतां मात्र मला राहवेना. मीं हळूच त्या भिंतीच्यावर डोकं काढलं. भले शाबास ! वाघोबा अक्कलहुशारीचा खरा ! त्यानें वर उडी मारून मेढेकोटांतल्या एका डांबाचं डोकं पकडलं होतं आणि सगळ्या शक्तीनिशीं तो मागें खेंचून मुळांतून मोडला होता. आतां पंजा आंत शिरेल एवढी फट त्या आवश्याला तयार झाली होती. तो त्याच प्रयत्नाला लागला होता. त्याचं अंग त्या मेढेकोटाला चिकटलं होतं अन् शेपटी मागें वळवळत होती. आंतल्या गुरांची गाळण उडाली होती.

मला वाटलं, आतां गुरांवर संक्रांत आली ! हातापायांची जुडी करून उघड्या डोळ्यांनीं मी हा संहार कसा पाहूं ? वाघ आयता पाठमोरा आहे अन् आपल्या

नादांत गुंतलेला आहे. पाठीमागून जावं अन् कण्यावर कुऱ्हाडीचा एकच घाव घालावा. एका क्षणात हें धूड आडवं कोसळेल. माझ्या जवळपास कुऱ्हाड नव्हती, म्हणूनच कदाचित् माझ्या मनांत हा विचार उठला असेल !...

एवढ्यांत कशी अन् काय, कोण जाणे; पण डोक्यांत वीज लकाकली. मी तसाच सरपटत सरपटत न्हाणीच्या चुल्याकडे गेलों, देवाचं नांव घेतलं अन् त्याच्यावरचा तो रिकामा तांब्याचा हंडा दोन्ही हातांनीं पलीकडे लोटून दिला. तो पहिल्या सपाट्याला पुरुषभर उंचीवरून खालच्या खडकावर आदळला आणि ‘ ठा ठण्ण् ’ असा महानाद उठावला. वाघ आपल्याच नादांत होता. त्याच्या काळजावर आकस्मिकपणें तो ‘ ठणाण् ’ आदळला. त्यासरशीं वाघानेंहि भयाची एकच आरोळी ठोकली अन् दुसऱ्याच क्षणाला खालच्या चराकडे झेप टाकली. पहिला तूर बंबाळ त्या हंड्याचा, दुसरा त्या मागोमाग वाघाचा अन् तिसरा...

तिसरा घरांत सावित्रीचा !

वाघाच्या त्या ब्रह्मांडकटाहाला तडा घालवणाऱ्या डरकाळीनें ती दचकून जागी झाली असावी अन् त्याच क्षणीं भयानें ओरडली असावी. तो हंडा घरंगळत, नादावत खालीं कुठेंतरी गेला आणि मग स्तब्ध झाला. वाघानें झेप घेतलेली बाजूहि सामसूम झाली. गुरंहि आवश्यांत स्वस्थ झालीं. आणि घरांत सावित्रीहि चिडीचिप् झाली ! मी आतां उठून बसलों. जिवावरचं बोटसुद्धा न कापतां निभावल्याबद्दल एक सुस्कारा सोडला. मला वाटलं कीं, आतां सावित्रीला हाक मारावी अन् संकट टळल्याचं तिला सांगावं.

मी उठलों, दाराशीं गेलों अन् म्हटलं, “ सावित्रीआक्का ! ”

पण आंतून ‘ ओ ’ आली नाहीं. मीं म्हटलं, हिला पुन्हा झोप लागली कीं काय ! मीं दाराच्या फटीशीं तोंड नेलं आणि पुन्हा जरा मोठ्यानेंच हांक मारली, “ सावित्रीआक्का ऽ ऽ ! ”

पण तरीहि आंत सगळा निःशब्दाचा कारभार. कूस बदलल्याचा, सुस्कारा सोडल्याचासुद्धा आवाज नाहीं. आहे काय हा चमत्कार ! मीं आणखी स्वर चढवला. दारहि जोरजोरानें खडखडावलं; पण तरीहि आंतून ‘ हूं कीं चूं ’ नाहीं. छेः ! ही बाई आंत झीट येऊन पडली कीं काय ? होय, तसंच असलं पाहिजे.

नाहीं तर माझ्या या खडखडाटानें कुंभकर्णसुद्धा जागा झाला असता. खात्रीनें सावित्रीची हाल्त ठीक नाहीं.

पुन्हा मी वेड्यासारखा ओरडलों. पुन्हा दाराला धडका दिल्या. आणि पुन्हाहि मागच्याप्रमाणेंच निराश झालें. माझ्यापुढें मोठी समस्या उभी राहिली. त्या व्याघ्रेश्वराच्या दर्शनानें मी जितका घाबरलों नव्हतों, तितका या परिस्थितीला घाबरलों. हात चोळले, डोकं खाजवलं अन् पुन्हा मघाच्यासारखी डोक्यांत वीज चमकली!

मीं खालीं ओणवून दाराच्या फळीच्या बुडाशीं हात घुसवले अन् फळी वर उचलली. तिचं कूस खालच्या वाटोळ्या छिद्रांतून वर आलं. ती फळी जरा तिरकी सरकवतांच वरचं कूसहि निसटलं. फळी तोलून धरायला मला बरीच ताकद खर्च करावी लागली. मग माझा आंत शिरकाव झाला. सावित्रीला हाक मारतां मारतांच काडी ओढून मीं तिच्या उशागतीची चिमणी पेटविली. लागलीच प्रकाश पसरला. अन् त्या प्रकाशांत मला काय दिसलं!...

सावित्री उताणी निश्चेष्ट पडली आहे. हाताशीं हात नाहीं; पायाशीं पाय नाहीं. जणूं उन्मळून पडलेली कर्दळी! धरणीवर पडून थंड झालेली उल्का. तिथं हाकांचा नि आरोळ्यांचा काय उपयोग! ती जर या जगांतच नाहीं, तर 'ओ' कुठून देणार? मीं स्वैंपाकघरांत गेलों; पण तें पडलं गुरुजींचं घर. तिथं कांदा कुठून मिळायचा? मीं पाण्याचा तांब्या आणला आणि सपासप तिच्या तोंडावर चार हपके मारले. सर्वांग आक्रसून टाकणारी थंडी बाहेर पडली होती. गार पाण्याचा एक शिंतोडा पडला तरी काया नखशिखान्त शहारून उठायची. पण सावित्रीला त्या हपक्यांचंसुद्धा कांहींहि नव्हतं. माझा तो उपाय कःपदार्थ ठरला.

आज दैव माझ्यावर चांगलंच कोपलं होतं यांत शंका नाहीं. कोण या एकेक आपत्ती! कशी शुद्धीवर आणूं मी हिला? पण विचार करीत बसायला तरी सवड होती कुठें? दुसरा कांहीं तरी उपाय शोधणंच भाग होतं. खालीं बसून मीं माझे दोन्ही आंगठे तिच्या दोन्ही कानशिलांवर सपाटून दाबले. पण ते मोडून घेण्यापलीकडे कांहीं लाभ झाला नाहीं. शेवटीं मीं डोक्याचा पंचा सोडला, त्याचा वेंट केला आणि जवळच्याच जात्याचा खुंटा त्यांत अडकवून तो तिच्या कपाळा-भोंवतीं पिळायला प्रारंभ केला. तो दाब जेव्हां चोहों बाजूंनीं करकचून बसला,

तेव्हां कुठें माझ्या आईनें 'अँऽऽ' केलं. मग माझ्या जिवांत जीव आला. गुरुजींचा मोडूं पाहणारा गृहस्थाश्रम पुनश्च सावरला होता आणि तें श्रेय मीं जीव गहाण ठेवून मिळवलं होतं ! माझा हर्ष पोटीं मावेना.

मग मीं भराभर जात्याचा तो खुंटा उलटा फिरवला, वेंट्याचा पीळ मोकळा केला आणि तिच्या डोक्याभोंवतींचा पंचा काढून घेऊन खुंटा फेंकून दिला. तिला एक सौम्यशी हाक मारली. तिनें शून्यांत नेलेले डोळे खालीं आणून माझ्याकडे नुसतं पाहिलं. तेवढयानेंच मला तिच्या जीविताची खात्री पटली. तिची मान, गळा मीं कोरडा केला.

"सावध झालीस ना ?" असं विचारून मीं तिचं डोकं हलकेच उचललं. मी तिला बसती करणार होतों; पण माझी समजूत चुकली होती. सावित्री अजून पुरती शुद्धीवर आली नव्हती. उठून बसवतांना ती पुन्हा कोसळली आणि ती सरळ माझ्या अंगावर !...

आणि माझ्या दुर्दैवानें आणखी एक चमत्कार त्याच वेळीं दाखवला ! गुरुजींनीं अचानक दारांतून आंत पाऊल ठेवलं. आम्हां दोघांचा तो मांडलेला देखावा ते दारांतच निश्चल उभे राहून पाहूं लागले. पाहतां पाहतां त्यांच्या त्या घाऱ्या डोळ्यांत विखार भरला. मघाशीं त्या हिंस्र श्वापदाचे गुंजावर्ण डोळे मीं पाहिले होते, त्यापेक्षांहि गुरुजींचे ते उग्र नेत्र मला दाहक वाटले. कसलाहि अपराध नसतां माझ्या शरिराचं पाणी झालं. माझ्या अंगावर विवशपणें पडलेली सावित्रीची अर्धचेतन काया, मीं हळूच खालीं अंथरुणावर ठेवली आणि उठून उभा राहिलों.

गुरुजी दोन पावलं पुढें आले अन् तीव्र स्वरांत मला बोलले. "चांडाळांनो ! हें कर्म आरंभलंत का... !"

मीं आवंढा घोटून गळा-घसा मोकळा केला अन् म्हटलं, "गुरुजी, भलतं कांहीं बोलूं नका. झीट आली आहे तिला..."

"येणारच ! मी आलों ना तिचा काळ समोर !"

"गुरुजी ऽऽ !"

"एक शब्द बोलूं नकोस. होळ साधून माझं घर बुडवायला आलास होय ?"

"शांत व्हा गुरुजी ! ऐका तर खरं..."

" प्रत्यक्ष पाहिल्यावर आतां ऐकायला कशाला हवं ? अन् मला म्हणतो शांत व्हा ! चालता हो तूं आधीं इथून. माझ्या घरांतून काळं कर. मग मी काय करायचं तें पाहीन ! "

मला वाटलं, या खवळल्या वेताळापुढें तूर्त तरी कांहीं बोलण्यांत अर्थ नाहीं. मी उठून बाहेर पडवींत आलों. माझ्या दुर्दैवाला बोल लावीत अंथरुणावर बसलों. मघाचाच चंद्र बाहेर प्रकाश ओतीत होता; पण आतां त्यांत दाहकता भरली होती. मी आलों होतों कशासाठीं अन् झालं काय?...पण एवढ्यांत आंतून सावित्रीचा आर्तरव बाहेर आला. 'अग आई ग ऽ ऽ !'...गुरुजींनीं बहुधा ठोसा देऊनच तिला शुद्धीवर आणली होती.

काय झालं कोण जाणे ! शेपटीवर पाय पडल्यासारखा मी एकदम उभा झालों. दणदणतच घरांत गेलों अन् मागेंपुढें न पाहतां गुरुजींचा दंड पकडला. खस्‌दिशीं ओढून त्यांना उभं केलं.

" माणूस आहेस का कोण आहेस ?"

" सोड मला. तूं...तूं...तुला मधें पडायचं कारण नाहीं. सोड...सोड. "

तो हात हिसडूं लागला. मी त्याला शरीरबळानें भारी होतों अन् आतां तर माझ्या रोमरोमांत संताप भरला होता.

" तुला तसा नाहीं सोडायचा आतां. या वेळीं तूं माझा गुरुजी नाहींस. माझ्या दृष्टीनं तूं...जाऊं दे. तो शब्द उच्चारीत नाहीं. मूर्खा ! बायकोवर रागावून घरांतून चालता होतोस अन् परत येऊन परिस्थितीचा विचार न करतां तिलाच ठोसा देतोस ? अन् तेंहि ती शुद्धींत नसतांना ? शरम नाहीं वाटत जिवाला ? अर्ध्या घटकेपूर्वी इथें कसला प्रसंग उभा झाला होता त्याची कल्पना आहे तुला ? चल, ये दाखवतों. "

मीं त्याला ओढीत बाहेर आणून आवश्यापुढें उभं केलं अन् म्हटलं.

" बघ हें आवसं ! बघ हा मोडलेला डांब. बघ हे नखांचे ओरखडे. बघ हे मातींत उमटलेले पंजे. इथें थोड्या वेळापूर्वी कोण आलं होतं तें कळलं तुला आतां ?... तुझं पुण्य नव्हे; पण दैव शिकंदर होतं म्हणून मला आज इथें येण्याची बुद्धि झाली. नाहीं तर तुझ्या गोठ्याचा निकाल लागला असता अन् वर बायकोहि इहलोकांतून पार झाली असती ! मग बसला असतास गोबरांत. तुला

देवानें सोन्यासारखी बायको दिली; पण त्याआधीं तिला संभाळण्याची थोडी अक्कल द्यायला मात्र विसरला !... ”

मी रागारुद्र होऊन बोल्त होतों. गुरुजी ‘आ’ उघडून ऐकत होते. माझा तो अवतार बघून त्यांना उलट बोलण्याची छातीच झाली नाहीं. मग मीं त्यांचा हात सोडून म्हटलं.

“ आजपासून तुझं गुरुजीपणाचं नातं संपलं. असल्या तामस माणसाला गुरुजी म्हणणं म्हणजे त्या पदवीचा अपमान आहे ! तुला काय हवा तो हिंस्रपणा कर ! मी चाललों आतां...”

आणि मीं माझं सामान कवळलं. एवढ्या वेळांत सावित्री पुरती सावध झाली होती. मी पडवी उतरलों हें तिला कळतांच तिनें मंद आवाजांत मला हाक मारली. मी परतलों आणि घरांत जाऊन तिच्यापुढें उभा झालों. ती म्हणाली.

“ दुसऱ्याला शहाणपण शिकवणाऱ्यानें स्वतः वेडेपण करणं शोभतं का ? तूं नातं तोडायला निघालास; पण नातं तोडणं म्हणजे गवताची काडी तोडण्यासारखं का आहे ? तिथें अंतःकरणाचा संबंध येतो. समजलं...”

आणि काय सांगावं ! तिच्या त्या मोजक्या शब्दांनीं माझ्या तापल्या तव्यावर तांब्याभर पाणी पडलं !

★ ★ ★

# पुरंदरची शिकार

घरभरणी लागल्यापासून पुरत्या पांच दिवसांनीं मी माझ्या माहेरच्या वाड्यांत परतलें होतें. संध्याकाळीं उन्हं उतरल्यावर लोक फिरायला बाहेर निघतात त्या वेळीं नव्या नक्षीदार चपलांच्या पायांनीं मी टांग्यांतून खालीं उतरलें. डाव्या खांद्याला लटकावलेल्या तपकिरी, चुणीदार कातडी थैलींतून बंदा रुपया काढून मीं टांगेवाल्याच्या हातावर ठेवला. माझ्यासारखीच नाजूक अन् नवोढा असलेली तकतकीत कातडी बॅग अलगद उचलून मी वाड्यांत शिरलें. पश्चिमेच्या निळ्या क्षितिजावर अवचित शुक्राची चांदणी उगवावी तशी.

मी आंत शिरलेली दिसतांच वाड्यांतलीं पोरं हातांतला खेळ टाकून स्तब्ध झालीं. दोन्ही मजल्यांवर दारा-खिडक्यांत नेत्रकमळं उगवलीं ! स्त्री-पुरुषांच्या—विशेषतः बायकांच्या—नजरा माझा वेध घेऊं लागल्या. मींहि माझे चटुल कटाक्ष जातां जातां कांहीं जणींवर फेकले. आमच्या त्या शेजाऱ्यांच्या मुखावर कौतुकाचा भाव नव्हता. होता तो कांहींसा संभ्रम अन् बरीचशी असूया. "चार दिवसांपूर्वी फाटक्या विटक्या साड्या नेसून, बुच्च्या गळ्यानें वाड्यांत फिरणारी मंगलाच का ही चैत्रागौर होऊन आली आहे?...नवलच हो सगळं!' असा स्पष्ट भाव त्या मुखमुद्रा मला दर्शवीत होत्या.

माझी हिरवी चंदेरी साडी, अग्रं फुलवून पाठीवर सोडलेली काळ्या नागिणी-सारखी वेणी, सोन्याच्या दोन दोन बिल्वरांनीं झळाळणारा हिरवा चुडा, हृदयाशीं मनोज्ञ संवेदना देणारी मोत्यांची माळ, हाल्तींडोल्तीं कर्णभूषणं अन् या सर्वां-पेक्षांहि माझ्या गव्हाळी लांबट मुद्रेवर चढलेली लग्नाची कळा, असा हा माझा रुबाब पाण्याच्या पोटांत कळ उठवील असाच होता ! नळाकडच्या दोन अंधाऱ्या खोल्यांत रुटुखुटु संसार चालवणाऱ्या नगरपालिकेतल्या एका कारकुनाच्या मुलीचं बोल बोल म्हणतां एवढं स्थित्यंतर व्हावं, कालच्या सुरवंटाचं फुलपाखरूं बनून आंगणांत नाचायला यावं, हें सगळ्यांच्याच कल्पनेला धक्का देणारं आश्चर्य होतं. इतरांचं कशाला ? मीसुद्धा त्या आश्चर्याच्या सागरांतून अजून वर आलें नव्हतें. माझं मलाच कित्येकदा हें खरं वाटत नव्हतं. माझे आईवडीलहि अजून त्यांतच गटंगळ्या खात राहिले होते. ज्याच्याजवळ जाऊन सरळ पाहायचासुद्धा धीर होऊं नये,

अशा एका जिमखान्यावरच्या बंगल्यांत त्यांची थोरली मुलगी अचानक जाऊन पडली होती. उपरी म्हणून नव्हे, घररिघी म्हणून नव्हे; तर मालकीण म्हणून!

माणसाचं दैव एकदम इतकं पलट खातं का, याबद्दल माझा मलाच संभ्रम पडतो. भवितव्याचीं द्वारं सगळीकडे असतात म्हणतात, तें खरं मानावं लागतं अशा वेळीं. केव्हां कोणतं खुलेल आणि आपल्याला सुखाच्या राशीवर चढवील किंवा दुःखाच्या खाईत लोटील तें कळणं कठीण. त्या दिवशीं आम्हा मैत्रिणींचो पुरंदरची सहल ठरते काय, आम्ही जातों काय, गडावर हिंडतों काय...आणि...

आधीं मी जायलाच तयार नव्हतें. इच्छा नव्हती असं नाहीं; पण नुसती इच्छाच काय उपयोगाची? अडीचतीन रुपये काढायचे झाले, कीं भाऊंचा चेहरा दुर्मुखणार हें मला ठाऊक होतं. असे आल्तूफाल्तू पैसे उधळण्याची ताकद असती तर त्यांनीं मला कॉलेजमधें नसतं का घातलं? या गोष्टी मला समजत होत्या आणि म्हणूनच 'मला नाहीं ग बाई जमायचं!' म्हणून मीं मैत्रिणींना पहिल्याच शब्दाला झाडून टाकलं. मी बधत नाहींसं पाहून त्या माझ्या आईकडे आल्या. त्यांनीं आईला गळ घातली. 'मंगलेवांचून आमची सहल अगदींच मिळमिळीत होईल' म्हणून तिचा अभिमान जागृत केला. आईनें तोच अर्ज आपल्या अनुकूल शेऱ्यासह भाऊंच्यापुढें गुदरला. भाऊ नाखुशीनें का होईना; पण कबूल झाले. नकळत मीं उत्साहाची टाळी दिली आणि दुसऱ्या दिवशीं पुरंदरच्या पायथ्याशीं उतरल्यावर मीच सगळ्या मैना-कोकिळांची म्होरकी झालें.

मोकळी हवा, सोनेरी उन्हं, मागूनपुढून अंगचटीस येणारा वारा, समोरचा तुकड्या-तुकड्यांनीं हिरवा दिसणारा पुरंदरचा डोंगर, डाव्या हाताचं रुद्रमाळाचं तें काळं, झाडीनें वेढलेलं शिखर, असं सगळं चैतन्याचं वातावरण आमच्याभोंवतीं पसरलं होतं. त्यामुळें सगळ्या मुलींचीं तोंडं दंवबिंदूंत न्हालेल्या कुंदीच्या फुलांगत एकदम टवटवलीं. मी तर वारं प्यालेलं वासरूंच बनलें. मधल्या उभ्या आडवाटा धरीत, मधून मधून मुख्य रस्त्याला काट मारीत आम्ही दमछाट होऊं न देता माचींत पोंचलों.

माचीच्या प्रवेशद्वारावरच्या बुरुजावर चढण्यांत मीच अग्रेसर झालें. अरुंद उभ्या पायऱ्या अन् धरायला एकच लोखंडी नळी असं तें अवघड काम होतं.

तिथला रखवालदार 'नको नको' म्हणत असतांहि मी वर गेलेंच. डोंगरांत गेलं कीं माणसाला त्याहून अधिक उंच होण्याची उकळी येते कीं काय नकळे! मला तसं झालं. मी वाटोळी फिरून अष्टदिशा खूप लांबवर न्याहाळल्या. तें अफाट दर्शन माझ्या एकटीच्या डोळ्यांत नि काळजांत मावेना. मी तिथूनच मुलींना हाकारलं.

"अग, वर या ना! पहा तरी एकदा! कित्ती कित्ती मज्जा आहे...भारीच बाई भितुरड्या तुम्ही..."

त्या दिवशीं पुरंदर बराच गजबजला होता. आमच्या आधीं कांहीं टोळकीं वर चढलीं होतीं अन् आमच्या मागूनहि कांहीं येत होतीं. चारपांच तरुणांचं एक टोळकं तर आमचा पालव धरूनच हिंडत होतं. त्यांतहि तो एक उमट चेहऱ्याचा, सडपातळपणामुळें आहे त्यापेक्षां अधिक उंच वाटणारा, गुलजार कांतीचा तरुण— त्यानं तर आपण आणि आम्ही यांच्यामधलं अंतर कधींच वाढूं दिलं नाहीं. उलट तें कमी कमीच करीत आणलं.

आम्ही पद्मावती तळ्यावर जाऊन थोड्या विसावलों तर त्यालाहि त्याच पाण्याची तहान! आम्ही कंदकडा टेकडी चढलों तर हाहि पाठोपाठ तिथें येऊन कॅमेरा डोळ्याला लावून उभा! आम्ही म्हसोबाच्या टांक्याकडे उतरलों तर त्याचाहि विचार तोच. या कामीं आपले मित्र मागें राहिले तरी त्याला त्याची खंत नव्हती. आकाशांत मृगाच्या मागून व्याध तसा तो अविश्रांतपणें आमचा मागोवा घेत होता.

इतर मुलींपेक्षां मला त्याचा पाठलाग अधिक जाणवूं लागला. त्याचा डोळा विशेषतः माझ्यावरच होता. अगदी मीं माचींतल्या बुरुजावर एकटी चढलें त्या क्षणापासून. मधेच तोंड वळवून ओठांवर स्मिताची रेषा कायम ठेवून तो मित्रांशीं बोलत होता, तेंहि माझ्याविषयींच असलं पाहिजे हें मीं ताडलं होतं. तो जें लपवूं पाहात होता तेंच मला स्पष्ट दिसत होतं.

मला जी मृगाच्या मागून धावणाऱ्या व्याधाची कल्पना सुचली, त्याला एक विशेष कारण होतं. त्यानें ज्या लिंबोणी चिटाचा बुशशर्ट घातला होता, त्यावर सर्वत्र शिकारीचंच चित्र छापलेलं होतं. एक हरिण गवतांतून पुढें पळत आहे अन् एक टोपीवाला शिकारी बंदूक सावरीत त्याचा माग काढीत आहे. त्याच्या

आत्ताच्या वृत्तीला शोभण्याजोगंच तें चित्र होतं. मीं मनांत म्हटलं, ‘ कुठली पीडा माझ्या मागें लागली ही कोण जाणे ! ’

आतां केदारेश्वर हें आमचं एकमेव दर्शनीय स्थळ शिल्लक उरलं होतं. त्या सर्वांत उंच टेकडीच्या बहात्तर पायऱ्या, पऱ्यांच्या पंखांनीं चढून आम्ही वर पोंचलों. देवळांत जाऊन ‘ शंभोऽऽहर ’ म्हटलं तर आवाज घुमून आमच्याच कानांत घुसला. बाहेर येऊन पाहतों तर आग्नेयोला बुधल्याचा डोंगर उन्हांत न्हात होता. उत्तर बाजूच्या गिरिमालेवर छाया-प्रकाशांचा थाट मांडला होता. खालच्या मैदानांतून वृक्षांच्या आडोशानं लपतछपत वळणावळणांनीं वाहणारी नीरा नदी संकेतस्थळीं जाणाऱ्या अभिसारिकेसारखी दिसत होती. माचींतून जाणारा रस्ता त्या उभ्या पुरंदरचा करदोटा बनून पुरा झाला होता. हें सगळं विशाल दृश्य पुरंदरेश्वरा-भोंवतीं हिंडून आम्हीं मनसोक्त पाहिलं. माझ्या सुखाची, हर्षाची जणूं पुनव झाली.

पण चंद्राला ग्रहण लागतं तें पुनवेलाच. तो राहु आमच्या मागून नेमका तिथें उगवला. त्याचे ते लुब्ध डोळे, मला पाहूनच नव्हे; तर पिऊन घेण्याची त्यांतली ती अभिलाषा—मी संकोचानें अगदीं आक्रसून गेलें. माझ्या कळा एकाएकीं क्षीण झाल्या. तो त्या उंच जागेवरून कांहीं फोटो घेत होता. तें पाहून आमच्यांतल्या एका ‘ हौशी ’च्या तोंडाला पाणी सुटलं. लाजलज्जा गुंडाळून तिनें त्याला विचारलं. ‘ आमचा सगळ्या जणींचा एक फोटो काढतां का हो ? ’

मीं लगेच तिच्या दंडाला चिमटा काढून तिला झिडकारलं.

“ काय चावट आहेस ग ! तुला कांहीं भाडभीड— ”

“ त्यांत काय झालं ? आपण स्टूडिओंत जाऊन नाहीं वाटतं फोटो काढीत ? पुरंदरावरची आठवण म्हणून असूं दे कीं ! ”

त्याला आमच्याजवळ यायला कांहींतरी निमित्त हवं होतं तें आयतं मिळालं. तो पुढें आला अन् सगळ्या जणींवर नजर फिरवून शेवटीं ती माझ्यावर स्थिर करीत मलाच उद्देशून म्हणाला.

“ तिकडे उन्हाच्या बाजूला चला. ती नंदीच्या चौपाळ्याची जागा सुंदर आहे. त्या पार्श्वभूमीवर छान फोटो येईल. ”

त्याच्या शब्दांत उमदेपणा होता. शब्द आणि आकृति यांचा संवाद जुळत होता. इच्छा नसतांहि त्याचे शब्द माझ्या कानाना सुखावून गेले. पण मनाची

तक्रार मात्र थांबली नाहीं. ' यानें माझी अशी शिकार कां म्हणून चालवावी ? चावटपणा नाहीं तर काय ! ' त्यामुळें सगळ्या मुली भराभर उठल्या तरी मी मात्र बसलीच राहिलें. सगळ्या जणींनीं मला ओढलं, उचलल्लं, हिणवलं, खिजवलं, तरी मीं कश्शाकश्शाला दाद दिली नाहीं. शेवटीं त्या चिडल्या. त्यांनीं मग माझा अन् फोटोचाहि नाद सोडून दिला.

हा सगळा प्रकार तो निश्चल उभा राहून पाहात होता. मैत्रिणींच्या हौसेवर मीं विरजण घातलं याचं मला वाईट वाटलं खरं; पण त्याच वेळीं त्या आगाऊ तरुणाचा मुखभंग केल्याचं समाधान मीं उपभोगलंच. फोटोच्या निमित्तानें तो मला समोर उभी करणार होता, आपादमस्तक न्याहाळणारा होता अन् शेवटीं आपल्या कॅमेऱ्याच्या डबड्यांत भरून खांद्याला लटकावीत घेऊन जाणार होता. तो फोटो, त्यांतली माझी छबी, त्याच्या मालकीची होणार होती. हवी तेव्हां खोक्यांतून बाहेर काढावी, हवी तितकी न्यहाळावी अन् हवं तर...

पण —

त्या दिवशीं पुरंदरावर मानीपणानें मीं ज्याला झिडकारलं, त्याच्याच पुढें पुढच्या पंधरा दिवसांतच मला मुंडावळ्या बांधून उभं रहावं लागलं ! मीच माळेच्या रूपानें प्रथम त्यांच्या गळ्यांत पडलें. माझ्या गळ्यांत माळ घालतांघालतां त्यांनीं मला हंसून खुणेचा शब्द विचारला. ' आतां तरी फोटो काढायचा का ? ' माझ्या मनांत आलं, ' ही डूख तर नव्हे ना ! हा सूड तर नसेल ना ? ' पण त्यांच्या डोळ्यांत तसलं कांहीं नव्हतं. होता तो खेळकर उमदेपणा !

लग्नाला आलेले लोक प्रश्नचिन्हांकित दिसले. अण्णासाहेब दात्यांसारख्या बड्या कुळानें म्युनिसिपालिटींतल्या कारकुनाशीं सोयरीक जोडावी हें सर्वांनाच अघटित वाटत होतं. पण अण्णासाहेबांना तरी हें मनांतून कुठें हवं होतं ? त्यांचा निरुपाय झाला त्या बाबतींत. मुलगाच हट्ट धरून बसला. कोणत्याहि अन्य आमिषाला तो बधेना ! अखेर अण्णासाहेबांना आमच्या भाऊंची ओळख काढावी लागली. आपला आब राखण्यासाठीं एक मध्यस्थ पुढें घालावा लागला. भाऊंनीं मुलगी सांगायला त्यांच्या घरीं जावं, असं नाटक घडवून आणावं लागलं.

भाऊंना मात्र हें पसंत नव्हतं. मुलगा पसंत होता, स्थळ पसंत होतं, सगळं कांहीं अपेक्षेच्या बाहेर चांगलं होतं. पण ही सोयरीक आपल्याला डोईजड होईल म्हणून

ते आढेवेढे घेत होते. शेवटीं आईला तोंड उघडावं लागलं. ‘पोरीच्या नशिबांत पालखीपदस्थ व्हायचं असलं तर तुम्ही त्यांत आडमेळं आणूं नका.’ मग भाऊ त्या मध्यस्थाबरोबर गेले. सगळं पाहून, बोलून आले. अशा ओढूनताणून जुळवलेल्या लग्नसंबंधांत वरपक्षाच्या अटी त्या काय असणार! ‘सगळी मांडव-शोभा आम्ही करूं; तुम्हांला शक्य असेल तें तुम्ही करा अथवा करूं नका.’ मामंजी भाऊंना म्हणाले. आणि मग एका शुभ मुहूर्ताला आमची ‘सावधान-घटिका’ बुडली.

या लग्नांत हे उल्हासित होते. कारण त्यांचा मनोरथ पुरला होता. मामंजी उदासीन होते. ‘मुलाच्या मनासारखं झालं ना? आपण सुटलों. आतां तो अन् त्याचं नशीब!’ अशासारखी त्यांची मुद्रा दिसत होती. सासू मात्र मनांतून सारखी चडफडत होती. तिला हा संबंध मुळींच पसंत नव्हता. रडतराऊत घोड्यावर बसवावा तशी ती कार्यालयांत आली होती. तिला तिच्या तोलाची विहीण हवी होती–तशीच लठ्ठ, तशीच उठवळ, तशीच तालेवार, तशीच दागिन्यांनीं मढलेली, तशीच शालू-पैठण्यांनीं झळकणारी. मग तिला ती नवऱ्या-मुलाची आई या नात्यानें पदोपदीं नमवणार होती. प्रत्येक गोष्टींत तिचं उणं पहाणार होती. आमची आई बिचारी आधींच कमरेंत वाकलेली अन् बड्या माणसांशीं संबंध आल्यामुळें अधिकच भारावलेली! ती विहिणीपुढें खालच्या मानेनेंच राहिली होती. तिला तें आणखी काय नमवायचं? सासूचा जळफळाट होत होता तो या गोष्टीबद्दल!

अन् मी?...मला याहून आणखी काय हवं होतं? त्या कार्याच्या झगझगाटानें माझे डोळे दिपले होते. मला थोडा कैफहि चढूं लागला होता. मी ह्यांच्या शेजारीं बसलेली असूनहि त्यांना घेऊन पुनश्च पुरंदरावर पोंचलें होतें. ‘फोटो काढायचा आहे ना? मग कुठें उभीं राहूं? इथें? का तिथें?’

पण माझ्या या फुललेल्या वृत्तीवर चुरका देणारी गोष्ट त्याच वेळीं, त्याच मांडवांत घडली. मुहूर्ताच्या वेळीं येऊं न शकलेले मामंजींचे कांहीं मित्र मागाहून पानसुपारीसाठीं आले होते. मामंजी त्यांच्याशीं बोलत बसले होते. आमची बोहल्यावर सप्तपदी चालली होती. एवढ्यांत कुणीं तरी मामंजींना विचारलं.

“तुमचे व्याही कोणते?”

" ते...पाठीला पोक काढून चालणारे काटकुळे काळे गृहस्थ..." आणि मग या संबंधाविषयीं बोलतां बोलतां मामंजींनीं समारोपादाखल एक संस्कृत वचन उच्चारलं. ' स्त्रीरत्नं दुष्कुलादपि !'

मला तें ऐकूं गेलं अन् झोंबलं ! तें सुभाषित नव्हतं, तर माझ्या मर्मावर घाव होता. भटजींनीं मला सहाणेवर पाय ठेवायला सांगितला; पण तो कांहीं केल्या स्थिर होईना ! मला वाटलं, कीं साऱ्या शक्ति एकत्र करून तिथूनच ओरडावं. ' मामंजी, भलतंसलतं कांहीं बोलूं नका. मी दुष्कुलांतली नाहीं ! माझं कुळ तुमच्याइतकंच सोज्ज्वळ आहे, पवित्र आहे. माझे आईवडील गरीब असतील, फाटके असतील; पण त्यांनीं कुळाला कधींहि बट्टा लावला नाहीं. मी सत्कुलांतली आहें ! ...'

खरं म्हणजे तें वचन माझ्याइतकंच ह्यांच्याहि मनाला लागायला हवं होतं. मीं त्या दृष्टीनें त्यांच्याकडे पाहिलं. पण तिथें तो बाण चाटूनहि गेला नव्हता. ते नुसते हसत होते. माझ्या डोळ्यांतलं पाणी पाहून विचारीत होते. ' धूर लागला का ?'

मामंजींचा हा प्रकार, तर सासूचा तो ! तिनें त्या दिवशीं वरमातेचा एकहि सोपस्कार अंगीं लावून घेतला नाहीं. नाहीं म्हटलं तरी भाऊंनीं दोनशें रुपये हुंडा म्हणून ह्यांच्या हातावर ठेवले होते. पण आमची सासू तो कोपऱ्यांतला केर समजत होती. संध्याकाळीं वरात निघण्यापूर्वी आईनें लुगड्याची घडी मोडून तें तिच्या हातीं दिलं. तिनें तें घेतलं; पण मोठ्या जड हातानें. कुणी तरी तिच्याच मैत्रिणीपैकीं म्हणालं. ' विहीणबाई बऱ्याच जड झालेल्या दिसतात आज.'

त्यावर तिनें भाष्य केलं. ' अहो, डाव्या हातानें आधीं पुढें करायचं अन् उजव्या हातानें तेंच परत घ्यायचं. ह्यांत कसला आला आहे मानपान ? कोनाड्यांत दिवा ठेवून त्याच्याभोंवतीं तोंड ओवाळून घेण्यासारखंच चाललं आहे हें सगळं !'

ती म्हणाली तें खरं होतं. तिला त्या कार्यांत सुख नव्हतं. मुलाचंच लग्न म्हणून ती जड अंगानें, जड मनानें तिथें वावरत होती. तिच्या शब्दांत बोलायचं तर मी ' कारकुंड्याची मुलगी.' त्यांच्या आचाऱ्याची बायको म्हणून अथवा त्यांच्या कारकुनाची बायको म्हणून मी त्यांच्या घरांत गेलें असतें, तर तें योग्य होतं. कारण ती अन् तेवढीच माझी योग्यता असं ती मानीत होती. पण मी झालें होतें त्यांच्या

मुलाची बायको ! त्यांची स्वतःची सख्खी सून: अन् त्याच्या स्थावर-जंगमाची त्यांच्याबरोबरोची मालकीण ! जी कल्पनासुद्धा तिच्या नाजुक प्रकृतीला सोसणं शक्य नव्हतं, तें प्रत्यक्षांत आतां तिला बघावं, भोगावं लागणार होतं—केवळ मुलाचा वेडगळ हट्ट म्हणून. त्यामुळें पदरीं पडूनहि मी तिला पवित्र झालें नव्हतें.

या सगळ्या गोष्टींमुळें सूर्य जवळ असूनहि माझी कमलिनी मलूल झाली होती. वरातींत माझ्याभोंवतीं, मागेंपुढें सर्वत्र प्रकाशच प्रकाश होता; पण मन मात्र अंधारानें ग्रासलं होतं. जिथें माझी आई, माझे भाऊ, माझीं भावंडं, कधींहि पोंचूं शकणार नाहींत अशा कुठल्या तरी दुर्गम शिखरावर मी जात आहें, असं मला वाटलं. त्या सासूला मी घाबरलें होतें. ती मला यापुढं सारखी निरखंदीत राहणार, यांत दुभाव नव्हता. आणि तेंच मला जड जाणार होतं. तिनें मला घाण्याला जुंपलं तरी चालेल, पण मला हिणवूं नये, माझ्या आईबापांचं दैन्य वर काढूं नये, एवढीच माझी साधी अपेक्षा होती. आणि याच विचारचक्रांत मी गुरफटलें होतें.

पण त्या वरातीच्या सजवलेल्या मोटारींत हे आणखी थोडे माझ्याजवळ सरकले अन् त्यांनीं माझं लक्ष ओढून घेतलं.

“ बँडवाले काय वाजवताहेत ठाऊक आहे—‘ माझिया प्रियेऽऽचें झोपडेंऽऽ !’ पण माझी प्रिया आतां झोंपड्यांतून बंगल्यांत चालली आहे म्हणावं. आतां झोंपडं मागें पडलं ! ”

सहज म्हणून ते बोलले असतील; पण ते शब्द माझ्या मनानें निराळ्या अर्थानें लावून घेतले. माझ्या अंतरांतल्या विषादाला त्यांनीं ‘ टॉनिक ’ दिलं. ‘ हे नव्या पिढींतले, नव्या जमान्यांतले ; पण यांचीहि वृत्ति सासू-सासऱ्यांसारखीच आहे का ? झोपडीचा तिरस्कार अन् बंगल्याचा बडेजाव ! ’

घरभरणी लागून थोडं स्थिरस्थावर झाल्यावर त्यांनीं मला खूण करून माडीवर बोलावलं. मला घेऊन ते एका खोलींत गेले अन् म्हणाले.

“ ही राणीसाहेबांची स्वतंत्र खोली. आवडली ना ? इथें मालकी आपली. आम्हीसुद्धा आंत यायच्या वेळीं बाहेरून दारावर टिचकी वाजवून विचारूं. ‘ मे आय् कम् इन् ? ’ मग राणीसरकारची मर्जी लागली तर त्यांनीं दार उघडून म्हणावं, ‘ येस् , कम् इन्. ”

नकळतच मला हसूं आलं. ' एवढंच कशाला ? ' इत इतो देवः ' सुद्धा म्हणेन कीं ! ' मीं म्हटलं. ती खोली एकदम माझ्या मनांत भरली. मी आंत शिरतांच पश्चिमेच्या वायुलहरीनें ' ये सखि ! मी तुझ्या सेवेला सदा सिद्ध आहें ' म्हणून माझं स्वागत केलं. तिथें माझ्यासाठीं पलंग होता. त्यावर मऊ मऊ गादी होती. अन् वर स्वच्छ मच्छरदाणीहि होती. खिडक्यांना पडदे होते, आरशाचं कपाट होतं, खुर्ची होती, टेबल होतं, सगळं कांहीं होतं. स्वतःची खोलीच त्यांनीं माझ्यासाठीं सोडून दिली होती.

मला वाटलं, सासूसासरे कसेहि असोत ; पण हे वेगळे आहेत. ज्याच्याभोंवतीं मी रिंगण घालायचं तो माझा मूळस्तंभ उदार आहे. तो मला हिणवणार नाहीं. ' स्त्रीरत्नं दुष्कुलादपि ' असले शब्द त्याच्या मुखांतून कधींहि निघणार नाहींत. हा विश्वास त्यांच्या त्या अल्पशा सहवासांत माझ्या मनांत निर्माण झाला आणि सगळे विकल्प एकदम मावळले. त्या वेळीं माझ्या रूपानें त्या खोलींत रातराणी बहरली, दरवळली. मग त्यांना माझी आणखी थट्टा करण्याची लहर आली.

" सकाळपासून तुला पुष्कळांनीं अहेर केले ; पण अजून घरचा अहेर राहिला आहे अन् तो आतां मी करणार आहें ! "

" घरचा अहेर या शब्दांना एक निराळाच अर्थ आला आहे, ठाऊक आहे ना ? "

" आला असेल ! पण आपण आपला मुळांतलाच अर्थ घेऊं. "

त्यांनीं कपाट उघडून पातळ कागदांत गुंडाळलेला एक पुडा माझ्या हातीं दिला. उलगडतें, तर माझाच फोटो. सेपिया रंगांत वाढवून मोठा केलेला. पुरंदर किल्ल्यांतल्या राजगादीवरचा माझा पराक्रम त्यांत दिसत होता.

" मला फोटो काढूं देत नव्हतीस, नाहीं का ? भाव आला होता तुला त्या वेळीं. पण मीं मात्र तुझा माग सोडला नव्हता. तुम्ही सगळ्या मुली राजगादी-पठाराच्या खालीं आलांत. वर चढायची सोपी वाट होती दुसऱ्या बाजूनें. तुम्ही उभ्या होतां ती बाजू दुर्गम होती. पुष्पा का कोण ती तुझी मैत्रीण म्हणाली, ' या बाजूनें कोण चढेल वर ? ' तूं म्हणालीस, ' मी चढतें. ' ती म्हणाली, ' अग चल. म्हणे मी च्यडेन ! ' तूं म्हणालीस, ' असं का ! दाखवतेंच तर चढून. ' अन् मग तूं पदर बांधलास. तियें उगवलेलं एकेक झुडूप धरून पुढें आलेल्या दगडांच्या कपारीवर एकेक पाय टेकीत घोरपडीसारखी त्या काळ्या घडेला

चिकटून वर चढूं लागलीस. तुझ्या त्या साळुंक्या घाबरल्या. 'मंगला, अग नको. खालीं उतर!' म्हणून चिवचिवाट करूं लागल्या. मी पण जरा कचरलों. म्हटलं, 'पोरगी घसरली तर जन्माची मोडून बसेल. पण अखेर तूं साधलंस. उजवा पाय पठारावर पडतांच एका हातांत झुडूप धरलेल्या स्थितींत मान मागें वळवून अन् उजवा हात उभारून तूं मैत्रिणींना म्हणालीस, 'पहा, चढलेंच का नाहीं!' नेमकं त्याच वेळीं मीं तुला माझ्या कॅमेऱ्यांत पकडलं. अन् त्याच वेळीं निर्धार केला, कीं 'लग्न करायचं तर याच आधुनिक झांशीवालीशीं करायचं. आपल्याला त्या कातीव बाहुल्या नकोत!...''

माझा विजयोन्माद, विस्कटलेल्या केसांची भुरभुर अन् गालावरची घर्मरेषा, सगळं कांहीं त्यांत आलं होतं.

आज माहेरीं येतांना आईला दाखविण्यासाठीं म्हणून तो फोटो बरोबर घेऊनच मी आलें होतें. आजची रात्र आम्हा मायलेकींची होती. उद्या दुपारीं ते माझ्या माहेरीं जेवायला यायचे होते. भाऊ रीतसर बोलावणं करून आले होते. मीं आग्रह करून कबुली घेतली होती. लग्न झालं तें परस्पर कार्यालयांत. आईचं त्यानें समाधान झालं नव्हतं. एकदा तरी जांवयानें आपल्या घरीं येऊन हात उष्टा करून जावं, अशी तिची इच्छा होती. आणि त्यासाठींच तिला मदत करण्याचं निमित्त करून मी आज माहेरीं आलें होतें.

मी आलें म्हणजे आईच्या घरट्यांतलं उडून गेलेलं पिल्लूंच आलं. बोलतां-बोलतां आम्ही दुसऱ्या दिवशींचे बेत केले. श्रीखंड करायचं का बासुंदी, काळा भात वांग्याचा का तोंडल्याचा, भाज्या कसल्या, कोशिंबिरी कसल्या, अशी सगळ्या बारीकसारीक पदार्थांचीसुद्धा चर्चा झाली.

सकाळीं उठून मी आईच्या मदतीला लागलें. बटाटे शिजत लावण्यासाठीं टोपलं खालीं काढलं तर आई म्हणाली. 'सरमिसळ घेऊं नको. निवडक अन् वाटोळे असतील तेवढेच काढ.'

"अग, लहान काय, मोठे काय, शेवटीं चिरल्यावर त्यांच्या फोडीच व्हायच्या ना!"

आई नुसती हसली. माझ्या या प्रश्नाला तिच्याजवळ उत्तर नव्हतं. ती बुद्धीनें मुळी बोलतच नव्हती. पेरांच्या मळणींत बीं नसतं, तसा भावनेच्या बोलण्यांत

युक्तिवाद ! पण तें निरर्थक बोलणं तुळशीच्या मुळांत पाणी घालावं तसं मला मानवलं. मीं त्या दिवशीं कामासाठीं चार हात लावले होते. मी घरांत तर वावरलेंच अन् बाहेरच्या खोलीचाहि एका घटकेंत कायापालट करून टाकला.

आज मी कमालीची उल्हसित होतें. माझ्या मुद्रेवर जणूं दुधाचा फेस पसरला होता. आज हे येणार होते ना ! सासरीं होणारं दर्शन अन् माहेरीं होणारं दर्शन यांत फार मोठं अंतर असतं. भक्ताच्या घरीं देव येणं याची गोडी कांहीं निराळीच...

अकरा वाजतांच ताटपाट करून मी रांगोळी घालायला बसलें. एक रेघ ओढावी, ती सरळ पाहावी, तिरप्या मानेनं पाहावी, वाकडी बेडौल दिसली तर पुसून पुन्हा काढावी, असं माझं चाललं होतं. गरिबाचं घर खरं; पण इथेंहि थाटमाट आहे हें मी त्यांना दाखवणार होतें. माझ्या हृदयांतल्या कोमल, अल्लड भावनाच जणुं त्या रांगोळींत वेलपत्तीचा आकार घेत होत्या. मला वाटलं, हिच्यावर गुलालाची नाजूकशी उधळण म्हणजे भक्तीवर अनुरागाची लाली...

साडेअकराच्या सुमाराला वाड्यापुढें मोटारीचा पोंगा वाजला. एकदा, दोनदा, तीनदा. पोरं पळत गेलीं अन् पळत आलीं. हे आल्याची बातमी त्यांनीं आणली. मी लगेच पुढें धावलें.

" हें काय, उतरायचं नाहीं का ? "

" थांब, तुला आधीं ओळख करून देतों. हा माझा मित्र प्रफुल्लकुमार. मुंबईला असतो. लग्नाच्या वेळीं नुसती तार ठोकलीन् अन् आतां आला आहे वरातीमागून घोड्यासारखा...अन् या आमच्या सौ.... "

त्या ओघळलेल्या गालांच्या, लठ्ठ, गोऱ्या तरुणाला नमस्कार करून मीं ह्यांना म्हटलं. ' तुम्ही यांनाहि आणलंत तें बरं झालं. आतां पंगतीला रंग येईल. '

" याला मीं आणलं नाहीं. यानेंच मला आणलं आहे. तो आज आपल्याला लग्नाचा खाना देणार आहे—कँपांतल्या म्युरेटोर हॉटेलांत. तुला आतां आमच्याबरोबर यायला हवं. ताबडतोब तयार होऊन ये. "

" म्हणजे ? "

" म्हणजे-बिणजे कांहीं नाहीं. पळ लवकर. पांच मिनिटांत हं ऽऽ ! "

मी चकित झालें; काष्ठपुतळी बनलें. माझे दोन्ही हात टॅक्सीच्या दारावर तसेच घट्ट राहिले. असं कसं व्हावं अन् कां व्हावं हेंच मला कळेना. योजलेल्या बेतावर

पाणी पडणारसं पाहून माझं तोंड चिमणीएवढं झालं. मीं त्यांना अजीजीच्या स्वरांत म्हटलं.

" आईला, भाऊंना काय वाटेल ?"

" त्यांचं जाऊं दे ग ! तूं आतां अधिक ओढून धरूं नकोस; आम्हांला उशीर होतोय्."

त्यांच्या त्या शब्दांनीं मला जणूं ढकलून दिलं. मी घरांत आलें. आई बटाट्यांच्या चकत्यांचीं भजीं कढईत टाकीत होती. तिनें मला दबल्या स्वरांत विचारलं, ' आले का ग ?'

" आले अन् नाहीं, दोन्हीहि !"

" तूं तरी विचित्रच दिसतेस !"

" आई, तूं श्रीमंत कां झाली नाहींस ग ?"

" हा काय तुझा वेड्यासारखा प्रश्न ! श्रीमंत होणं या दैवाधीन गोष्टी आहेत. पण आहे त्यांत कोंड्याचा मांडा करणं, हाताशीं असेल तें साजरं करून घेणं, एवढंच फक्त माणसाला करतां येईल."

" पण तें सगळ्यांनाच नाहीं रुचत."

मीं साडी बदलतां बदलतां तिला सगळं सांगितलं. पण तेवढ्यावर तिचा जीव स्वस्थ बसणार होता थोडाच. ती मला म्हणाली, ' जा, त्यांना सांग, सगळं तयार आहे. दोन घास खा अन् जा म्हणावं.'

" तें नाहीं जमायचं आई. त्यांना प्रेमाचं भोजन नको आहे ; ते मोलाचं जेवण जेवायला चालले आहेत. अन् मी पण त्यांच्याबरोबर !"

तिचा हात तिथल्या तिथें थांबला. ती माझ्या धांदलीकडे बघतच राहिली. मला तिची काकळूत आली. पण माझा तेवढा अधिकार होता कुठें ? फणी-करंड्याची पेटी पुढें ओढून कुंकू-पावडर लावायला बसलें असतां आरशांत माझं रूपडं मला जें दिसलं तें कमालीचं अप्रसन्न होतं. डोळ्यांतहि अढी भरली होती. मला एकदा वाटलं, हे मला आधुनिक झांशीवाली म्हणतात. दाखवूं का मग एकदा झांशीवालीचा अवतार ? सांगूं का यांना स्पष्ट शब्दांत, कीं ' गरीब असोत, कशीहि असोत ; पण तीं तुमचीं मोठीं माणसं आहेत. तुम्हीं त्यांचा अपमान

करतां कामा नये. उतरा आधीं खालीं. जेवा अन् मग मला घेऊन कुठें ते चला! इतकंहि असून तुम्ही जाणार असाल तर खुशाल जा. मी मात्र येणार नाहीं!'

पण हे सगळे आवेग नि उद्रेक मनांतच राहिले. मी तसं बोलूं शकलें नाहीं. माझ्या डोळ्यापुढं तो बंगला, ती स्वतंत्र खोली, तें वैभव, तो बडेजाव, हें सगळं सगळं उभं झालं. मी या सगळ्याला भुललें तर! स्वार्थी माणसाला कधीं स्पष्ट अन् निर्भीड बोलतां आलं आहे का? मला वाटलं, 'त्यांना गरिबाच्या मुलीशीं लग्न करतां आलं, तसंच तिचं दुसरंहि काय हवं तें करतां येईल! अन् मग...'

मी मुकाट्यानें जाऊन मोटारींत बसलें.

आमची टॅक्सी सरळ हॉटेलच्या दारापाशीं जाऊन थांबली. आम्ही आंत गेलों. परिचारिकाचा सलाम घेत टेबलाभोंवतीं बसलों. त्यानें पदार्थांच्या यादीचं छापील पत्रक आमच्यापुढें आणून ठेवलं. मग 'फर्माईश' झाली. पदार्थ चिनी मातीच्या तसराळ्यांतून पुढें आले. काटे-चमचे मांडले गेले. यांनीं ते लगेच उचलले. मला काट्याचमच्याची कधीं सवय नव्हती; म्हणून मी स्तब्धच राहिलें. दुसरं कारण म्हणजे मला त्या अन्नाबद्दल प्रेमच निर्माण झालं नाहीं. ह्यांना माझी ती स्तब्धता दिसली. त्यांनीं मला मग काट्याचमच्यांची दीक्षा द्यायला प्रारंभ केला. कुकुल्या बाळाला आई जेवायचं शिकवते तसं ते मला शिकवूं लागले. माझ्या हातांतला कांटा त्यांनीं कटलेटमधें दाबला. मला तो माझ्या काळजांतच खुपसल्यासारखं वाटलं. तो पदार्थ कशाचा बनवला होता देव जाणे! जिभेवर घोळवतें तोंच माझ्या पोटांत मळमळून आलं...

जेवतांना ह्यांनीं 'आमच्या लग्नाच्या गोष्टी आपल्या मित्राला तपशीवार ऐकवल्या. 'आमच्या कॉमर्सच्या घोड्यानें पेंड खाल्ल्यानंतर आतां सासऱ्यांच्या वशिल्यानें म्युनिसिपालिटींत तरी हमखास नोकरी मिळेल!' म्हणून वर विनोदहि केला. त्या विनोदाला त्यांच्याबरोबर मींहि हसावं, अशी त्यांची अपेक्षा दिसली; पण माझा निरुपाय झाला. 'तात्पर्य, ही आमची पुरंदरची शिकार आहे!' असा जेव्हां त्यांनीं समारोप केला, तेव्हांहि मी तशीच मूकस्तंभ राहिलें. तेवढ्यावरूनच मला कळलं, कीं हेसुद्धा आईबापांच्याहून वेगळे नाहींत. बायको म्हणून बरोबर मिरवीत असूनहि मी गरिबाची मुलगी आहें, हें ते विसरूं शकत नाहींत.

मी त्याच्या त्या उदरंभरणाकडे हात थांबवून पाहात होतें. ते पदरचं जेवीत होते अन् नदरचंहि जेवीत होते–रुचीनें अन् प्रौढीनें. आणि ह्यांच्यासाठीं माझ्या आईनें सकाळपासून जिवाची धांदल केली होती! तिनें ह्यांच्यासाठीं केशरी बासुंदी बनवली होती. प्रत्येक पदार्थ ती ह्यांना आग्रहानें वाढणार होती. हे पोटभर जेवल्यानें सुखावणार होती. ह्यांच्या तृप्तीनेंच तिचं पोट भरणार होतं....

तें घरचं चित्र माझ्या डोळ्यांसमोर आलं. भाऊ बारा वाजतां कचेरींतून घरीं आले असतील. हा प्रकार ऐकून त्यांचं अंतःकरण दुखलं असेल. भावंडं कानकोंडीं झालीं असतील. आई पुनःपुन्हा पदरानें डोळे टिपीत असेल. ती त्या षड्रस अन्ना-कडे केविलवाणें पाहात असेल. ती पानावर तरी बसली असेल का नाहीं देव जाणे! कशी बसेल? तिचा जांवई दारांत आला; पण घरांत आला नाहीं. तिची मुलगीहि त्यांच्या पाठोपाठ निघून गेली. ज्यांच्यासाठीं ती एवढी खपली होती, त्यांनीं तिच्या भावनांची मुळीसुद्धा कदर केली नाहीं. आतांसुद्धा पहा. हे खुशींत आहेत. आपण कांहींतरी चूक केली आहे, कुणाची तरी पायमल्ली केली आहे, याची पुसटशी रेषाहि यांच्या मुद्रेवर दिसत नाहीं!

जेवण झाल्यावर त्यांनीं मला कँपांतल्या अनेक दुकानांतून हिंडवलं. माझ्या-साठीं कापड अन् इतर बऱ्याच वस्तू खरेदी केल्या. ते विचारीत, 'हें आवडलं का?' मी पाहिलं न पाहिलंसं करून म्हणें, 'हूं!' त्यांना आपली शिकार सजवायची होती. माझं तोंड, माझं मन, सुखलेपानें बंद करून टाकायचं होतं. मला सर्वस्वीं मिंधं बनवायचं होतं.

हिंडूनसवरून आमची मोटार पुनश्च वाड्याच्या दाराशीं आली. त्या वेळीं चारांचा सुमार होता. मी जणूं तीन त्रिभुवनं हिंडून भागल्या जिवानें परत आलें होतें. मोटारींतून उतरतांना मीं वेड्या आशेनें यांना विचारलं. 'येणार का पांच मिनिटं? चहा घेऊन चला.'

"आतां सवड नाहीं. प्रफुल्लला आणखी एका ठिकाणीं जायचं आहे. सॉरी हं! एक्स्ट्रीमली सॉरी! माफ कर मला."

"त्यांत काय माफ करायचं!" मीं कडवटपणानें म्हटलं.

"तूं आतां येत असलीस तर पांच मिनिटं थांबतों आम्ही."

"मी थोड्या वेळानें येतें."

"अच्छा! टांगा करून ये हं! मी वाट—"

आणि त्यांची मोटार सुरू झाली. तिच्याकडे पाहता पाहतां नकळत माझ्या तोंडून त्यांच्याच शब्दांचा अनुवाद झाला. ‘ सॉरी !...एक्स्ट्रीमली सॉरी !...’ शब्द ! केवळ शब्द ! तेहि अंतःकरणातले नव्हते ; तर जिभेच्या टोकावरचे. केवळ बाजारी. रंगीत पण लाकडी फळांसारखे. ना रस, ना ओलावा ! ‘ थँक यू ’ म्हटलं कीं सुटले. ‘ सॉरी ’ म्हटलं कीं नामानिराळे झाले ! जें दारीं तेंच घरीं. तेंच बायकोजवळहि...

मी परत येतें तों आई घरांतून बाहेर पडत होती. फडक्यांत बांधलेले दोन डबे तिच्या पदराखालीं होते. मीं तिला विचारलं.

“ कुठें निघालीस ? ”

“ अग, तुझ्याच घरीं चाललें होतें. म्हटलं तूं परस्परच जाशील. जांवईबुवा आले नाहींत. म्हटलं न येवोत ! काय एवढंतेवढं केलेलं असेल तें त्यांच्या घरीं पोंचवून यावं. इथें नाहीं, तर निदान तिथें तरी त्यांच्या मुखीं लागूं दे...”

मीं तिच्या पदराखालचा डबा ओढून घेतला आणि उंबऱ्याजवळ आदळला. माझी आतांपर्यंत कोंडून राहिलेली वाफ त्या डब्यावर भपकारली अन् आईवरहि !

“ तुझ्या बासुंदीची तिथें किंमत नाहीं आई ! तीं मोत्यांचा चारा खाणारीं माणसं आहेत. तूं त्या फंदांत पडूं नको. झाली एवढी शोभा पुरेशी नाहीं का झाली तुला ? ”

खरं म्हणजे आईपेक्षां माझीच शोभा अधिक झाली होती. मी अपमानित झालें होतें. श्रीमंतीच्या तोऱ्याखालीं दडपलें गेलें होतें — गेले चार दिवस सासूकडून अन् आज खुद्द यजमानाकडून. माझी सहनशक्ति मोडली. मीं वळकटीच्या लोडावर धाड्कन् अंग टाकलं. आणि या ‘ आधुनिक झांशीवाली ’ ठरवलेल्या मुलीच्या तोंडून हुंदका बाहेर फुटला !

आई लगेच धावून आली. जवळ बसून माझ्या खांद्यावरून हात फिरवूं लागली.

“ काय झालं ग ? ” एका श्रीमंताच्या सुनेला आपल्या घरीं कांहीं व्हायला नको, अशा मुद्रेनें तिनें मला विचारलं.

मी म्हणालें.

“ दुसरं काय व्हायचंय् ? शिकार झाली माझी ! ”

★ ★ ★

# जंजिऱ्याच्या तटावरून

यशोदा तिन्हीसांजा हातपाय धुऊन नि वस्त्र बदलून हरताळकांची धुपारती करायला बसली होती. तिच्या पुढ्यांत पूजेचं तबक होतं. संध्याकाळीं तोडून आणलेल्या जुईच्या कळ्या आतां पूर्ण फुलून तबकभर झाल्या होत्या. नेणतं लेकरूं आईच्या भोंवतींच बागडत रहावं, तसा त्या फुलांचा मंद-मुग्ध सुगंध त्या तबकाभोंवतीं घोटाळत राहिला होता. यशोदेनें तीं फुलं हरताळकांना वाहिलीं, उदबत्ती पेटवून सोंगटीच्या छिद्रांत खोंचली, निरांजन लावून खडीसाखरेचा नैवेद्य दाखवला आणि पंचारती पाजाळून ती हरताळकांची आरती म्हणूं लागली—

**"आरती हरताळिके । कृपावंति हो माते**
**नारिया बसताती । त्यांसि काय तूं देसी**
**उदंड सौभाग्य । पुत्र, राज्य संपत्ति..."**

हें आंकडकडवं शेवटीं म्हणतांना तिचा गळा दाटला आणि डोळ्यांत पाणी जमलं, हें त्या दीपज्योतींनीं पाहिलं. आपल्या गोऱ्या, कृश हातांतून तिनें ती आरती खालीं ठेवली. मग ती थोडा वेळ गौरीकडे टक लावून बसली. त्या निरांजनाइतकीच तिची आत्मज्योत स्निग्ध होती. पण विचित्र विधिघटनांच्या काळ्या छाया तिच्यावर काजळी धरूं लागल्या होत्या. गौरीकडे या वेळीं ती कांहीं मागत नव्हती, कसलं गाऱ्हाणंहि सांगत नव्हती. ती त्या क्षणीं तरी सुख आणि दुःख या दोहोंपासूनहि अलग झाली होती. खूप सोसलेला आणि पुढें खूप सोसावं लागणार याची जाणीव असलेला, तिचा अंतर्यामी त्या क्षणापुरता तरी शांत, समाहित, निर्विकल्प झाला होता.

थोड्या वेळानें ती उठली. तिनें वांकून गौरीला नमस्कार केला. नंतर तिनें 'बुधे' म्हणून मोलकरणीला हांक मारली. मोलकरीण आणि सोबतीण म्हणून तिच्या घरीं राहिलेली ती निराधार म्हातारी कुळवाडीण बाहेरून आंत आली. तिला जेवायला वाढून तिनें सगळी झांकपाक केली. मग ती भांडंभर पाणी प्यायली आणि कांबळीचं आंथरूण नि चौघडीचं पांघरूण करून गौरींच्या पुढेंच आडवी झाली. आज तिनें निश्चक्र उपवास केला होता. संध्याकाळ होतां होतां ती अगदीं गळून गेली होती. तिला आतां झोप हवी होती. शांत अन् निर्वेध !

रिकाम्या शरीरांत रिकामं मन–पडल्या पडल्या त्या मनाची रहाटी सुरू झाली. यशोदा आज कमालीची उदास झाली होती. गणेशचतुर्थीसारखा वर्षातला मोठा सण दुसऱ्या दिवशीं उगवणार होता. तिला वाटलं, ‘ कशाला पुजायचा गणपति ! त्याला ‘ विघ्नहर्ता ’ म्हणतात ना ? मग त्यानें आमच्यावर आणलं आहे तें काय ? माणसाच्या इमानदारीला शेवटीं हेंच फळ याचचं का ? यांनीं काय फंदफितुरी केली, का कोणाचं कांहीं नागवलं, का अपहारलं ? मग हें गिरिकपाट कां लागावं यांच्यामागें ? आज सहा महिने झाले. यांची कथा–वार्तासुद्धा समजली नाहीं मला. कुठें असतील हे ? सुखरूप तरी असतील ना ? हें राज्य आहे का यमपुरी ? हा सिद्दी फत्तेखान म्हणजे काळयवनाचाच वंशज... ’

एवढ्यांत बाहेर एक सर कोसळूं लागली. सोसाट्याचा वारा झाडांच्या फांद्या ‘ कर्रर्र कर्र्र ’ पिळवटूं लागला. अनुस्यूत असा एक घोंगाट कानांवर आघात करूं लागला. यशोदेची विचारमालिका तुटली. तिनें चौघडी गळ्यापर्यंत ओढून हातापायांची जुडी केली. अर्ध्या तासानें ती सर थांबली तरी पागोळ्या थोडा वेळ गळत राहिल्या. आणि त्या थांबल्या तरी झाडांच्या पानांतून पडणारे ओथवळे पुढें बराच वेळ टपटपत राहिले. पण हें सगळं शांत, स्तब्ध होण्याच्या आंतच यशोदेचा डोळा लागला. बुधीची तर केव्हांच मध्यरात्र झाली होती !

त्यानंतर थोड्या वेळानें मागच्या दारावर ‘ टिक्‌टिक् ’ झाली ती यशोदेला मुळींच ऐकूं गेली नाहीं. ती चार–दोन क्षण थांबली आणि पुन्हां अधिक जोरानें सुरू झाली, तेव्हां यशोदा दचकून उठली. कोणीतरी खांकरल्याचंहि तिला ऐकूं आलं. तिला वाटलं, कोणीतरी आहे. पण कोण ? चोर, चांडाळ, घरफोड्या का कोणी, वाईट वासनेचा ?... ‘ ओ ’ म्हणणं शक्य नव्हतं. दार उघडणं इष्ट नव्हतं. पण शहानिशा करणं मात्र भाग होतं.

यशोदेनें बुधीला उठवलं आणि दोघी मिळून धडधडत्या काळजानें परसदाराकडे गेल्या. आंतली हालचाल बाहेरच्या माणसालाहि कळली असावी. ‘ ऐकलंस का ? दार उघड. मी आलों आहें. ’ त्यानें दबत्या स्वरांत म्हटलं. तो शब्द यशोदेच्या ओळखीचा होता. पण विश्वास बसेना. तिनें दाराला कान लावून विचारलं. ‘ आपण का ? ’ त्यावर लगेच उत्तर आलं, ‘ होय मीच. दार उघड लवकर. ’ यशोदा धावत माजघरांत गेली. तिनें उशागतीच्या कैपंजींतली वात पुढें सारून दिवा मोठा केला आणि पुढें येऊन थरथरत्या हातांनीं दाराचा अडसर काढला.

माजघरांतल्या झरोक्यांतून वारा आला आणि हरताळकांच्या पुढची दीपज्योत कंपित झाली. उघडलेल्या दारांतून एक पुरुष आंत आला आणि यशोदा भावनांच्या उद्रेकानें शहारली !

घरांत आलेल्या त्या पुरुषाचं नांव केरोबा टिकले असं होतं आणि तोच यशोदेचा पति होता.

मघांच्या सरींत तो चांगलाच भिजला होता. त्याला पाहून यशोदा उचंबळली. तिला परम सुख झालं. ती हर्षसंभ्रांत झाली. पण त्याच क्षणीं वस्तुस्थितीच्या जाणिवेनें तिला सुयाहि टोचल्या. तिनें प्रथम त्याला कपडे बदलायला लावले, मग गुळाचा गवतीचहा करून दिला. नंतर हातपाय शेकण्यासाठीं तव्यावर चार निखारे घालून तो त्याच्यापुढें आणून ठेवला आणि ती त्याच्यापुढें भिंतीला टेकून उभी राहिली.

मधें ठेवलेल्या दीपज्योतीनें दोघांची दृष्टिभेट घडविली. तीं दोघं एकमेकांकडे स्थिरदृष्टीनें पाहूं लागलीं. तीं भूतकालाच्या खोल, लांब दरींतून वर्तमानांत येत होतीं. ती उभयतांची संमीलित दृष्टि जणूं मधल्या त्या कालावर पूल बांधीत होती. तिचा हर्ष संयमानें बांधून टाकला होता. पण केरोबाला मात्र आभाळ ठेंगणं झालं होतं. जिवांत जीव मिळवून समरस झालेली त्याची गुणवंती बायको सहा महिन्यांनंतर त्याच्या नजरेस पडली होती ! आपण पसार झाल्यानंतर ती घोसाळेगडावरून बिऱ्हाड हालवून राजपुरींतल्या आपल्या घरीं रहायला गेली आहे, एवढीच वार्ता या मधल्या काळांत उडत उडत त्याच्या कानावर आली होती आणि तिच्याच विश्वासावर तो अशा अपरात्रीं पडत्या पावसांत आपल्या घरीं–घरीं कसला; तिद्दोच्या सांपळ्यांत–प्रविष्ट झाला होता.

" तुझे फार हाल झाले ना ? " त्यानें विचारलें. पण यशोदा कांहींहि उत्तर न देतां स्तब्ध राहिली. काय बोलायचं तिनें ! आपल्या हालांपेक्षां तिला त्याच्याच जिवाची काळजी अधिक नव्हती का ?

" बोलत कां नाहींस तूं ? "

" काय बोलूं ? माझ्या जिवानें ठाव सोडला आहे. आपण इकडे कां यायचं केलंत तें आधीं सांगा—"

" म्हणजे ? मीं येऊं नये असं वाटत होतं तुला ? माझ्याविषयीं इतकी..." आणि वाक्य अर्धंच टाकून त्यानें मान खालीं केली.

यशोदेला काय वाटत होतं तें त्याला कसं कळावं ! आत्तांच एका घटकेपूर्वी तिनें हरताळकांची प्रार्थना केली होती. 'गौरीमाते, माझ्या चुड्याची तुलाच ग चिंतवणी ! त्यांची माझी भेट लवकरच घडव. पण...पण त्यांना इथें येण्याची मात्र बुद्धि देऊं नकोस.' आणि आतां किंचित्शा रूक्ष शब्दांत केरोबा तिला विचारीत होता, 'मीं येऊं नये असं वाटत होतं तुला ?' तिनें एकवार आवंढा गिळला, बाहेरचा कानोसा घेतला अन् म्हटलं—

" जरा हळू बोलायचं. इथें भिंतीला कान आहेत अन् झाडापेडांना डोळे आहेत. कोणत्या क्षणीं घात होईल त्याचा नेम नाहीं. सिद्दी फत्तेखानाचा अजून या घरावर डोळा आहे. त्याचे अधिकारी इथें येऊन मला सतावतात. म्हणतात कीं, कुठें गेले आहेत तें सांग. अन् अशा स्थितींत..."

केरोबा तिच्या या बोलण्यानें चांगलाच वरमला. ती किती भ्याली आहे हें त्याला तिच्या शब्दांवरूनच समजलं. तो म्हणाला.

" खरं म्हणजे मी यायला नको होतं. पण रहावेना. उद्यां गणेशचतुर्थी. वर्षांतला मुख्य सण. म्हटलं, स्वहस्तें गणपति पुजावा. त्याला एक दूर्वांची जुडी वाहून प्रार्थावं. अन् याहिपेक्षां खरं सांगूं ?..."

केरोबा अडखळला; पण न सांगतांच तिला तें कळलं. यशोदा कांहीं एवढी दुधखुळी नव्हती. ती त्याच्या जीवनाची गवसणी होती. त्याच्या हृदयांतला प्रत्येक स्पंद तिला जाणवत होता. प्रदीर्घ विरहानें तिची ती जाणीव अधिकच तीव्र झाली होती. तो तिला जनांत दृष्टीआड झाला होता; पण त्याच्या सत्तेच्या, वैभवाच्या, प्रीतीच्या, विलासाच्या, कितीतरी गोष्टी ती मनांतल्या मनांत रोज उजळीत होती. आज ती वनवासी रामाची सीता झाली असली तरी कांहीं कालापूर्वी ती वैकुंठींची लक्ष्मी होती.

घोसाळेगडाच्या किल्लेदाराची नववधू म्हणून ती मेण्यांतून वर चढली होती. त्याचा तो दरबारी पोशाख, सवतीसारखी वाटणारी त्याच्या कमरेची ती तलवार आणि त्याच्या मुद्रेवरचा तो अभिमन्यु, बभ्रुवाहन यांचा दिमाख, हें पाहून तिला वाटलं होतं कीं, कापुराची वडी होऊन त्याच्याभोंवतीं ओवाळून जावं. मिठाची

बाहुली बनून त्याच्या जीवनांत विरघळून जावं. नोकर—चाकर, शिलेदार—हवालदार, दासी—बटकी, सगळीं तिच्यापुढें नमून, दबून वागत होतीं.

पण आज तें सगळं होत्याचं नव्हतं झालं होतं. राजकृपा ही वारांगनेसारखी लहरी, चंचल असते याचा केरोबाला एक दिवस चांगलाच अनुभव आला होता. तो निसटला, प्रसार झाला, म्हणून ठीक. नपेक्षां त्याचं शिर धडावर राहिलं नसतं. ज्या सिद्दी फत्तेखानानें हबशी लोकांचं म्हणजे आपल्याच जातभाईंचं सत्र आरंभलं, पन्नास—पाऊणशें मोहरीं जगाच्या पटावरून उडवलीं, तो काय केरोबावर दया करणार होता! हा कारस्थान करतो, तो फितुरी करतो, कोण चेटक करतो, कोण जंतरमंतर करतो, अन् सगळे बेटे आपल्या जिवावर उठले आहेत, असं त्याला वाटे. तो संशयानें पुरता पछाडला होता. त्याला वेढून वेष्टून असलेले 'नृपांगणगत खल' हें संशयविष त्याच्या मनांत अधिकाधिक भिनवीत होते. कित्येक दीर्घडंखी लोक फत्तेखानाकडे चुगल्या करून, एखाद्यावर नसतीं बालंटं घालून आपलं खाजगी वैरहि उगवून घेत होते. जंजिऱ्यावर फत्तेखानाची कुऱ्हाड लखलखत होती आणि त्याच्या राज्यांत सर्वत्र भयाची विक्राळ छाया पसरली होती. प्रत्येकाला जीवित क्षणभंगुर वाटूं लागलं होतं. राज्यांतला सगळा प्रपंचच अस्थिर, बेभरंवशाचा झाला होता. प्रत्येकाचं तोंड बंद अन् कान तेवढे उघडे. कशासाठीं तर आज कोण तोफेच्या तोंडीं गेला, कोण गोणत्यांत भरून समुद्रांत लोटला गेला, कोणाचे नाक—कान कापले गेले, असल्या वार्ता ऐकण्यासाठीं.

कलबअलीनेंहि या वाहत्या गंगेंत हात धुऊन घेतला. घोसाळेगडाची किल्लेदारी त्याला हवी होती. पण सरळ मार्गानें ती त्याला मिळणं शक्य नव्हतं. सबब त्यानें फत्तेखानाचे कान फुंकायला सुरुवात केली. केरोबा बेइमानी करतो, चेटकं करतो, अशा अनेक कथा रचून त्यानें त्याला ऐकवल्या. पण एवढं करूनहि जेव्हां फत्तेखान खवळत नाहीं असं त्याला दिसलं, तेव्हां त्यानें आपल्या भात्यांतलं शेवटचं अस्त्र काढलं—

"केरोबा फितूर आहे. त्यानें शिवाजीशीं—त्या डोंगरच्या चुव्याशीं—कारस्थानं चालविलीं आहेत आणि तो लवकरच त्याला राज्यांत घेऊन घोसाळेगड त्याच्या हवालीं करणार आहे. मी सांगतों तें खोटं वाटत असेल तर खाविंदांनीं या लोकांची साक्ष घ्यावी."

आणि त्यानें चार पढवून आणलेले ' होयबा ' फत्तेखानाच्या पुढें उभे केले. त्याचं काम झालं. फत्तेखान खवळला. त्यानें दांतओठ खाऊन केरोबाला पकडण्यासाठीं सशस्त्र शिपाई रवाना केले. पण केरोबा तेवढा धूर्त होता. त्यानें आपला पुढचा परिणाम हेरला आणि मोठ्या शिताफीनें त्यांच्या हातांवर तुरी दिल्या.

त्यानंतर आज प्रथमच तो आपल्या घरीं आला होता. अजून त्याचं आगमन कोणाला कळलं नव्हतं आणि पुढेंहि तें कळूं देणं धोक्याचं होतं. त्याला लपवून ठेवणं, त्याचं संरक्षण करणं ही जबाबदारी आतां यशोदेवर येऊन पडली होती. आणि यशोदा त्याच कर्माला भीत होती.

त्या घरांत तिच्याशिवाय दुसरी एकच व्यक्ति होती अन् ती म्हणजे बुधी कुळवाडीण. कांहीं केलं तरी केरोबा तिच्या दृष्टीस न पडणं अशक्य होतं. आणि बुधी म्हणजे मुलखाची वाचाळ. तिच्या तोंडांत तीळ भिजत नव्हता. गांवांतलीं रहस्यं घरीं घेऊन येणारी बुधी घरचं रहस्य चवाठ्यावर नेऊन घालील हें तिच्या स्वभावधर्माला धरूनच होतं. यशोदेला भीति वाटली ती तिचीच. तिनें तिला एकांतीं नेऊन सगळी हकीकत सांगितली आणि ' आळीमिळी ' धरण्याबद्दल बल्लाळविनायकाची शपथ घातली, तेव्हां तिला जरा हायसं वाटलं.

केरोबानें पहांटे उठून गणपतीची पूजा केली. दुपारीं अंधाऱ्या खोलींत महा-नैवेद्य ग्रहण केला. दिवसभर वळकट्यांच्या मागें घुंगट घेतलं. आणि त्याचा तो दिवस निर्विघ्न पार पडला. दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं गणपतीवर विसर्ज-जनाच्या अक्षता टाकून त्यानें घरचं वार्षिक कृत्य पुरं केलं. आतां त्यानें ताबडतोब निघून जावं असं यशोदेला वाटलं. पण तिनें तसं सांगावं कसं ! ' मी तुला नकोसा झालों का ' असं त्यानें म्हटलं असतं तर ! पण केरोबानेंच जायचं ठरवलं. केवळ रात्र पडण्याची, सगळं सामसूम होण्याचीच, तो वाट पहात राहिला. त्याच्या हातावर दह्याची कवडी ठेवतांना यशोदेला हुंदका अनावर झाला. चार–दोन क्षणच त्या दोन आपद्ग्रस्त जीवांचं अद्वैत झालं ! त्या प्रसंगीं सुद्धा तिचा थरकांप थांबला नाहीं.

तो मागच्या दारानें बाहेर पडला. आकाश कृष्णमेघांनीं ओथंबून आल्यामुळें अधिकच काळवंडलेल्या अंधारसागरांत त्यानें आपली जीवननौका लोटून दिली.

यशोदेनें सुटकेचा निःश्वास टाकला. त्या बाजूचा तो काळोख नेत्रकिरणांनीं उजळून टाकायचा प्रयत्न करीत असतां तिचा एक डोळा रडत होता अन् दुसरा हसत होता. संयोगापेक्षां वियोगच तिला आज अधिक प्रिय होता. गेल्या दोन दिवसांत शंका अन् भय यांनीं ग्रासलेल्या तिच्या भावकमळाची एकहि पाकळी उमलली नव्हती. पुढच्या वियोगांत ती अहोरात्र जळत, पिचत राहणार होती; पण तरीहि तो तिला सुखरूपच वाटणार होता.

केरोबा निघून गेल्यावर तिनें धरणीवर अंग टाकलं, मनसोक्त रडून घेतलं आणि मग ती त्यानें कानांत सांगितलेल्या गोष्टी आठवीत राहिली. तो म्हणाला होता. ' माझा हा वनवास लवकरच संपेल ही खात्री बाळग. पुन्हां मी घोसाळे-गडाचा किल्लेदार झालेला तूं पाहशील. आणि तोहि सिद्दोच्या राज्यांतला नव्हे; तर स्वराज्यांतला ! शिवाजीमहाराजांच्या काळजांत जंजिरा विषारी कांट्यासारखा सलतो आहे. ते या प्रांतावर स्वारी करणार आहेत. मी त्यांना रायगडावर जाऊन भेटून आलों आहें. या प्रदेशाची सगळी माहिती त्यांना दिली आहे. अशी दचकूं नको. महान् अवतारी पुरुष आहे तो. दुर्जनांचा काळ...गोब्राह्मण-प्रतिपालक...सती साध्वींचा रक्षणकर्ता...हा फत्तेखान म्हणजे त्याच्यापुढें मशक आहे. तो जंजिऱ्यासारख्या अभेद्य जलदुर्गांत रहातो म्हणून त्याचं महत्त्व. दोन-तीन महिने थांब. फार तर मार्गशीर्षापर्यंत. सिद्दीचा सगळा मुलूख तो पादाक्रांत करील. घोसाळेगड सगळ्यांत आधीं घेईल. अन् तिथल्या खिडींतून जंजिऱ्यावर उतरेल. शेवटची धडक जंजिऱ्यावरची...'

केरोबानें जातांना यशोदेला नुसतं आश्वासनच दिलं नव्हतं, तर आणखीहि एक अभीष्ट वर दिला होता. पण तो दिल्याचं त्याला कळलं नव्हतं आणि तो घेतल्याचं यशोदेलाहि कळलं नव्हतं. पुढें दीड महिना गेल्यावर तिला तें उमगलं. तिला उमगलं म्हणण्यापेक्षां त्या बुधीला उमगलं. ती यशोदेला म्हणाली.

"अगो बायो, कशाला तें आलं अन् लिंबू ! हें नित्त दुसरंच हाय बायो !"

बुधी हंसली आणि तिचा गर्भितार्थ समजून यशोदा लाजली ! तिला अननु-भूत अशा कोणत्या तरी मुग्ध भावनेनें हळुवार स्पर्श केला. आणि मग तिला वाटलं कीं, आतां आपण अनाथ नाहीं. आपला प्राणेश्वर आतां आपल्याजवळ आहे. नव्हे; तो अपत्यरूपानें आपल्या उदरीं आला आहे. ती मग एकांतीं जाऊन बसली,

हसली अन् रडलीहि. तिनें त्या उदरस्थ जीवाला उद्देशून म्हटलं. ‘ तुझं आगमन मला कळलं. पण त्यांना तें कळलं असेल का ? कसं कळणार ! ते पुन्हां एकदा अवचित येऊन तुझं स्वागत करून जातील का ? पण... नको ग बाई ! नकोच तें...’

यशोदा मूळची अटकर बांध्याची. पण पोटांत अन्नाचा कणहि ठरेनासा झाल्यामुळें अगदीं वाळून गेली आणि अधिक उंच दिसूं लागली. चोळीच्या लांब बाह्यांत तिचे दंड फुंकणीसारखे दिसूं लागले. तिचे लांब पापण्यांचे बदामी डोळे, गालांचीं हाडं वर आल्यामुळें अधिकच खोल गेले. तिच्या पातळ, नितळ त्वचेवरच्या हिरव्या शिरा वेड्यावांकड्या वळणांनीं उठून दिसूं लागल्या. यशोदेची मूर्ति करुणामयी दिसूं लागली. तिच्या हृदयांत वेळोवेळीं मनोज्ञ रसभाव अंकुरत होते. पण तिनें त्या सुखसंवेदना कोणापुढें उकलाव्या ? गळून गेलेली आपली कोवळी काया कोणाच्या अंगावर निर्भरपणें लोटून द्यावी ? बुधी तिचं सगळं आस्थेनं करी; पण ती यशोदेच्या भावसृष्टींत प्रवेश करूं शकत नव्हती. दोघींच्या कक्षा भिन्न होत्या. ती आंतल्या आंत चुळबुळे, अस्वस्थ होई आणि मग कुशींत तोंड खुपसून नवऱ्याचा धांवा करी—

‘ तुम्ही मला उदार झालांत. किती तरी वर्षं जें मी अपेक्षीत होतें, तें अचानक येऊन मला दिलंत. पण दिलेलं दान घेणाऱ्याला पेलेल ना, याचा कधीं विचार केलांत का ? मला माहेरून आई नाहीं, इकडून सासू नाहीं. कोणाच्या आधारानें मी हा तुमच्या वंशाचा अंकुर वाढवूं ? मला या वेळीं तुम्ही हवे आहांत...मला अन् माझ्या बाळालासुद्धा ! ...’

यशोदेला चौथा महिना लागला आणि कोणीहि ओळखावीं अशीं गर्भवतीचीं लक्षणं तिच्या शरिरावर दिसूं लागलीं. अन् त्यामुळेंच गांवांत नि शेजारींपाजारीं ‘ घूं घूं ’ सुरू झालं. बायकांना नाकानें कांदे सोलायला एक नवा विषय मिळाला. कुटाळांच्या जिभा सैल सुटूं लागल्या. बुधी बाहेर पडली कीं आस-पासच्या बायका तिला छेडूं लागल्या. सर्वांनीं ठरवून टाकलं कीं, आपल्या पाखाडींत यशोदेच्या रूपानें मूर्तिमंत पाप वावरत आहे आणि तें एक नवं पाप आपल्या कुशींत वाढवीत आहे ! असलीं कुजकीं घाणेरडीं बोलणीं ऐकावीं लागलीं कीं बुधीच्या अंगाचा तिळपापड होई. तिला वाटे कीं, या माणसांच्या कानाचा चावा घेऊन त्यांना सांगावं—

'मेल्यांनो ! तुमच्या जिभा झडतील ! अंगाला भगं पडतील ! माझी धनीण धुतल्या तांदुळासारखी आहे. धनी आले होते घरीं. दोन दिवस होते. गणपति त्यांनींच पुजेला लावला होता. या दोन्ही डोळ्यांनीं मीं पाहिलं आहे....'

पण लगेच तिला यशोदेनें घातलेल्या शपथेची आठवण होई. 'बुधे, कुठें बोलशील हं ! तुला बल्लाळविनायकाची शपथ आहे.' आणि बल्लाळ म्हणजे केवढं कडक दैवत आहे, तें तिला ठाऊक होतं. त्यामुळेंच बुधीला तोंडांत मिठाची गुळणी धरावी लागत होती.

यशोदेच्या घरावर डोळा ठेवणारे फत्तेखानाचे जासूदहि बुधीजवळ अशाच नसत्या चौकशा करूं लागले होते. बुधी त्यांना घाबरत होती. त्यांच्यापुढें चांचरत होती. यशोदेच्या कानावर तिनें या गोष्टी घातल्या होत्या. तिला त्या चोंबड्या, निंदक शेजारणींचा राग येई; पण त्याच वेळीं असंहि वाटे कीं, लोकांची तरी काय चूक ? त्यांना एवढंच ठाऊक आहे कीं, यशोदेचा नवरा परागंदा आहे. आजच नव्हे तर गेले आठ-दहा महिने. अंदरकी बात त्यांना कशी कळावी !...

या गोष्टीचा परिणाम असा झाला कीं, यशोदेनें बाहेर तोंड दाखवणं वर्ज्य केलं. ती अष्टौप्रहर घरांतच कोंडून राहूं लागली. बुधी बाहेर हिंडे आणि गांवांत उठणाऱ्या बातम्यांच्या वावड्या हातीं लागतील तेवढ्या गोळा करून घरीं आणी. 'सिद्दीची आणि शिवाजीची जुंपली आहे...शिवाजी घोसाळेगडा-जवळच्या खिंडींतून खालीं उतरतो आहे...तळें, घोसाळें हे दोन्ही किल्ले त्याच्या ताब्यांत गेले आहेत...आतां त्याचा रोख राजपुरीवर आहे...कदाचित् तो प्रथम श्रीवर्धन सर करील अन् मग समुद्रांत पुढें येऊन जंजिरा वेढील...'

यशोदा या बातम्या ऐकून कल्पनेच्या बाहुल्या नाचवूं लागे. घोसाळ्याचा किल्ला शिवाजीनें घेतला असेल, तर मग हेच तिथले किल्लेदार झाले असतील. मग त्यांनीं मला कसं अजून नेलं नाहीं ? का शिवाजीनें त्यांना पुढच्या मोहिमेवर धाडलं ? राजपुरी सर करण्यासाठीं तेच सैन्य घेऊन येत असतील का ? शक्य आहे. ते राजपुरीवर शिवाजीचा झेंडा फडकवून विजयोत्साहानें घरीं आले कीं मी त्यांना दारांतच थोपवून धरीन. म्हणेन कीं, 'क्षणभर तिथेंच थांबावं. मी पंचारती आणतें.' ते मग माझ्याकडे निरखून पहातील. माझ्या शरिरांतला बदल त्यांना चटकन् कळेल. मग ते म्हणतील, 'अरे वाः ! असं आहे काय ?

ठीक. देव पावला म्हणायचा. ' त्या वेळीं मला अगदीं लाजल्यागत होईल ! मग मात्र मी गांवांतल्या कुटाळांना म्हणेन, ' पहा आतां डोळे फोडून. झाली खात्री ? आतां आहे का वेडंवांकडं बोलण्याची ताकद...! '

चौथ्या महिन्यांत यशोदेच्या पोटांत थोडं थोडं अन्न टिकूं लागलं होतं. ती झपाट्यानें बदलूं लागली होती. प्रथम तिचे खोल गेलेले डोळे वर आले. मग चेहऱ्यावरचा फिकटपणा लोपून त्यावर तुकतुकी आली. शिवाजीच्या चढाईच्या बातम्या ऐकूं यायला लागल्यापासून तिचं मानसिक बळहि चढूं लागलं. ती आपल्या मनाशीं सुखसंवाद करूं लागली. ' आपण विघ्नांचा सागर पार घातला. आतां चार हात मारले कीं सुखाचा किनारा ! आपण समुद्रांत पडलों, भिजलों, बुचकळलों, हें खरं ; पण बुडलों नाहीं ही बल्लाळविनायकाचीच कृपा !... '

त्या दिवशीं सकाळीं याच सुखस्वप्नांत ती गुंगून राहिली असतां, बुधी तेलाची उरोळी घेऊन तिच्यापुढें आली. यशोदा न सांगतांच तिच्यासमोर वेणी वळून घेण्यासाठीं बसली. बुधीनें तिच्या केसांच्या मुळांत बोटं घालून तिच्या डोक्याला तेल चोळलं. मग फणीनें प्रथम तिच्या माथ्यावर पिंपळपानाचा भांग काढला. यशोदा लगेच पाठमोरी वळून बसली. तिनें आपल्या गुडघ्याभोंवतीं दोन्ही भुजलतांचं बंधन घातलं. मऊ, काळ्या केसांची रास तिच्या पाठीवर ओघळली. बुधी खसाखसा ते विंचरूं लागली. प्रत्येक ओढीला तिची मान मागें खेचली जाई आणि मुखमंडल उत्तान होई. जणूं शिवाच्या जटाजूटांतल्या गंगेचं वदन-कमळच ! वेणी वळून तिचा खोपा खोचल्यावर यशोदेचा मुखडा न्याहाळतांना बुधी तिला म्हणाली.

" आज माझी बयो भारीच सुरेख दिसती गो ! जसं काय आभाळांतलं नक्षत्रच धरणीवर उतरलंय्. "

" पायाला काय लागलं आहे बघ तुझ्या— "

"समजलंय्, समजलंय्. माजी न्हाय दृष्ट लागायची तुला. दृष्ट लागते पाप्याची."

आणि त्याच क्षणीं बाहेरचा देखावा बदलला. सिद्दी फत्तेखानाचे चार सशस्त्र शिपाई त्या दोघींना पडवीच्या दारांत उभे दिसले ! त्यांना पहातांच बुधीची बोबडी वळली. यशोदेचं रक्त गोठलं, डोळे विस्फारले अन् तोंड उघडलं तें तसंच राहिलं ! बुधीला वाटलं कीं, गायीच्या गोठणीं वाघ आले !

" चलो, बाहर आव. तुला पकडून आणायचा हुकूम आहे सरकारचा." त्यांच्यांतला म्होरक्या यशोदेला गुर्मीत बोलला.

ती राजाज्ञा यशोदेच्या कानांत घुसली; पण तिचा अर्थबोध व्हायला तिला कांहीं क्षण जावे लागले. आणि तो समजला, तेव्हां तिचं काळीज उपडं पडलं ! तिला वाटलं कीं, हें कांहींतरी भयंकर प्रकरण आहे. एका दुष्ट शंकेचा भुंगा तिचं हृदय पोखरूं लागला—

' बहुधा हे पकडले गेले असावे. फत्तेखानानें त्यांच्या गुन्ह्यांच्या इन्साफ केला असावा. त्यांना तोफेच्या तोंडीं देण्याची किंवा गोणत्यांत भरून समुद्रांत लोटायची शिक्षा फर्मावली असावी ! माझ्या डोळ्यांदेखत त्याला तिची अंमलबजावणी करायची असेल. ती पाहतांना मीं तडफडावं, माझी शोकविव्हल अवस्था पाहून त्यांनीं मरणाच्या आधींच मरावं आणि हें रडतं–भेकतं दृश्य पाहून आपण राक्षसी आनंद भोगावा, हीच फत्तेखानाची इच्छा असेल...'

तिनें उठून बुधीला मिठी मारली. दोघी गळ्यांत गळा घालून रडूं लागल्या. पण त्यांना रडायला तरी सवड होती कुठें ! ते काळदूत बाहेरून डोळे लाल करीत होते ना ! यशोदेनें लगेच शोकावेग आवरला अन् ती बाहेर पडली. त्यासरशीं त्या शिपायांनीं तिला वेढली. ती परतंत्रपणें अज्ञात भविष्याला सामोरी झाली.

**' मज अनाथाकारणें करीं येणें केशवा**
**तुका म्हणे कृपावंता माझी चिंता असावी '**

हा तिच्या आईचा आवडता अभंग तिनें मनांतल्या मनांत म्हटला आणि मग तिचीं लटपटतीं पावलं खंबीरपणें पडूं लागलीं.

ती होडींत बसली आणि तो काळाकभिन्न जंजिरा तिला समोर दिसूं लागला. तो जणूं तिला म्हणत होता. ' ये, लवकर ये. मला भूक लागली आहे. मी तुझा एकच ग्रास करणार आहें !' किल्ल्याच्या दरवाजांत पायरीलाच होडी लागली. पण भरती असल्यामुळें ती स्थिर होईना. त्या राजदूतांनीं पटापट उड्या मारून तिला उतरून घेण्यासाठीं हात पुढें केले. पण त्यांचा करस्पर्श होण्यापेक्षां खाडींत पडून मेलेलं बरं, म्हणून तिनें स्वतःच्या हिंमतीवर उडी टाकली. ती पायऱ्या चढूं लागली तशी देवडीवरच्या पहारेकऱ्यांच्या नजरा तिला बाणासारख्या खोंचल्या. ' देखो यार, अस्मानकी परी है परी...' म्हणून त्यांतला एकजण पाघळलाच.

फत्तेखान त्या वेळीं खलबतखान्यांत होता. त्याचे दिवाण आणि सेनाधिकारी त्याला चालू परिस्थिति समजावून सांगत होते.

"...राजकारण दिवसेंदिवस गंभीर होत आहे. शिवाजी राज्यांत खोलवर घुसला आहे. आमच्या सैन्याला मागें रेटून त्यानें गड, किल्ले घेण्याचा सपाटा लावला आहे. त्याचा खरा रोख जंजिऱ्यावर आहे. जंजिरा बळकट खरा; पण त्यालाहि वेढा बसण्याचा संभव आहे. अलिबागच्या किल्ल्याजवळ त्यानें आपलं आरमार जमा केलं आहे. त्याच्या गुराबा आणि फतेमाऱ्या समुद्रावर फिरूं लागल्या आहेत. किल्ल्याला वेढा बसला तर जमिनीशीं आपला संबंध तुटेल आणि हें कोणत्याहि क्षणीं घडणं शक्य आहे..."

फत्तेखानाला तें ऐकून जणूं आपल्याभोंवतीं रान उठल्यासारखं झालं. असल्या कटकटी त्याच्या भोगविलासी वृत्तीला मानवण्याजोग्या नव्हत्या. खावं, प्यावं अन् विषयधुंद असावं, यापलीकडे आजवर त्यानें कसलाच पुरुषार्थ केला नव्हता. ती त्याची कुवतच नव्हती. आतांसुद्धा त्यानें 'सगळा बंदोबस्त नीट करा; शिवाजी राजपुरीच्या खाडींत येतां कामा नये' असं रुबाबांत अधिकाऱ्यांना फर्मावलं आणि तो खलबतखान्यांतून बाहेर पडला.

सदरेवर येतांच शिपायांनीं यशोदेला त्याच्यापुढें उभं केलं. तिला पाहतांच त्याच्या कपाळावरच्या आठ्या क्षणांत मोडल्या. तो ओघळलेल्या ओठाचा, कृष्णवर्ण, उंच, सडपातळ पुरुष तिला जणूं डोळ्यांवाटे पिऊं लागला. यशोदेची मान साहजिकच खालीं पडली. ही इतकी खूपसुरत आहे, हें आपल्याला ठाऊक असतं तर केरोबा पळून गेला त्याच दिवशीं आपण हिला जंजिऱ्यांत आणली असती असं त्याला वाटलं. तिला एकदा आपादमस्तक निरखून त्यानें आपली नजर तिच्या वाढीस लागलेल्या ओटीपोटावर स्थिर केली.

"कशासाठीं तुला गिरफदार करून आणलं, ठाऊक आहे?"

फत्तेखानाचा तो खरखरीत आवाज तिचं काळीज करवतीत गेला. ती अवाक् राहिली.

"तुझा नवरा कुठें आहे?"

"मला माहीत नाहीं." ती ओठांतल्या ओठांत पुटपुटली.

"माहीत नाहीं काय? खरं बोलतेस?"

"होय."

"मग तुझ्यावर दुसरा गुन्हा शाबीत होतो."

"कसला ? मी काय वांकडं केलं ?"

"काय वांकडं केलं ? हुंः ! तुझ्या वाढत्या पोटाकडे पहा एकदा. तूं व्यभिचार केला आहेस. तुझ्या पोटांत पाप वाढतं आहे..."

यशोदेची काया उदरस्थ गर्भासह एकदम हादरली. हा आरोप कल्पनातीत होता आणि तितकाच कुलस्त्रीला असह्यहि होता. पण त्यावरून तिला कळलं कीं, आपला नवरा पकडला गेला नाहीं. आपली ती कुशंका व्यर्थ ठरली. तिला थोडा अधिक धीर आला. ती खणखणीत शब्दांत बोलली.

"नाहीं. त्रिवार नाहीं. असलं पाप स्वप्नांतसुद्धा माझ्या हातून घडणार नाहीं. माझ्यावर असलं कुभांड रचणं हा अधर्म आहे."

यशोदेची कृश गौरमूर्ति अग्निज्वाळांतून बाहेर आल्यासारखी लाल दिसूं लागली. फत्तेखानाला क्षणभर तिच्याकडे पहावेना. तो थोडा वेळ नरमला. यशोदेचा निष्पापपणा त्याला मनोमन पटला. इतर एखादी काळी, कुरूप स्त्री असती, तर त्यानें तेवढ्यावरच तिला सोडून दिलं असतं. पण यशोदा सुंदर होती, कमळण होती आणि फत्तेखान भ्रमराइतका काळा आणि लुटारू होता. हुंगल्या-वांचून त्याला फुलाचं सौंदर्य कळतच नव्हतं !

त्याच्या पूर्वजांनीं जंजिऱ्यांत एक प्रथा पाडून ठेवली होती. एखाद्या स्त्रीच्या उदरांत पापाचा अंकुर वाढतांना दिसला आणि तो आरोप तिच्यावर शाबीत झाला कीं तिचा आपल्या जातींत निका लावून टाकायचा. ती सुंदर असली तर राजघराण्यांतल्या पुरुषांनीं तिला आपल्या जनान्यांत ओढायची अन् सामान्य असली तर शिपाईप्यादे आहेतच. अशा प्रकारें आपली जात वाढवण्याचा त्यांचा धोरणी उपक्रम होता. फत्तेखानहि त्यालाच अनुसरून वागत होता. 'बाप दाखव, नाहींतर श्राद्ध कर' अशा प्रकारचा पेंच त्यानें यशोदेपुढें टाकला होता.

"केरोबाचा ठावठिकाणा सांग ; नाहींतर व्यभिचाराचा गुन्हा कबूल कर."

यशोदा दोन्ही गोष्टी करूं शकत नव्हती. केरोबाचा पत्ता तिला ठाऊक असता तरी तो सांगण्यासाठीं तिची जीभ रेटली नसती. अशी कोण सुवासिनी

असेल कीं, जी स्वहस्तें आपला चुडा पिचवील ! पण तें करतां येत नाहीं म्हणून काय पापाची कबुली द्यायची ? जें दीपज्योतीच्या साक्षीनें पुण्यशेजेवर उमललं, जें जिवाशिवाच्या समरसतेंतून अंकुरलं, त्याला 'पाप' म्हणायला कोणती माउली तोंड उघडील ? त्यामुळें मूकस्तंभ उभं रहाणं आणि आंतून येणारे कढ गटागट गिळणं एवढंच तिच्या वांट्याला उरलं होतं. तिचं तें मौन पाहून फत्तेखान तिला विजयोन्मादानें बोलला.

" तुला तुझ्यावरचा आरोप नाशाबीत करतां येत नाहीं. अर्थात् त्याबद्दलची शिक्षा आतां तुला भोगणं प्राप्त आहे. तूं खानदान घराण्यांतली आहेस. तेव्हां तुझ्यावर दया म्हणून मीच तुझ्याशीं निका लावीन. तूं खुष रहावंस अशी माझी इच्छा आहे. योग्य वेळीं मी तुला माझ्या सुखाची अन् वैभवाची वाटेकरीण बनवीन. "

ही शिक्षा एका कुलस्त्रीच्या दृष्टीनें अमानुष होती. यापेक्षां मानेवर कुऱ्हाड घातलेली यशोदेला पत्करली असती. गोणत्यांत भरून समुद्रांत लोटून दिलेलं मानवलं असतं. पण तिला जगायची शिक्षा मिळाली होती. फत्तेखानाच्या हुकुमानें जेव्हां तिला एका कोठडींत बंदिस्त करण्यांत आलं, तेव्हां ती आपल्या हतभाग्याला बोल लावीत बसली. तिला आपली सुकुमार काया भारभूत वाटूं लागली. उदरांत चुळबुळ करणारा तो गर्भ तिच्या वांट्याला जीवघेणा गुल्म ठरला. एका घटकेंत सगळं कसं उलटच्या पालटं झालं !

दुपारीं एका बटकीनें तिच्यापुढं अन्नाचा थाळा आणून ठेवला; पण तिनें त्याला स्पर्शसुद्धा केला नाहीं. रात्रीं एक मिणमिणती दिवली दुसऱ्या एका बटकीनें खोलींत आणून ठेवली; पण तिनें ती लगेच विझवून टाकली. आंतल्या अंधाराला बाहेरचा अंधार येऊन मिळाला. तिला त्याची मुळींच भीति वाटली नाहीं. तिला वाटलं कीं, हा अंधार खूप वाढावा अन् त्यानें आपल्या शरिराचा कणन् कण विरवून जिथल्या तिथें आपल्याला नाहींसं करावं.

यशोदा एका कोपऱ्यांत भिंतीशीं जिवाचं मुटकळं करून बसली होती. सगळं सामसूम झाल्यावर कदाचित् तिला बसल्या जागींच मरगळ आली असती. झोप सोडा; पण वृत्ती तरी कांहीं काळ शून्य झाल्या असत्या. पण एवढ्यांत दाराची कडी वाजली आणि दार उघडून फत्तेखान आंत शिरला. त्यानें आपल्या स्वरांत मार्दव आणून तिला हांक मारली. 'प्यारीऽऽ !'

नागाच्या अंगांतलं सगळं विष जसं त्याच्या दाढेखालच्या लहानशा पिशवींत सांठवलेलं असतं, तसं फत्तेखानाच्या सगळ्या अनिरुद्ध भोगलालसांचं विष त्याच्या त्या ' प्यारी ' या एका शब्दांत सांठवलेलं होतं. आपल्यापुढें आतां काय वाढून ठेवलं आहे तें यशोदेला तात्काळ कळलं. तिनें एकदम त्याच्यापुढें गुडघे टेकले अन् करुणार्द्र शब्दांत म्हटलं.

" माझी अशी विटंबना करूं नको रे ! हे कुठें आहेत हें मला खरोखरच ठाऊक नाहीं. त्यांच्याच गळ्याची शप्पत ! अन्...अन्...पण माझ्या हातून कसलंहि पाप घडलं नाहीं. तूं मला सोडून दे. माझा धर्माचा बंधु हो ! माझा धर्माचा..."

आणि कंठ दाटून आल्यामुळें तिला पुढें बोलवेचना. पण फत्तेखानाच्या मनावर त्याचा तिळमात्र परिणाम झाला नाहीं. तो खदखदा हंसला—अगदीं विकटपणें हंसला ! यशोदा काय तें समजली. तिला वाटलं, या किल्ल्याच्या दगडांइतकंच या पुरुषाचं हृदयहि काळं आहे. या वास्तूच्या पायांत एक नवं जोडपं जिवंत गाडलं गेलं आहे. इथला चुना माणसाच्या रक्तांत कालवलेला आहे. इथें दयेला, धर्माला, नीतीला, माणुसकीला थारा नाहीं. इथें माझ्या-सारखीनें एक तर कर्दमांत लोळावं, नाहींतर...नाहींतर...

आणि यशोदेनं पवित्रा बदलला. ती फत्तेखानाला म्हणाली.

" माझा जीव इथें या खोलींत गुदमरला आहे. मला आधीं बाहेर काढा. मोकळ्या हवेंत न्या. "

" बहोत अच्छा ! चलो हमारे साथ. "

फत्तेखानाला वाटलं कीं, सावज मऊ आलं. आपल्या इच्छापूर्तीसाठीं मोकळ्या हवेचं बक्षीस तो तिला द्यायला एका पायावर तयार झाला. यशोदेला पुढें घालून तो तटावर चढला आणि एका बुरुजावर आला. त्या बुरुजाला चार कमानी होत्या आणि त्या प्रत्येकींत एकेक तोफ बाहेर तोंड काढून बसली होती. यशोदा त्यांपैकीं एकीला धरून राहिली आणि फत्तेखान तिच्यासमोर दुसऱ्या तोफेवर टेकला. यशोदेनें एक लांब श्वास सोडून सभोंवार पाहिलं.

करुणगंभीर रात्र अंधाराला मिठी मारून निःस्तब्ध पसरली होती. वारा घोंघावत होता. मार्गशीर्षांतली थंडी अंगाला चावे घेत होती. वरून दंव पडत

होतं. आसमंत कालवला होता, काळ्या रंगानें मढून गेला होता. अंधारांत रूप दिसत नाहीं; पण आकृति दिसते. फत्तेखान तसाच आकृतिरूपानें तिला दिसत होता. भोंवतालच्या अंधाराइतकाच काळा अन् त्याहूनहि भयानक! त्याचे डोळे धुंद होत आहेत, ओठ लवलवत आहेत अन् देह कसा कामाग्नीनं भडकला आहे तें यशोदेला कांहीं स्पष्ट अन् कांहीं अस्पष्ट असं दिसलं.

ती कावरीबावरी झाली. तिनें वर पाहिलं. तारांगणाच्या खडीची साडी नेसून अन् वर आकाशगंगेचा कमरपट्टा घालून मिरवणाऱ्या रात्रीची तिला चीड आली. माडांचे शेंडे नाचवीत अन् राजपुरीच्या खाडीवर वळकट्या उठवीत आपल्याच नादांत हुंदडणाऱ्या वाऱ्याचा तिला राग आला. फेंसाच्या रूपानें खदखदा हंसत राहिलेल्या सागराबद्दल तिला द्वेष निर्माण झाला. एका निष्पाप अबलेवर अत्याचार होण्याच्या वेळीं, तिच्या मतें पंचमहाभूतांनीं खवळून उठायला हवं होतं. एक फत्तेखान तरी बुरुजाला विवर पडून त्यांत गडप व्हायला हवा होता, नाहींतर ती तरी अलगद उडून जायला हवी होती.

पण तसलं कांहींच झालं नाहीं. झालं तें हें कीं, फत्तेखान एकेका पावलानें पुढें आला आणि त्यानें यशोदेच्या कमरेभोंवतीं विळखा घातला. तो तिला जवळ ओढूं लागला. त्याचं कातरलेल्या दाढीचं तोंड खालीं खालीं येऊं लागलं. देवाच्या माथीं वहाण्याच्या योग्यतेचं फूल एका दैत्याच्या पायदळीं पडण्याच्या बेतांत आलं!

आणि त्याच क्षणीं यशोदेच्या अंगांत कुठून तरी वीज सळसळली. दुसऱ्याला जाळण्यासाठीं नव्हे; तर स्वतःचाच नाश करण्यासाठीं. देव, धर्म, आप्त, स्वजन, कुण्णी कुण्णी आतां आपला उरला नाहीं, ही जेव्हां तिची खात्री झाली, तेव्हां तिनें स्वतःच मुक्त होण्याचं ठरवलं. त्याच उत्कर्षबिंदूवर तिनें आपल्या जीवन-नाटकावर पडदा घालायचं निश्चित केलं. कारण यापुढें तें घृणास्पद ठरणार होतं. नाटकाऐवजीं त्याचा हिडीस तमाशा होणार होता. तिला त्या वेळीं कुठलं बळ चढलं कोण जाणे! उराउरीं खेंव देण्यासाठीं कव घालणाऱ्या फत्तेखानाला तिनें एका सपाट्यांत दूर ढकललं आणि दुसऱ्याच क्षणीं आपली पवित्र काया अपवित्र होण्यापूर्वीं बुरुजाच्या कमानींतून उदरांतल्या गर्भासह दरियांत लोटून दिली. धप्पदिशीं आवाज झाला. 'कोण पडलं?' म्हणून लाटा खळाळून तिच्याभोंवतीं जमल्या. समुद्रानें त्या साध्वीच्या मस्तकावर फेंसाची मोगरी वाहिली.

फत्तेखान ' तोबा, तोबा ' करून ओरडला. त्या ओरडण्यामुळें जंजिऱ्याच्या पोटांतलं जग खडबडून उठलं. शिपाई, पहारेकरी पलित्ते पेटवून तटावर धावले. फत्तेखान सांवरून उभा झाला. कमानींत ओणवून खालीं पाहूं लागला. एवढ्यांत वद्य सप्तमीचा चंद्र सह्याद्रीच्या माथ्यावर उमटला. राजपुरीच्या खाडीवर अन् समुद्रावर एकदम किमया झाली. पहारेकऱ्यांपैकीं कोणाची तरी नजर पश्चिमेला दूरवर गेली आणि तो ओरडला.

" वो देखो ! "

एक होडी आपल्या शिडांत वारा भरून द्रुतगतीनें पसार होत होती. तो होडीवाला तांडेल शिवाजीच्या दर्यासारंगाच्या आज्ञेनें जंजिऱ्यांत भेद पाडायला रात्रीच्या काळोखांत जिवावर उदार होऊन आला होता. त्यानें पहारेकऱ्यांची नजर चुकवून आपली होडी पश्चिमेच्या तटाखालीं लावली होती. पुढची कामगिरी केव्हां करावी अन् कशी करावी, याचा विचार करीत असतां यशोदेची त्याच्या जवळच उडी पडली. एक बुडता जीव वर काढून दर्यासारंगापुढें नेऊन घालणं ही नवी जबाबदारी त्याच्यावर येऊन पडली. आपल्या दोघां साथीदारांसह त्यानें ती उचलली अन् लगेच होडी हाकारली. पाण्यानें आपादमस्तक निथळणारी, कुडकुडणारी, यशोदा त्याला म्हणाली.

" तूं अन् कोण आलास माझ्या मार्गांत ? मी एका आगींतून बचावलें. आतां कुठल्या फुपाट्यांत नेऊन घालतोस मला..."

" तूं काळजी करूं नको माझ्या धर्माच्या भैणी ! शिवाजी महाराजांचा तांडेल हाय मी. तुला सुक्‌रूप नेऊन पोंचवतों बघ ! "

* * *

# अंवस अन् पुनव

घड्याळांत पांचांचे ठोके वाजलेले ऐकतांच नानांनीं हातांतली ज्ञानेश्वरी खूण घालून कपाटांत ठेवली. शेवटची वाचलेली ओवी स्मरणानें गुणगुणत त्यांनीं पितळी खलबत्ता जवळ ओढला. खलबत्त्याच्या तोंडावर बत्त्याभोंवतीं आपल्या डाव्या हाताचें वर्तुळ धरून त्यांनीं पानसुपारी कुटली. प्रथम तो कुटा आणि नंतर तंबाकूची चिमूट तोंडांत टाकून ते उठले. आतां त्यांना ताबडतोब बाहेर निघायला हवें होतें. बंद गळ्याचा जुना लांब कोट अंगांत चढवून त्यांनीं काळी टोपी डोक्यावर ठेवली. डाव्या खांद्यावरचें उपरणें उजव्या खांद्याखालून घेऊन त्यांनीं त्याचा शेव वरून मागें टाकला. दुसऱ्या पदरानें आपले सदा वहाते डोळे एकवार पुसून घेतले.

काठी लवकर हातीं लागली; पण बाहेरच्या ढिगाऱ्यांतल्या वहाणा त्यांना चटकन् सांपडेनात. बऱ्याच उलथापालथीनंतर त्यांनीं त्या बाजूला काढल्या. त्या पादत्राणांचे द्रोण झाले होते. नानांइतकींच तींहि म्हातारीं झालीं होतीं. तीं पायांत सारतांना ते मनाशीं म्हणाले. ' आतां नव्या वहाणा घ्यायला झाल्या आहेत. ' पण त्याच वेळीं त्यांना पुतण्याच्या बायकोचे चार दिवसांपूर्वीचे शब्द आठवले. ' आहेत त्याच बऱ्या आहेत. देवळांत चोरीला जाण्याची भीति नाहीं. ' तो लाकडी जिना उतरतांना ते स्वतःशींच पुटपुटले, ' बरं आहे बाई ! तुझ्या मनासारखं ! ...'

ते प्रथम नगरवाचनमंदिरांत जाणार होते. चार वर्तमानपत्रें चाळणार होते. नंतर तुळशीबागेंतल्या रामाचें दर्शन घेऊन तसेच पुढें गायआळींतल्या रामाकडे जाणार होते. त्यांचे आवडते कीर्तनकार ताम्हनकरबुवा यांनीं तिथें ' महिना ' लावला होता. त्यांच्या पूर्वरंगांतल्या वेदांतनिरूपणावर ते निहायत खुष होते. हा एक महिना आपला श्रवणभक्तींत सार्थकीं लागणार, याबद्दल त्यांना समाधान वाटत होतें. याच खुषींत ते विश्रामबागेवरून उजव्या हाताला वळले. मोटारी, सायकली, टांगे यांचा चक्रव्यूह भेदीत शनीच्या पाराकडे आले. जिलब्या मारुतीकडे येतांच एक महारोगी भिकारी पुढें झाला अन् त्यानें आपल्या झडलेल्या बोटांचा नानांना सलाम केला.

किती दैन्यवाणा होता तो ! नाना एकदम थबकले. अशा भिकाऱ्याला पैसा टाकायचा नाहीं, तर दुसऱ्या कोणाला ! भिकाऱ्यानें नानांचा उद्देश समजून तशाहि अवस्थेंत तोंडावर लाचारीचें हसूं दाखवलें. नाना मनांत म्हणाले, 'रांडेच्या, हसतोस कसला ? काय दशा झाली आहे तुझी ! ' त्यांनीं कोटाच्या गुंड्या काढून आंतल्या खिशांत हात घातला. बराच वेळ बोटांनीं आंतल्या आंत चांचपलें. पण खिशांतच नाहीं ; तें चिमटींत येणार कुठून ! बाहेरच्या खिशांत कांहीं नसतें हें त्यांना ठाऊक होतें ; पण तरीहि त्यांनीं ते धांडोळले. पण सगळ्या बाजूंनीं षड्विध नकार. नाना अगदींच कफल्लक होते. वस्तुतः एक गोष्ट त्यांच्या लक्षांत रहायला हवी होती. त्यांच्या पुतण्याची बायको परवांच त्यांना म्हणाली होती. 'आतां पहिल्या तारखेपर्यंत कांहीं मिळायचं नाहीं. हातखर्चासाठीं दिलेले पैसे महिनाभर पुरवून वापरायला नकोत ? बसले आपले वीस तारखेच्या आंतच खंक होऊन !' नानांना वार्धक्याच्या विसरभोळपणांत आपल्या खिशांचें हें रितेपण लक्षांत राहिलें नाहीं आणि त्यांना त्या भिकाऱ्यापुढें लज्जित व्हावें लागलें. अपराध्यासारखे खालच्या मानेनें ते त्या महारोग्याच्या पुढून सरकले.

पण दहा पावलें पुढें गेले नाहींत तोंच ते एकदम थबकले. 'कशाला जायचं तुळशीबागेंत ? रिक्त हस्तानें देवापुढें उभं रहाणं हें पाप नसलं तरी शिष्ट-संकेताच्या विरुद्धच नाहीं का ? शिवाय तें मनाला तरी कसं पटायचं !...' त्यांना त्या भिकाऱ्यापुढें लाज वाटली अन् आतां वाईट वाटलं. दोन्ही प्रसंगीं फक्त एक तांबडा पैसा त्यांना हवा होता. कधींमधीं एखादी दिडकी त्यांच्या कडोसरीला असे. आज तीहि नाहीं हें त्यांना ठाऊक होतें. पण तरीहि त्यांच्या बोटांनीं तिथें चाळा केलाच.

आणि मग ते तसेच परत फिरले. तो भिकारी आपणाकडे तुच्छतेनें पहात तर नाहीं ना, हें त्यांना पाहिल्यावांचून राहवलें नाहीं. त्याचें दुसऱ्या कोणापुढें तरी तोंड वेंगाडणें चालू आहे अन् आपल्याकडे लक्ष नाहीं, हें पाहून त्यांना हायसें वाटलें. जो प्रश्न तुळशीबागेच्या वाटेंत उभा झाला तोच आतां बुवांच्या आरतीच्या वेळींहि येणार होता. पण तरीहि त्यांना कीर्तनाचा लोभ सोडवेना. त्यांनीं सरळ गायआळीचा रस्ता धरला. वाटेंत एका दुकानांत दोन माणसें कोणाच्या तरी महायात्रेसाठीं लागणारें सामान खरेदी करीत असलेलीं त्यांना

दिसली. ते मनांत म्हणाले. 'कोणीतरी एक जीव सुटला भवजंजाळांतून. आपल्यालाहि झालीं कीं आतां पाऊणशें वर्षे! आणखी किती जगायचं आतां? पण यमाजी भास्कर माझं नांव विसरला आहेसं दिसतं! सगळीं माझ्या आधीं गाशा गुंडाळून मोकळीं झालीं! आपलं उर्वरित आयुष्य मला घालून गेलीं...'

चालतां चालतां त्यांनीं पुन्हा एकदां डोळे पुसले. मधून मधून तसें केल्याशिवाय त्यांना पुढचें सगळें अंधुक होत होतें. ते गायआळीच्या मंदिरापुढें आले तर आंत श्रोत्यांची ही थाप बसलेली. मांडीला मांडी चिकटलेली. क्षणभर तिथेंच उभें राहून त्यांनीं तो मिश्रजनसंमर्द एकदा डोळ्याखालीं घातला. 'एवढीं माणसं रोज कथा ऐकतात. पण ती यांपैकीं कितीकांच्या कानांतून मनापर्यंत पोंचली असेल! काम-क्रोध-लोभांची मात्रा किती जणांची कमी झाली असेल! आपण माणूस आहोंत ना, मग निदान माणुसकी तरी विसरूं नये, एवढं साधं तत्त्व तरी किती जणांच्या हृदयावर बिंबलं असेल! हीं माणसं येतांना जितकीं कोरीं, तितकींच जातांनाहि कोरींच रहात असतील! आपला पुतण्या, आपली सून, कथा न ऐकतां जें करतात तेंच हीं माणसं कथा ऐकूनहि करीत असतील. माझ्या पहाण्यांतला एकच अपवाद म्हणजे निर्मला. ती मुलगी वेगळी आहे. तिचं स्मरण झालं तरी मूर्ति डोळ्यापुढें न्याहाळते. बरं वाटतं...'

हे वाऱ्यावर विखुरणारे विचार आवरून नाना देवळांत शिरले. शक्य तेवढा कोणाला पाय लागूं न देतां अन् लागलाच तर नमस्कार करीत त्यांनीं गर्दीतून वाट मिळवली. बुवांच्या समोर पुढच्या रांगेंत ते कसेबसे अधिष्ठित झाले. आपली काठी त्यांनीं मांडीखालीं आडवी घातली. 'म्हाताऱ्याला आधीं यायला नको अन् पुढें मात्र बसायला हवं!' म्हणून शेजारच्या मंडळींनीं त्यांच्याकडे नापसंतीचा कटाक्ष टाकला. पण नानांचं तिकडे लक्ष नव्हतं. गुलाबी पगडी घातलेल्या बुवांच्या मुखमंडलाचें दर्शन घ्यायचें तर त्यांना आधीं उपरण्याचा शेव डोळ्यांना लावायला हवा होता. एवढ्यांत बुवांनीं मंगलाचरण संपवून निरूपणाचा अभंग सुरू केला—

**"आयुष्य गेलें वायांवीण। थोर झाली नागवण"**

नानांनीं एकदम मान डोलवली. जणूं बुवा आज त्यांचेंच कीर्तन लावणार होते. त्यांच्यात्र जीवनाचा पट उलगडणार होते. ते मग पुढच्या निरूपणासाठीं

सावचित्त होऊन बसले. दृष्टीची संतत धार बुवांच्या मुद्रेवर ओतीत आत्मरसात बुडी घ्यायला निघाले.

पूर्वरंग पार घालून बुवांनीं कंबर बांधली आणि आख्यानाचा उपक्रम केला. आख्यान होतें भारतीय युद्धानंतरचें. अर्थात् त्यांत धतराष्ट्र येणें अपरिहार्य होतें. किंबहुना त्याचाच प्रसंग बुवांना सांगायचा होता. सगळे कौरव धारातीर्थी निजल्यावर धृतराष्ट्राची अवस्था मोठी करुणाजनक झाली होती. त्याला पांडवांच्या सावलीला येऊन उभें रहावें लागलें होतें. विदुराला तें मुळींच पसंत नव्हतें. त्यानें एक दिवस येऊन त्या आंधळ्याची चांगलीच कानउघाडणी केली होती. बुवा जणूं समोर तो अंध म्हातारा खोंगी घालून बसलाच आहे, अशा अभिनिवेशानें सांगत होते —

"जेहत्ते विदुर धतराष्ट्राकडे आला. त्याला धृतराष्ट्राची दया येण्याऐवजीं घृणाच वाटली महाराज! तो म्हणाला, 'जन्मभर पांडवांचं वाईट चिंतिलंस. त्यांच्या घातापाताचीं कृत्यं केलींस. अन् आतां त्याच घरीं बसून कुत्र्यासारखे तुकडे मोडतोस, याची तुला शरम वाटायला हवी! आतां काय उरलं आहे तुझं? शंभरच्या शंभर मुलगे काळाचं खाजं झाले. अन् अजून तुला जगावंसं वाटतं! धिक्कार असो तुला!'..."

नाना मनांत म्हणाले, 'धृतराष्ट्राऐवजीं नारायण गणपत बोडस हें नांव घातलं कीं हें माझंच आख्यान होऊं शकेल...नाहीं! पण या सगळ्या गोष्टी मला लागू पडत नाहींत. मी पुतण्याच्या घरीं तुकडे मोडतों हें खरं; पण मी त्याचं स्वप्नांतसुद्धा वाईट चिंतिलं नाहीं. उलट माझ्याजवळ होतं नव्हतं तें त्याला देऊनच मी त्याच्या पागोळीला गेलों. त्याचं दुकान ऊर्जितकाळाला आलं त्याला माझं द्रव्यबळ बरंच उपयोगी पडलं आहे. माझा मुलगा मात्र धृतराष्ट्राच्या मुलांसारखा लढाईंतच कामीं आला. माझी 'आंधळ्याची काठी' मोडली. मागाहून बायको हाय खाऊन मेली. उरलों तो मी. माणूस सांडलेल्यांत शोधतो म्हणतात तसं मींहि केलं. मुलाच्या जागीं पुतण्याला मानलं. भावाचा मुलगा तो आपलाच मुलगा समजलों.

'पण काय उपयोग झाला त्याचा? शेवटीं काय नशिबी आलं? म्हातारपणीं बायको मरूं नये म्हणतात. शंभर टक्के खरं आहे तें. बायकोवांचून म्हातारा

म्हणजे आईवांचून तान्हं मूल. माझंच उदाहरण पहा ना. पुतण्याच्या घरांत आज मी अडगळ ठरलों आहें! सगळींच माझी उपेक्षा करतात. मी पुतण्याकडे काय 'वराय' मागतों? फक्त महिना पांच रुपये किरकोळ खर्चाला. पण तेसुद्धा सुनेच्या हातून सुटत नाहींत. मला म्हणते. 'हा रुपया घ्या...नाहीं पुरत? मग हे आणखी आठ आणे...कपाळाला अशा आंठ्या घालायला काय झालं? अधिक कांहीं लागलं सवरलं तर आम्ही काय परदेशाला गेलेलों नाहीं ना?...'

'मग काय, डब्यांतलीं पानं संपलीं कीं प्रत्येक वेळीं सुनेकडे का धाव घेऊं? आठपंधरा दिवसांनीं एकदां स्मश्रु करायची तीहि का सुनेच्याच परवानगीनें? तुटलेली वहाण लावून घ्यायची, तर ती हातांत घेऊन मी सुनेपुढें का उभा राहूं!' नानांच्या अशा अनेक बारीकसारीक गोष्टी असत. आणि माणूस म्हटलें कीं त्या असायच्याच. शिवाय आपलें पोट साफ ठेवण्यासाठीं कसलें तरी पाचक–सारक चूर्ण त्यांना नेहमीं लागायचें. शक्य तोंवर आंथरूण धरायचं नाहीं, यासाठीं त्यांची ही खटपट असे. उभें असतांना घरांत ही अनास्था; मग आडवा पडलों तर आपली काय गत होईल, ही त्यांच्या मनांत सदैव धास्ती असे.

ते रात्रीं जेवतं नसत ते याचसाठीं. सगळ्यांनीं माजघरांत बसून तळून वळून जेवायचें आणि त्याच वेळीं नानांनीं आपल्या खोलींत बसून व्यंकटेशस्तोत्र म्हणायचें. वस्तुतः त्यांना कपभर दूध देणें सुनेला अशक्य नव्हतें. पण ती शाळेंत 'डोमेस्टिक सायन्स' शिकली होती ना! म्हाताऱ्याला दूध दिलें न दिलें सारखेंच. त्याला काय ताकद भरायची आहे, का त्याची वाढ व्हायची आहे! आणि दुसरें म्हणजे भुकी तो सुखी! पुतण्याला कांहीं सांगायची सोयच नसे. तो लगेच 'वारें पाणी' करून टाकी. 'गृहराज्याची मालकीण ती. तिनं बोलावं अन् आम्हीं झेलावं.'

नाना म्हातारे झाले म्हणून काय झालें? त्यांनाहि एखादे दिवशीं लहर येई कीं, आज कशानें तरी तोंड गोड करावें. दाबण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करूनहि ती दबत नसे. पण घरांतले फळीवरचे डबे त्यांच्यासाठीं सदैव झाकलेले. मग ते उठत. डोक्यावर टोपी ठेवीत. सदऱ्यावरूनच उपरणें ओढून घेत. एकदा डोळे टिपीत. आणि जिना उतरून खालीं येत. न सांगतांच त्यांचीं पावलें ट्रेनिंग कॉलेजच्या दिशेनें पडूं लागत. सख्ख्या पुतण्याचें घर दूर करून चुलत पुतण्याचें

घर ते जवळ करूं लागत. पुतण्या घरीं असेल कीं नाहीं याची त्यांना विवंचना नसे. निर्मला भेटली कीं बस्स आहे. अन् ती भेटणारच, याची खात्री असे. अग बाईऽ! मामंजी आले' हे संभ्रमाचे गोड शब्द ऐकण्यासाठीं त्यांचे कान अधीर होत. त्या नादांत गर्क असतांना एखाद्या अनाडी सायकलस्वारानें त्यांना धक्का दिला तरी ते त्याची दखल घेत नसत.

ते आले कीं त्यांच्यासाठीं आरामखुर्ची मोकळी होई. 'तब्येत बरी आहे ना?' हा ठराविक पण आस्थेवाईक प्रश्न त्यांच्या कानीं पडे. निर्मला हातांतलें सगळं काम टाकून समोरच्या भिंतीशीं सविनय उभी राही. नाना तिला एकदा आपादमस्तक आपल्या कृपादृष्टीनें न्हाणीत. मग तिच्या बोलक्या नजरेशीं आपली नजर मिळवीत. पुढें इकडच्या तिकडच्या गप्पा सुरू होत. निर्मला आपल्या मुलांच्या खोड्या त्यांना सांगे. आपल्या 'ह्यां'च्याबद्दल कांहीं भावमधुर तक्रारी करी. जणूं नाना त्या सगळ्या लहानथोरांना शिस्त लावायलाच तिथें आले आहेत, अशा थाटांत बोले. नानांचे कान निवत. डोळे निवत. मग चांदीच्या वाटींतून एखादा लाडू अथवा दोन वड्या त्यांच्यापुढें येत. तुकडा मोडून त्याची चव घेतांना नानांना वाटे कीं, ही वडी गोड आहे; पण याहून निर्मला अधिक गोड आहे. हिच्या हातच्या कोणत्याहि पदार्थाला विशेष चव असते ती निर्मला आपल्या अंतरांतलं 'मधु' त्यांत टाकते म्हणूनच.

थोड्या वेळानें ते जायला उठत; पण त्यांना जावेंसें मात्र वाटत नसे. निर्मलेच्या गोकुळांतला वृक्षपाषाण होऊनसुद्धा रहाण्याची त्यांची तयारी होती. पण तें अशक्य होतें. विचारांत घेण्याजोगेंहि नव्हतें. ते मग काठी उचलून जाण्यासाठीं एकदा डोळे टिपीत. एवढ्यांत निर्मला जवळच्या खोलींतून बाहेर येऊन त्यांच्यापुढें उभी राही अन् हात पुढें करून म्हणे.

"हे ठेवून घ्यावे."

ते दोन रुपये घेण्यासाठीं नानांचे हात राजी होत नसत. पण निर्मलेच्या दृष्टींत असा कांहीं कोंवळा आदरभाव त्यांना दिसे कीं, तिचें तें दान स्वीकारल्यावांचून पुढें जाणेंच अशक्य व्हावें. तो सगळा दिवस मग त्यांचा आनंदांत जाई. तिचें घर मनानें तें आपल्याबरोबर आणीत आणि मग त्यांतच रमत. त्या दिवशीं त्यांना घरांतले कांटे बोंचत नसत. ते म्हणत, 'चालूं द्या तुमचा उपरोध—उपहास!'

नाना निर्मलेकडे अधून मधून जातात हें त्यांच्या सुनेला ठाऊक झालें होतें. तिला तें मुळींच पसंत नव्हतें. आपल्या 'गुणां'चा पाढा ते तिथें त्या बयेजवळ वाचीत असतील, अशी तिची खात्री होती. ती उघड उघड म्हणे, कीं "ही बया यांच्या हातावर रुपैया, आठ आणे टिकवते अन् लगेच हे म्हातारबुवा विरघळतात. इकडे येऊन तिचीं स्तोत्रं म्हणायला लागतात. म्हणे, 'निर्मला ॲच्ची आहे नि टॅच्ची आहे.' घटकाभर गोड बोलून बरं म्हणून घेणं सोपं! तिला म्हणावं हें म्हातारं चिवट खोड कायमचं संभाळ घरांत. म्हणजे मग पाहीन भलेपणाची चेगड किती दिवस टिकते तें..."

पण निर्मलेचें तें करणें वरवरचें नव्हतें. ती नानांना आपल्या घरीं ठेवून घ्यायला तयार होती. नानांच्याविषयीं तिच्या मनांत गुरुभावाचा आदर होता. नाना सेवानिवृत्त झाल्यावर रिकामपणाचा उद्योग म्हणून मिळाली तर एखाद-दुसरी शिकवणी करीत. निर्मलेची शिकवणी ही त्यांतलीच एक होती. संस्कृत आणि गणित हे नानांचे हातखंडा विषय. निर्मला मॅट्रिकच्या वर्गांत असतांना नानांनीं त्या दोन्ही विषयांत तिची चांगली तयारी करून घेतली होती. नानांच्यापुढें प्रथम पुस्तक घेऊन बसतांना, परीक्षेंत उत्तीर्ण होणें एवढाच हेतु तिनें मनाशीं धरला होता. पण नानांनीं थोड्याच दिवसांत तिच्या मनांत संस्कृताविषयीं रस उत्पन्न केला होता. तिच्याकडून बरेंच अवांतर वाचून घेतलें होतें. अन् हें कसें? तर आंजारून, गोंजारून नि हसत, खेळत. ज्ञाना-बरोबरच त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचीहि तिच्यावर छाप पडली होती. निर्मलेच्या आदरणीय पुरुषांच्या यादींत नानांचें नांव दाखल झालें होतें. त्या वेळीं ती नानांची फक्त शिष्या होती. ती त्यांच्या चुलत भावाच्या मुलाची गृहलक्ष्मी झाली ती त्यानंतर. आपल्याला एका कुशल आणि नामवंत शस्त्रवैद्याचें गृहिणी-पद मिळवून देण्यांत नानांचा बराच हात आहे, हें तिला ठाऊक झालें होतें. आणि म्हणूनच तिचें अंतःकरण नानांविषयीं सदैव कृतज्ञ होतें. नानांच्या जीवनाची ही सर्व बाजूंनीं झालेली शोकांतिका पाहतांना तिचा जीव तिळतिळ तुटायचा. ती त्यांना अनेकदां म्हणायची.

"आपण आतां आमच्याकडे रहायला यावं. आम्ही कांहीं आपल्याला परके नाहीं आहोंत..."

पण नाना तिचें तें बोलणें हसण्यावारी घालवीत आणि सरळ घरीं येत. ऊंस

गोड लागला म्हणून मुळासकट खाऊं नये, असें त्यांना वाटे. पण घरीं जातांना मनांतल्या मनांत दोघींची तुलना केल्यावांचून मात्र त्यांना राहवत नसे. निर्मला अन् आपली सून. निर्मलेला वाटतें कीं, वृद्धापकाळीं आपल्याला शक्य तेवढें सुख, समाधान लाभावें. अन् सून म्हणते कीं, म्हातारा केव्हां एकदा गचकेल ! सूनच कशाला, घरचीं सगळींच माणसें आपल्यासाठीं तिलांजलि घेऊन उभीं आहेत, हें त्यांना समजे. पण ते तरी काय करतील ? जीवनयात्रा संपविणें हें कांहीं त्यांच्या हातांत नव्हतें. अन् ती केव्हां संपेल याचाहि त्यांना अंदाज नव्हता. अशा वेळीं त्यांना मग आपल्या मृत पत्नीची अनावर आठवण होई. अकालीं मृत्युमुखीं पडून कुलक्षयाला कारणीभूत झालेल्या आपल्या मुलाचें स्मरणहि त्यांच्या हृदयांत कालवाकालव करी. त्याचे गुण आठवत, शब्द आठवत अन् मायाहि आठवे. बायको जिवंत होती, स्वतःचें बिऱ्हाड होतें, तोंवर ते दरवर्षी मुलाचें श्राद्ध करीत. अंतरीं रडत, पण बाहेर कांहीं न दाखवतां दोन ब्राह्मण त्या तिथीला जेवायला वाढीत. मुलानें बापासाठीं अपसव्य करायचें; पण इथें बापालाच तें मुलासाठीं करावें लागे. हें सगळें उफराटें होतें. पण एका भावनेच्या पोटीं नाना तें दिव्य करीत आणि बायकोलाहि करायला लावीत. ‘ पुढें वंशतंतु तुटलाच आहे. तेव्हां आपल्या देहांत प्राण असेतोंवर तरी पोराला पळीभर पाणी द्यावं ’ असें त्यांना वाटे.

पण पुतण्याच्या घरीं रहायला आले त्या वर्षापासून तें श्राद्ध बुडालें होतें. तिथीच्या आधीं दोन दिवस त्यांनीं तो विषय सुनेजवळ काढला होता. ‘ वाढशील का ग दोन ब्राह्मणांना स्वैंपाक करून ? ’ त्यावर ती महामाया कपाळाला आंठ्या घालून तुच्छतेनें बोलली होती.

“ हें काय बाई अभद्र बोलणं ! ऐन दिवाळींत म्हणे श्राद्ध करा ! मुलाबाळांचं घर. वर्षाचा मंगल सण. अन् मी श्राद्धाचा स्वैंपाक रांधीत बसायचं ? भटजी दर्भ घेऊन घरांत शिरायचे ? छान ! माणसाला बोलवतं तरी कसं देव जाणे ! सणावारीं मी असलं अभद्र करायची नाहीं हो ! अन् करूं पण द्यायची नाहीं माझ्या घरांत ! जिवंत माणसांपेक्षां ह्यांना मेल्यागेल्यांचीच काळजी अधिक... ”

त्यावर नाना एवढेंसें तोंड करून तिला म्हणाले होते.

“ मीं शब्द परत घेतले ; पण पुढें अधिक कांहीं बोलूं नको. दुःखावर डागण्या देऊं नको ! ”

त्या वर्षी मग ते श्राद्धतिथीच्या दिवशीं सकाळीं उठून आपल्या भटजींच्या घरीं गेले होते. तिथें दोन भटजींना पाट मांडून त्यांनीं मुलाच्या नांवानें नुसतें उदक सोडलें होतें. पावशेर पेढे अन् रुपया दक्षिणा प्रत्येकाला देऊन त्यांनीं त्यांच्या तोंडून वदवलें होतें, 'गयाश्राद्धफलमस्तु!' आणि पुढें दरवर्षी हाच पर्याय त्यांनीं चालू ठेवला होता. तेवढयावरच ते आपल्या मनाचें समाधान करून घेत होते.

पण या वर्षी दिवाळीची चाहूल लागली, श्राद्धतिथि जवळ जवळ येऊं लागली, तसतसें नानांचें हृदय अस्वस्थ होऊं लागलें. चालू घटकेला त्यांचा खिसा रिकामा होता. ते पुरते निष्कांचन होते. घरांत मागण्याची सोय नव्हती. श्राद्धाचें नांव काढतांच सुनेच्या कपाळीं तिडीक उठणार होती! ती पैसे तर देणार नव्हतीच; पण कांहींतरी लागट, झोंबरे शब्द मात्र बोलणार होती! पुतण्याला विचारावें तर तो कानीं तुळशीपत्र ठेवणार होता. 'घरांतले सगळे अधिकार तिच्याकडे. तुमचा अर्ज तिकडे जाऊं द्या.'

पण तरीहि नानांनीं निलाजरेपण पत्करलें. लाचार होऊन सुनेपुढें शब्द टाकला.

"मला चार रुपये देशील?"

तिनें लगेच विचारलें. "कशाला हवेत?"

नानांना आतां कारण सांगायलाच हवें होतें; पण खरें सांगून चालण्यासारखें नव्हतें. 'मुलाचं श्राद्ध' हे शब्द ओठावर आलेले त्यांनीं मागें परतवले. ते कानांत पडते तर ती खवळणार होती. नानांना खोटें बोलण्याची संवय नव्हती. पण या क्षणीं त्यांनीं तें साहस करायचें ठरवलें. ते म्हणाले,

"एक औषध आणायचं आहे."

"चार रुपयांचं औषध? अन् तुम्हांला? विचार काय केला आहे? मार्कंडेयाचं आयुष्य जगायचं आहे कीं काय? अहो, चार रुपयांचीं औषधं आणून खायचीं या दिवसांत एखाद्या संस्थानिकाला तरी हिंमत होईल का? अन् करायचीं काय हो औषधं? अं? जेवतां तर चांगले! झोपतां तर डाराडुर! झालं आहे काय तुम्हांला? असल्या या तुमच्या भलभलत्या चोचल्यांपायीं घरांतला पैसा किती जातो याचा कांहीं हिशेब! पुन्हां वर म्हणायला तयारच, होतं नव्हतं तें पुतण्याला दिलं, तरी मला कोणी विचारीत नाहीं!"

नाकपुड्या फुलवून केलेल्या या सरबत्तीनें नाना जेर झाले. ‘ भीक नको पण कुत्रं आवर ! ’ असें त्यांनीं मनाशीं म्हटलें. त्या दिवशीं बाहेर कुठें न जातां ते तसेच गादीशीं मरगळून पडले. ‘ पोरा, या वर्षी तुला तिळभर पोंचवायचं नाहीं रे माझ्या नशिबांत ! ’ ते कळवळून आंतल्या आंत म्हणाले. कोणत्या मार्गानें, कोणत्या साधनानें चार रुपये मिळवावे हें त्यांना उमगेना. ते नोकरी करणार होते, हमाली करणार होते, भिक्षुकी करणार होते, का काय करणार होते ?

हां, एक उपाय होता. अन् तो घरांतल्या घरांतच साधण्याजोगा होता. त्यांची सून आपल्या टापटिपीच्या बढाया मैत्रिणींना सांगे ; पण त्या नुसत्या तोंडच्या बाता होत्या. ती होती गबाळी अन् धांदरटच. नाना क्रमानें चार दिवस पाऊल न वाजवतां हिंडत राहिले असते तर स्नानगृहांत चारआठ आणे, कोनाड्यांत थोडे, रेडियोमागें थोडे, असे मिळून चार रुपये त्यांना सहज गांठीला बांधतां आले असते. आणि या शर्विलकीचा सुनेला पत्ताहि लागला नसता. घरांतलीं पोरें वेळोवेळीं उडवीतच होतीं कीं ! नानांच्या मनांत तसा एकदा विचार डोकावला. पण लगेच अंगावरचा कोळी झाडावा तसा, त्यांनीं तो झाडून टाकला. ते आत्मगत म्हणाले.

“ हें बरं नव्हे, मुळींच बरं नव्हे ! अं हं ! त्यापेक्षां श्राद्ध न झालेलं पत्करलं. हें चोरीचं श्राद्ध त्याला नाहीं आवडायचं. तो स्वप्नांत येऊन म्हणेल, ‘ नाना ! हें काय केलंत तुम्हीं ! पेढ्यांच्यावाटे तुम्ही मला विष कशाला चारलंत ? ’ छे ! ‘ दुर्बुद्धि ते मना । कदा नुपजो नारायणा—”

त्यानंतरचे दोन दिवस त्यांनीं विषण्णपणेंच घालवले. ‘ सगळं यथास्थित होतंय ; पण त्यांच्या चेहऱ्यावर काळं ओतलंय जसं ! ’ हे सुनेचे ठोसरेहि घेतले. तिसरा दिवसहि असाच गेला असता. पण तो निराळा व्हायला एक निमित्त घडलें. त्या दिवशींच्या ‘ सकाळ ’मधलें जाहिरातीचें सदर पाहून त्यांचें मन एकदम उमललें. त्यांत एका सुखवस्तु गृहस्थानें जाहिरात दिली होती. त्याच्या मुलांना घरीं शिकविणारा एक जाणता, अनुभवी शिक्षक हवा होता. ‘ बाकीच्या गोष्टी समक्ष ’ असें त्यानें शेवटीं म्हटलें होतें.

हें काम आपल्याला जमण्यासारखें आहे म्हणून नानांनीं चुटकी वाजवली. त्यांनीं पुन्हां एकदा ती जाहिरात वाचून मनाची खात्री करून घेतली. खालचा

पत्ता नोट पाहून लगेच कपडे चढवले. 'हो, शुभं च शीघ्रम्! आपल्या आधीं दुसरा कोणी गेला म्हणजे सगळंच ओंफस्!' नेहमींप्रमाणें चहाची वाट न बघतां एकदा डोळे पुसून ते जिना उतरले. बाहेर येऊन पुढच्या रस्त्याला लागले. जिमखान्यावर जायला बस होतो; पण ती कोणाला? ज्याच्या खिशांत आणेली असेल त्याला. त्यांना पी. वाय. सी. वर पोंचवणार होती ती त्यांच्या हातांतली काठी! सगळ्या परिवारांत तीच एकटी त्यांच्याशीं स्नेह-सौजन्यानें वागत होती.

'इंदुसदन' शोधून काढायला त्यांना बरेच सायास पडले. अखेर एकदाची पाटी दिसली. तींच अक्षरें ना म्हणून त्यांनीं डोळे टिपून पुन्हां एकदा ती पाहून घेतली आणि मग हळूच फाटक उघडलें. दारांतच त्यांना चार-पांच मुलें दिसलीं. त्यांनीं प्रत्येकाकडे एकदा शिक्षकाच्या नजरेनें निरखून पाहिलें. हीं अगदींच कच्चीं-बच्चीं आहेत, तीं नव्हेत. ही फुलांचं पातळ नेसलेली मुलगी अन् हा बारा-तेरा वर्षांचा मुलगा हीं दोघंच बहुधा शिकणार असावीं. ते मनाशीं म्हणाले. जणूं त्यांना शिकवणी मिळालीच होती.

"कोण पाहिजे?" त्या मुलीनेंच पुढें होऊन विचारलें.

"निमकरसाहेब. आहेत ना घरांत?"

नाना व्हरांड्यांतल्या खुर्चीवर टेकले. थोड्याच वेळांत घरांतून एक गोरटेले स्थूलसे गृहस्थ बाहेर आले. नानांनीं उठून त्यांना नमस्कार केला. घरधन्यानें पृच्छा केली.

"काय काम आहे आपलं?"

नाना एकदा खांकरले. त्यांनीं उपरण्याचा शेव डोळ्यांशीं नेला. आणि खिशांतली 'सकाळ' ची घडी बाहेर काढून उलगडली.

"ही जाहिरात आपणच दिली आहे ना? संस्कृत शिक्षक हवा असल्याबद्दल?"

"होय. मीच दिली आहे. कोणासाठीं विचारायला आलां आहांत आपण?"

"अहो, दुसऱ्या कोणासाठीं? मलाच हवी आहे ही शिकवणी."

"आपल्याला!"

"हो. शंका आली का? मी एका हायस्कूलचा हेडमास्तर होतों. तीस वर्षं शिकवलं आहे अन् तेंहि संस्कृत अन् गणित. माझे दोन विद्यार्थी जगन्नाथ शंकरशेट आले आहेत. नांवं सांगतों वाटल्यास. रत्नागिरीचा—"

" बसा आधीं आपण. मला त्याबद्दल नाहीं शंका आली. आपलं आतां वय झालं आहे, तेव्हां—"

" वय होऊं दे. पण स्मरणशक्ति अजून जागृत आहे!"

" तेंहि ठीक आहे. पण इथवर रोज येणं आपल्याला कितपत झेपेल—"

" झेपेल. अगदीं सहज झेपेल. तसा मी कांहीं अंथरुणाला खिळलों नाहीं. शिकवणींत खाडे नाहीं करायचा."

" माफ करा हं मला. पण या वयांत आपल्याला ही गरज कां बरं भासावी? आपल्या घरीं कोण मंडळी आहेत? मुलगे काय करतात?"

" तें विचारूं नका, साहेब. तें सोडून सगळं विचारा. मोठी कहाणी आहे ती. सांगणं बरं नव्हे. प्रशस्त नव्हे. गृहछिद्रं कोणाला सांगूं नयेत. मी कोणी लुच्चा, लफंगा नाहीं, एवढंच माझ्या चर्येवरून आपणाला पटतं का पहा."

नानांच्या या बोलण्यानें अन् त्यांची घामानें ओली झालेली भावविवश मुद्रा पाहून निमकर एकदम गंभीर झाले. त्यांची खात्री झाली कीं, या म्हाताऱ्याचें कांहींतरी बिघडलें आहे खास. 'आपल्या मुलापासून फटकून तरी निघाला असावा, अथवा...अथवा आणखी काय बरें असूं शकेल? तपास केला पाहिजे. नाहीं तर या वयांत, गोवऱ्या ओंकारेश्वरावर गेल्याच्या अवस्थेंत, शिकवणी मागायला कोण येईल!'

" कां, तुम्ही असे गंभीरसे झालांत?"

" नाहीं, तसं नाहीं कांहीं. आतां दिवाळी जवळ आली. एवढ्यांत कांहीं मुलं शिकायला तयार होणार नाहींत. सण संपला कीं मग ठरवूं काय तें. तुमचा पत्ता मला देऊन ठेवा. मी कळवीन तुम्हांला."

" पत्ता नको. मीच येईन. भाऊबिजेच्या दुसऱ्या दिवशीं. जातों मी आतां. नमस्ते."

नाना उठले. वाळून द्रोण झालेल्या वहाणा त्यांनीं पायांत सरकवल्या. ते पायऱ्या उतरून खालीं गेले. फाटकापर्यंत पोंचल्यावर त्यांना काय वाटलें कोण जाणे! ते पुन्हा मागें वळले.

" हें पहा, मला नाहीं म्हणूं नका. अन् दुसरीहि एक गोष्ट सांगून ठेवतों.

माझी अपेक्षा फार नाहीं. फक्त दहा रुपये. तेवढे मला पुरतील...जातों मी... माझी निराशा करूं नका. तुमच्या मुलांना तयार करून सोडतों."

"बरं, बरं." निमकर म्हणाले.

नाना लकडीपुलाचा रस्ता चालूं लागले. त्यांना वाटलें कीं, 'हें आपलें जमणार. गृहस्थ भला दिसतो. दहा रुपये भरपूर झाले आपल्याला.' पूल ओलांडल्यावर ते ट्रेनिंग कॉलिजच्या पिछाडीला वळले. उन्ह सोसेना म्हणून त्यांनीं उपरण्याचा शेव डोक्यावर टाकला. निर्मलेचें घर हें आतां त्यांचें दुसरें उद्दिष्ट होतें. बरेच दिवसांत ते तिकडे गेले नव्हते. नेहमींप्रमाणेंच त्यांचें सहर्ष स्वागत झालें. जायला निघतांना दोन रुपयेहि त्यांच्या हातीं आले. त्या रौप्यमुद्रा न्याहाळतांना त्यांच्या नेत्रांत प्रेमाश्रू उचंबळले.

"निर्मले, माझा हा रतीब झाला आहे आतांशा! तुझ्याकडे यावं अन् दोन रुपये खिशांत टाकून निघून जावं! मला खरोखरच संकोच वाटतो. पण तुला नाखुष करवत नाहीं. पण आज मात्र तेवढ्यावर माझं भागायचं नाहीं. आणखी दोन रुपये मला हवे आहेत. देशील? दिवाळींत मुलाच्या नांवानं उदक सोडायचं आहे. हे दोन रुपये पेढ्यांना झाले. आणखी दोन दक्षिणेसाठीं लागतील. उद्या हाताला सवड झाली तर परत करीन मी तुझे. पण आज तरी भिकेवर श्राद्ध करायला निघालों आहें..."

"असं कांहीं बोलायचं असेल तर मला मरणप्राय दुःख होईल! आम्ही आपल्याच कुळांतलीं लेकरं. आपल्याच आशीर्वादानें आमचं बरं भलं व्हायचं. अन् आपणच जर भीकबीक असलं कांहीं बोलायला लागलां—"

"नाहीं मुली. शब्द मागें घेतले. दे मला आणखी दोन रुपये. अगदीं हक्कानं मागतों. ज्याचं श्राद्ध मला करायचं आहे, तो तुमचाहि कोणीतरी लागतोच."

निर्मलेनें दिलेले आणखी दोन रुपये घेऊन नाना उठले. प्रसन्न मनानें उठले. "येतों हं ऽ" म्हणून त्यांनीं काठी उचलली. निर्मलेला वाटलें कीं, म्हातारा आतां उन्हाचा जाणार! तिनें पुन्हा एकदा त्यांना विनवून म्हटलें.

"आतां आपण जेवूनच जावं. खरं म्हणजे जाऊंच नये. पुरे झालं आतां तिकडचं रहाणं. आपण सांगितलं नाहीं तरी मला सगळ्या गोष्टी कळल्या आहेत!"

नानांच्या हृदयांतल्या दुखऱ्या जागेलाच तिनें हळुवार स्पर्श केला होता. त्यांची काठी थांबली. पायहि थबकले. तोंड निर्मलेकडे वळलें. ते गहिंवरले. उभ्या उभ्या कांपूं लागले.

" मुली, तूं सांगतेस तें तुझ्यापरी ठीक आहे. माझ्याहि हिताचं आहे. तुझ्या घरांतला आनंद पाहतांना मी माझ्या उरांतलीं सगळीं सळ विसरूं शकेन. तुझं कौतुक पहातांना सुखावेन. पण मला तसं करतां येणार नाहीं ! माझी मृत्युशय्या तिथं घातलेली आहे ! माझा तिथला मुक्काम हालायचा तो वरच्या मुक्कामाला निघते वेळीं..."

" असं काय म्हणतां ? आपल्याला तीं अन् आम्ही दोघंहि सारखींच नाहीं का ? "

" छेः छेः ! निर्मले ! तुम्ही वेगळीं आहांत. ती वेगळी आहे; तूं वेगळी आहेस. तुम्ही दोघीहि माझ्या सुनाच; पण तिच्याशीं तुझी तुलनाच करतां येणार नाहीं. अंवस अन् पुनव या दोघींत साम्य काय दाखवायचं ! हें आपलं तुझ्याजवळ म्हणून बोलतों. तिला कांहीं बोलायची सोय नाहींच. अवघड जागीं घाव; दाखवतांहि येत नाहीं, लपवतां येत नाहीं, अशी माझी अवस्था झाली आहे ! पण तें कांहीं असलं तरी आज सातआठ वर्षे त्यांच्या घरीं अन्न खातों आहें. आतां तिथून निघालों तर आळींत बभ्रा होईल. लोक दोन्ही तोंडांनीं बोलायला लागतील. आपल्या माणसांची बेअब्रू ती आपलीच नाहीं का ? आपण स्वतःच्या वागण्यानें लोकांना तशी सवड देऊं नये ! लक्षांत आलं ना मी काय म्हणतों तें ? "

" आपल्यापुढें आम्ही काय बोलावं ! "

" अन् आणखी एक सांगूं का तुला ? आतां थोडे दिवस उरले आहेत. या वयांत आतां सुखाची आसक्ति सोडली पाहिजे. होतं तें एकापरी चांगलंच होतं. तापत्रयाची आंच लागल्याशिवाय आत्म्याचं सोनं शुद्ध होत नाहीं ! कळलं ?... शुद्ध होत नाहीं ! "

आणि यापुढें नानांना बोलवेना. क्षण दोन क्षण ते तसेच स्तब्ध उभे राहिले आणि मग त्यांची काठी फरशीवर वाजली. मागें वळूनहि न पहातां त्यांनीं रस्ता गांठला.

घरांत पाय ठेवायचा आवकाश, सून भुवया आकुंचित करून त्यांना म्हणाली.

"कुठें गेलां होतां सकाळपासून? एवढा उशीर झाला! लोकांनीं काय समजावं! त्या घरीं जाऊन बसलां असाल! ती बया हातावर टाकतेना कांहींतरी! आशा सुटेना अन् देव भेटेना!"

नाना आपल्या खोलींत शिरत होते ते एकदम मागें वळले.

"काय म्हणालीस? आशा सुटेना अन् देव भेटेना! मग ऐक! आशाहि सुटली अन् देवहि भेटला. मला कळलं. देव देव्हाऱ्यांत नसतो! देवळांतहि नसतो! त्याचं मखर आहे माणसाचं हृदय! दृष्टि बिघडलेली नसली, गढूळ बनलेली नसली, तर तिथेंच कधीं कधीं त्याचा साक्षात्कार घडतो. साध्या शब्दांतून त्याची अमृतवाणी ऐकूं येते! साध्या स्मितांतून त्याच्या कृपेचे उबदार किरण धावत येतात! त्या देवापुढें मग मान लववावीशी वाटते! तिथेंच लोटांगणीं जावंसं वाटतं! सूनबाई, निर्मलेला उगीच निरखंदू नको! माझ्याकरतां नव्हे; तुझ्याकरतां सांगतों. तिच्या अंतरांत आहे त्यांतलं तिळभर जरी उचलून आणलंस तरी या चिडचिड्या, धुसफुस्या घराचं गोकुळ बनवशील! समजलं? गोकुळ...!"

बाहेरच्या चटके देणाऱ्या उन्हांतून नाना एकदम सावलींत आले होते. त्यांचा चेहरा घामेजला होता, तांबूस झाला होता. तशांत घरीं पाय ठेवतांच सुनेनें कूस मारलें. निर्मलेच्या घरीं ते जें अनुभवून आले होते आणि जें अजून त्यांच्या अंतर्यामीं सुखाच्या लहरी उठवीत होतें, त्यावर एकदम उतारा मिळाला! निर्मलेची सहानुभूति त्या वेळीं जर्जर शरिराला सोसली नव्हती. आतां सुनेची ही टोचणीहि सोसली नाहीं. बोलतां बोलतां त्यांच्या भावना क्षुब्ध झाल्या. आंत कसलें तरी उधाण आलें. उभे होते तिथेंच त्यांचे हातपाय थरथरूं लागले. डोळ्यापुढें अंधेरी येऊन काजवे चमकूं लागले. आणि एकाएकीं त्यांचें शुष्क काष्ठ हातांतल्या काठीसह खालीं कोसळलें! त्यांची शुद्धबुद्ध हरली!

थोड्या वेळानें जेव्हां ते सावध झाले तेव्हां त्यांना कळलें कीं, आपण गादीवर झोपलेले आहोंत. डोक्याची टोपी तेवढी पडलेली आहे. बाकी कोट-उपरणें अंगावरच आहे. त्यांना मग एकेक गोष्ट आठवूं लागली. सकाळीं आपण 'सकाळ' मधली जाहिरात पाहिली, तसेच उठून पी. वाय्. सी. वर गेलों, तिथून निर्मले-

कडे आलों. तिनें आपल्याला चार रुपये दिले. दोन तिनें दिले; दोन आपण मागून घेतले. ते आतां कपाटांत सुरक्षित ठेवून दिले पाहिजेत.

त्यांनीं खिशांत हात घातला. अगदीं खोलवर, खिशाच्या बुडापर्यंत. त्यांच्या बोटांची आंत चाळवाचाळव झाली.

"ऑं ? हें काय ?" ते सभय उद्गारले. काय बरें झालें होतें ?

दुसरें काय होणार ! त्या चार रौप्यमुद्रा नानांच्या खिशांतून पसार झाल्या होत्या ! !



# एका पाडीची आत्मकथा

एक दिवस सकाळीं किरणं फांकायाच्या आंत एक धवा माणूस माझ्या धन्याच्या दारीं आला आणि मी बसलेली होतें ती ताडकन् उठून उभी झालें. धव्या माणसाला मी नेहमींच बुजायची. मला त्यांचा कधीं परिचय नव्हता. माझ्या आंवतींभोंवतीं होते ते तिबोटी लंगोटीवाले काळे कुळवाडी. कपाळाला तेलकट, कळकट 'हुर्मल' बांधला अन् घोंगडी खांद्यावर टाकली कीं झाला त्यांचा पोषाख. माझा धनीहि त्यांतलाच. धनीण लुगडं-चोळी नेसत असली तरी ती आमच्याच जातीची वाटायची मला. तेव्हां कधीं काळीं शुभ्र पोषाख केलेला माणूस जवळ आला कीं माझी भिऊन तिरपीट व्हायची.

ते थंडीचे दिवस होते. आंगणावर मांडव होता; पण कूड नव्हता. मी अंगाच्या उबेंत जिवाची मोटली करून बसलें होतें. पण एकाएकीं धडपडून उठावें लागल्यामुळें मी चांगलीच कुडकुडलें. माझ्या पाठीची कमान झाली. रात्रीं रवंथ करतांना तोंडांतून खालीं टाकलेल्या बेहड्याच्या बिया माझ्यापुढें पडल्या होत्या. त्यांना पाहून माझी मलाच दया आली. मांडवावर गोंडाळ्या गवताचे माऱ्यावर भारे रचलेले होते. पण आमचा धनी त्यांतली एक काडी माझ्यापुढें टाकील तर हराम. तो सगळा खुराक दुभत्या गाईला.

माझा धनी आपल्या खोपटांतल्या परशाजवळ थंडी निवारीत बसला होता अन् धनिणीनेंहि आपल्या तान्ह्याला पदराखालीं घेऊन तिथेंच फतकल मारली होती. आलेल्या धव्या माणसानें हाक मारतांच माझा धनी लंगोटी सावरीत बाहेर आला. पाटोपाठ धनीणहि. त्यांचं थोडा वेळ कांहींतरी बोलणं झालं. मग पाहुण्यानें खिशांतून कांहीं नोटा काढून त्याच्या हातावर ठेवल्या. धन्यानें त्या मोजून धनिणीकडे दिल्या. लगेच ते दोघे माझ्याकडे आले. मी घाबरून दाव्या-वरच ओढण घेतली. धव्या माणसानें मला चुचकारून आपल्या कमरेला वेढलेली दोरी सोडली अन् माझ्या गळ्यांत अडकवली. धन्यानें लगेच दाव्याचं बिरडं सोडलं आणि माझ्या पाटीवर अखेरची थाप मारली. पण त्या हातांत मायेचा लवलेश नव्हता. नको असलेलं, भारभूत झालेलं, तो दाम मोजून घेऊन दूर सारीत होता. त्या नव्या आणि धव्या माणसानें जेव्हां माझ्या गळ्याची दोरी

खेचली तेव्हां मला कळलं कीं, माझा धनी बदलला. त्या अंगणांतून बाहेर पडतांना मीं त्या दोघांकडे एकदा वळून पाहिलं. पण त्यांच्या डोळ्यांत करुणा नव्हती कीं मुद्रेवर दुःख नव्हतं.

मीहि मग तक्रार न करतां माझ्या नव्या धन्याच्या मागून चालूं लागलें. मधेंच वाटेच्या कडेला एखाद्या जागीं हिरवळ दिसे अन् मला दोन जिभा मारायची लहर येई. तेवढ्यापुरती मी थबकत असें. तोहि मला तें खाऊं देई. एकहि काठी पाठीवर न घेतां मी त्याच्यामागून चाललें. सूर्य उगवतांना आम्ही निघालों होतों. प्रहर दिवस होण्याच्या आंतच घरीं पोहोंचलों. मला दारांत पाहून घरांतलीं पोरं पटापट उड्या मारून आंगणांत माझ्याजवळ आलीं. पण मला पाहून सगळ्यां-नींच नाकं मुरडलीं.

“ अगदींच मरतुकडं आहे वासरूं. ” एक चुणचुणीत परकरी पोरगी त्या मुलांत होती ती म्हणाली.

खरं होतं तिचं म्हणणं. माझ्या अंगावरची लव वाढली होती. पोट चोपलं होतं. बरगड्यांच्या फासळ्या मोजतां येत होत्या. चारी दोकल्या तिठून पडत होत्या. गळ्याखालच्या पोळीला मधोमध गोळा येऊन ती सुजली होती. माझा बाळपणींचा तांबूस, तुकतुकीत रंग धुरकटला होता. आणि हें सगळं उपासमारीमुळं झालं होतं. मीं म्हटलं, ‘ या पोरांना माझ्या व्यथा काय माहीत ! ’

पोरांनीं माझा उपहास केला, तरी मला मात्र त्या घरीं आल्याबद्दल खूप आनंद झाला. केवढं मोठं कौलांचं घर होतं तें ! अन् त्या घराला शोभेल असंच आंगण. त्यावर दाट मांडव घातलेला. पेळेच्या पलीकडे अबोली, तगरी अन् मोगरी. धडेच्या खालीं केळी वाढल्या होत्या. त्यांचीं हिरवींगार सोपं आंगणांत डोकावत होतीं. मीं मनांत ठरवून टाकलं कीं, जेव्हां माझ्या गळ्याचं दावं सुटेल, तेव्हां आधीं जाऊन त्यांतलं एखादं सोप ओढायचं.

त्या घरांत घरभर माणसं होतीं आणि तीं माझ्या जुन्या घरच्या माणसांपेक्षां अगदींच निराळीं होतीं. त्यांची भाषासुद्धा वेगळी होती. ‘ रांडग्या ’ ‘ उंडग्या ’ ‘ भैण्णाग्या ’ असल्या अभद्र गाळी नेहमीं माझ्या परिचयाच्या; पण इथल्या माणसांना त्या ठाऊक नाहींत असं दिसलं. या लोकांचे कपडेसुद्धा उजळ होते

अन् आंगभर होते. ताज्या कांडलेल्या भाताचा कणीदार कोंडा पातेल्यांत घालून घरमालकीण जेव्हां तो माझ्यापुढें ठेवण्यासाठीं आली, तेव्हां ती मला तुरभुरलेल्या बोंडावळ्याच्या वेलीसारखी वाटली.

माझ्या वांट्याला तो कोंडा नसून मांडा होता. मीं तो आधीं हुंगला अन् मग आडव्या जिभेनें चाटून पुसून खाल्ला. माझं खाणं संपतं तोंच मघांच्या त्या परकऱ्या मुलीनं पाण्याचं पातेलं भरून आणून माझ्यापुढं ठेवलं. तें पाणीसुद्धा साधं नव्हतं, तर त्याच्या बुडाशीं मूठभर मिठाचे खडे चमकत होते. तेंहि सगळं मीं अधाशीपणें ढोसलं. पोट कसं नगाऱ्यासारखं भरलं. किती तरी दिवसांच्या उपासाचं पारणं झालं. मला वाटलं कीं, इथें चंगळ होणार आपली.

लगेच माझ्या डोळ्यांत लकणी आली. मी उभी होतें ती दिम्या मोडून खालीं बसलें. मला तृप्तीची मरगळ आली होती. बसल्या बसल्या मी त्या घरच्या लहानथोर माणसांची ये-जा पाहूं लागलें. मला तीं देवाघरचीं माणसं वाटलीं. पडवीवर माझा धनी आणि त्याच्याच आंगठशाचा दुसरा एक पुरुष असे दोघे बोलत बसले होते. बायका आंत वावरत होत्या. त्यांचाहि शब्द ऐकूं येत होता. मुलं घरभर नाचत होतीं. तें पाहून मला माझ्या बाळपणची आठवण आली. मी माझ्या जुन्या घरीं काय कमी नाचलें होतें ! कान फडकावून अन् शेपटी उंचावून. चार चार माणसांनीं चहूं बाजूंनीं घेरावं तेव्हां कुठें माझ्या गळ्याला दावली लागावी.

मी बसल्या बसल्या विचार करूं लागलें. ' या घरांत गडबड आहे, वर्दळ आहे, पण आनंद नाहीं. इथलं कांहीं तरी महत्त्वाचं हरवलं आहे. कोणीतरी या घरांतून कायमचं गेलं आहे. हीं माणसं मनापासून हंसत नाहींत. वेळी अवेळीं एकदम गंभीर होतात. त्यांच्या चेहऱ्यावर सुतकीपणा दिसतो...'

होय, सुतकच होतं त्यांना. माझ्या धन्याचा बापच निवर्तला होता. कितीसा म्हातारा होता कोण जाणे ! स्वैंपाकघरांतील चूल विटाळली जाऊं नये, म्हणून त्यांनीं पडवीवरच तीन दगड मांडले होते अन् तिथेंच सांबारं-भात उकडून, हिरवी मिरची तोंडीं लावायला घेऊन तीं जेवायला बसलीं होतीं.

त्या परकऱ्या मुलीला घरांतलीं माणसं शांतू म्हणून हांका मारीत. माझ्या गळ्यावर आलेलं रोडमाणकं पाहून तिनं माझं नांव ' माणकी ' असं ठेवलं होतं.

मलाहि तें आवडलं होतं. मोठी चुणचुणीत मुलगी होती ती. ' काय ही मरतुकडी पाडी ' म्हणून प्रथम तिनें माझा उपहास केला, तरी ती मला आवडूं लागली होती. तिचा तो किंचित् टांचगा परकर, कोपरापर्यंत बाह्यांची तिची चौकटी चोळी, तिच्या गोऱ्या भालपट्टीवरची लाल टिकली, तिचे फिरून फिरून डोळ्यांवर येणारे पुढचे केस, डोळ्यांतली ती विजेची झळक, लांब बोटांचीं तीं पातळ नितळ पावलं, उत्तरं देतांना अन् काम करतांना दिसणारी तिच्या मानेची वेगवेगळ्या प्रकारची लचक, हें सगळं तिचं मला फार आवडलं. मला जर लहानपणापासून पोटभर खायला प्यायला मिळालं असतं, तर मी सुद्धा अशीच फुटाणी झालें असतें.

तिनेंच मला अंगणांतून काढून मागच्या गोठ्यांत नेऊन बांधलं. सुंदर, स्वच्छ अन् लांबच लांब असा गोठा होता तो ! मधोमध गवाण अन् दोन्ही बाजूंना उतरती जमीन. विरीच्या तुकड्यानें खरवडून काढल्यानें ती कशी लख्ख होती. पोटमाळ्यावर पेंढा कसा ठेचून भरला होता. प्रत्येक खुंटाला दावं होतं त्यावरून मीं ताडलं कीं, इथें गुरं बरींच असलीं पाहिजेत अन् त्यांना मायेनें, आस्थेनें वागवीत असले पाहिजेत.

नाहीं तर माझा तो जुना धनी ! शेणांत, खातांतच माझ्या आईला अन् मला बांधायचा तो. आमच्या अंगावर शेण वाळून खरपुड्या धरल्या तरी त्याला त्याचं काय ! पिळून पिळून दूध काढायचं अन् विकायचं एवढंच त्याला ठाऊक. माझ्या आईला दूध कांहीं कमी नव्हतं. पण माझ्या तोंडांत दोन धारासुद्धा तो पडूं देत नसे. माझ्या लाळेनं आईची कास ओली झाली, आईला पान्हा फुटला, कीं ओढ-लंच त्यानें मला बाजूला. वाटे कीं, दावं तोडून घ्यावं नि त्याच्या पाठींत दोन ढुसण्या ठेवून द्याव्या. त्याच मेल्यानें माझी अशी दशा केलीन्.

माझ्या नव्या धन्याचं तें गोधन सायंकाळीं सूर्यास्ताच्या सुमाराला तांबडी धूळ उभवीत घरीं आलं. आणि माझी कोण फजिती ! त्या गुरांना मी अपरिचित होतें, अनोळखी होतें. त्यांच्या नाकाला माझ्या अंगाचा वास कांहीं वेगळाच येत असावा. मी कुळवाड्याच्या घरून आलें होतें ना ! अन् त्यांतून ही अशी मरतमढं. लोंबत्या कासेची एक काळीबाळी गाय तरतराटानें प्रथम गोठ्यांत आली आणि तिनें आधीं मला हुंगलं. पण तेवढ्यावरच भागलें असतें तर ठीक.

तिनं अशी कांहीं 'करा' करून मजकडे पाहिलं कीं, माझ्या पोटांत आवळे शिजले. मी ओढण घेऊन त्या महामायेपासून जितकं दूर राहतां येईल तितकी राहिलें. तिचा हा आवेश कशासाठीं होता तर माझ्या पुढ्यांतलं गवत सफाचट करण्याकरितां. जशी कांहीं ती दुष्काळांतूनच आली होती !

पाठीमागनं आला एक कापसा पाडा. गायीनें लफाटून माझ्या पुढ्यांत उरल्या होत्या त्या चार काड्या त्यानें चघळल्या. अन् मेला जातांना उगीच मला एक शिंग खुपसून गेला. मात्र त्या गायीपुढून जातांना चार हात दुरून ! ती गाय होतीच तशी जहांबाज. पाठीमागून जोताचे दोन बैल आले तर ही त्यांना मुद्दाम घसटून गेली. मोठी खुनशी. पण तिलाहि जरब बसवणारं तिथें कोणीतरी होतं आणि तें म्हणजे शांतू. तिनें कोणाला छडी मारून तर कोणाला कानाला धरून जाग्यावर आणलं आणि सगळ्यांना दावीं लावलीं. त्या धावपळींत चेहरा लालसर झालेली अन् परकराचा काचा घातलेली ती शांतूची लवलवती धारिष्टमूर्ति मला सकाळपेक्षांहि अधिक मोहक वाटली.

सकाळ होतांच पुन्हां गुरांच्या कान्या निघाल्या आणि त्यांनीं आळस झाडीत रानाची वाट धरली. जाग्यावर राहिलें ती मी एकटी. मला कां नाहीं सोडलं त्यांच्याबरोबर, असं माझ्या मनांत आलं. त्या हिंडांत मिसळून मी नसतें चरायला गेलें ? माझे पाय नकोत का मोकळे व्हायला ? गोठा साफ करण्यासाठीं तिनें मला गोठ्याबाहेर काढलं. मीं तिला म्हटलं, 'अग, हो हो ! किती ओढतेस मला ? मी येतें कीं मुकाट्यानें. तुझा बाई झपाटाच मोठा.'

मी आंगणांत खांबाला बांधली गेल्यावर पुनः शांतूसंबंधीं विचार करूं लागलें. शांतू त्या घरांतली वीज होती. ती कामहि करी अन् बोलणींहि खाई. 'शर्थ झाली तुझ्यापुढें' हें तिच्या बाबतींतलं सगळ्यांचं पालुपद होतं.

काल ज्या पुरुषानें मला आणलं त्यानेंच आज त्याच वेळीं आणखी एक ढोर आणून माझ्याच खांबाला बांधलं. तो पाडा होता अन् माझ्यापेक्षां वयानं मोठा होता. त्याला आंगूळभर शिंगंहि उगवलीं होतीं. पण त्याची शेपटी माझ्यापेक्षां आंखूड होती अन् तिच्या झुपक्याचे बरेचसे केस गळले होते. त्याचा करडा रंग मला फार आवडला. विशेषतः त्याच्या कपाळावरचा तो पांढरा ठिपका पाहून तर मी हरखून गेलें.

माझ्यासारखा तो मरतुकडा नव्हता त्या अर्थी तो खानदान गोठ्यांतून आलेला असावा. त्याच्या वशिंडाच्या जागीं नुकताच फुगवटा धरला होता. आणखी वर्ष-भरानें त्याला चांगला आकार येऊन तें दुलूदुलू हालूं लागणार होतं आणि तो वारुळाची माती शिंगांनीं उकरूं लागणार होता.

काल माझ्यापुढं ठेवलं होतं तसंच आज त्याच्याहि पुढें एका पातेल्यांतून फराळाचं आलं. मऊ मऊ कोंडा अन् त्यांत केळफुलाचे चार तांबूस पखारे. माझा वांटा नव्हता त्या खाण्यांत. तें केवळ नव्या पाहुण्याचं आतिथ्य होतं. पण तो खाऊं लागतांच माझ्या जिभेला चळचळून पाणी सुटलं. राहवेचना मला. त्यानं तोंड बुडवलं न बुडवलं तोंच मींहि माझं मुस्कट खुपसलं त्यांत. त्यामुळें त्याच्या गालफडांला असा कांहीं दाब बसला कीं, त्यानं आंपलं तोंड लगेच बाहेर काढलं. मी आडव्या जिभेनें तें खाद्य संपवूं लागलें. त्या अधाशीपणांत त्यांतला कांहीं कोंडा माझ्या नाकपुड्यांतहि शिरला. पण मला त्याचं भान नव्हतं. तो पाडा पुनः एकदा तोंड खुपसण्याचा प्रयत्न करूं लागला. पण मी अशी एक ढुशी त्याच्या गळ्यावर ठेवून दिली, कीं बस्स !

इतरांच्या लक्षांत येण्यापूर्वी शांतूनें माझी ही अगाऊगिरी पाहिली. मोठी कावळ्याच्या नजरेची मुलगी ती. तरातरा येऊन तिनें माझा कान धरला अन् तोंड बाहेर ओढलं. एवढ्यावरच थांबली नाहीं ती. एक नाजुकशी चापटी माझ्या सोंडीवर वाजवून तिनें मला मांडवाच्या दुसऱ्या मेढीला नेऊन बांधलं.

अन् मग ते नवे राजेश्री सावकाशपणें चरूं लागले. मीं मनांत म्हटलं, ‘मैंदच आहे मेला. मला दूर करून कांहीं खातां आलं नाहीं याला. अन् हा म्हणे पाडा...’ त्यानें रिकामं केलेलं पातेलं शांतूनें ओढून नेल्यावर पुन्हां मला त्याच्याच मेढीला बांधण्यांत आलं. मी जरा रागांतच होतें. त्याच्याकडे डाव्या डोळ्यानें पहावं असंसुद्धा मला वाटलं नाहीं. तोंड फिरवूनच मी उभी राहिलें.

माझं खरं लक्ष होतं घरांतल्या हालचालींवर. सकाळीं थोडंसं गवत माझ्यापुढं टाकलं होतं तेवढ्यावर माझी भूक भागली नव्हती. त्या मऊ गोड कोंड्याचा स्वाद माझ्या जिभेवर राहिला होता. मी माझ्यासाठीं त्या वस्तूची वाट पहात होतें.

एवढ्यांत त्या पाड्याला काय लहर आली कोण जाणे ! त्यानें आपली मुसंडी उचलली अन् जीभ बाहेर काढून मला चाटायला प्रारंभ केला. त्याच्या त्या खरखरीत जिभेचा पट्टा माझ्या गळ्यावर ओढला जातांच मी एकदम दचकलें.

" हा रांडेच्या ! चाटायला का लागलाम मला ? तुझी माझी कांहीं ओळख ! कांहीं परिचय ! चावटच दिसतोस. मी काय एवढी सवंग वाटलें तुला... !"

एकाच मुसंडीनें मीं त्याला उडवून दिलं. मग बसला खेटर मारल्यागत तोंड करून. पुनः माझ्या वाटेला गेला नाहीं. खरं म्हणजे मला तो ताकदीनें भारी होता. पण त्या हतभाग्यामध्यें आत्मविश्वासच नव्हता. त्यानें जरा तेज दाखवलं असतं तर मी खालच्या मानेनें चूप बसलें असतें. तसा तो दिसायला कांहीं वाईट नव्हता. त्याची कातडी तुकतुकीत होती. तो निढळावरचा पांढरा ठिपका तर छानच दिसत होता. त्याच्या शेपटीच्या गोंड्याचे केस विरळ झाले होते, एवढा दोष वगळला तर तो सर्वांगीं देखणा होता. पण थोडासुद्धा धट्टपणा नाहीं, मुसंडी मारण्याची प्रवृत्ति नाहीं, मग तें नुसतं देखणेपण काय चाटायचं आहे ! ' तेथें पाहिजे जातीचे ' हेंच खरं !

तो दिवस आणि ती रात्र त्यानें माझ्या संगतींत मुकाट्यानें घालवली. तो मला दचकून होता अन् मी त्याची कींव करीत होतें. दुसऱ्या दिवशीं त्या घराचा देखावा एकदम पालटला. पहाटेपासूनच घरांतलीं सगळीं माणसं उठून खडबड करूं लागलीं. सूर्योदय होतांच खोपींतल्या न्हाणीच्या चुलींत विस्तव पडला. एकेकाचीं स्नानं उरकूं लागलीं. शांतूनें गोठ्यांतलीं गुरं सोडून बाहेर घालविलीं, मला अन् त्या पाड्याला आंगणांत आणून बांधलं अन् ती अंग धुवायला गेली. शांतूच्या आईनें पाठोपाठ शेणगोठा केला, शेणाची पाटी डोक्यावर घेऊन पाटाखालच्या गायरींत धप्पदिशीं ओतली अन् तीहि न्हाऊन मोकळी झाली.

थोड्याच वेळांत आंगणांतल्या मांडवाखालीं ब्राह्मण जमूं लागले. कोणी वरच्या वाटेनें खालीं उतरले तर कोणी कुळागरांतून वर उमटले. पहिल्या प्रथम आला तो अगदीं जख्ख म्हातारा होता. जणुं ' म्हातारा बैल गुणवंता. ' तोंडाचं बोळकं झालं होतं तरी तो पानतंबाखू चघळीतच आला. मी एक धकांडी देईन तर हा धडेखालीं कोसळून राम म्हणेल असं मला वाटलं. त्याच्यामागून आणखीहि

बरेच ब्राह्मण आले. कोणी गंध लावलेले तर कोणी भस्म फासलेले. कोणी उघड्या अंगाचे तर कोणी पैरण घालून वर धारोचं उपरणं पांघुरलेले.

'भित्री भागूबाई' म्हणून मी त्या पाड्याला हसत होतें; पण हा सगळा धवा रंग आंगणांत जमा झालेला पाहून माझंहि काळीज गलबलूं लागलं. अजून मी धव्या रंगाला बुजत होतें. जो येई तो आम्हां दोघांपुढें उभा राहून आम्हांला न्याहाळी. प्रत्येक वेळीं माझी ओढाताण व्हायची. तो पाडा मात्र मुळींच हालला नाहीं. तो संथपणें गवत खात राहिला होता. त्याच्या देखत माझी फजिती होत होती, हें मला असह्य झालं. ज्याला त्याला माझ्या पाठीवर थाप मारायची भारी हौस. मीं म्हटलं, 'कशाला मला छळतां? आपलं काम करा कीं.'

थोड्याच. वेळांत ते ब्राह्मण कामाला लागले. कोणीं तांबडी माती चौरस पसरून स्थंडिल तयार केलं. कोणीं दर्भ कापले. कोणीं समिधांची जुडी बांधली. कोणीं स्थंडिलाच्या बाजूला द्रोण मांडले. कोणीं समई लावून आणली. कोणीं ढलप्या नि गोवऱ्या स्थंडिलापाशीं आणून आदळल्या. तो म्हातारा भटजी अस्पष्ट वर्णोच्चारांनीं जें आणि जसं सांगत होता, तें अन् तसं बाकीचे भटजी करीत होते. सगळी सामुग्री जमल्यावर त्यानें एका तरण्या भटजीला म्हटलं.

"तें ब्रह्मकर्माचं पुस्तक सोड. त्यांतलं 'वृषोत्सर्ग' हें प्रकरण काढ. वृषोत्सर्गांत पाडा सोडायचा असतो. केवळ पाडाच नव्हे हं. बरोबर पाडीसुद्धा. कशासाठीं, तर पितरांना सद्‌गति मिळावी म्हणून. कळलं? तूं सगळा प्रयोग चालव. मला खरस लागते, खोकला येतो. चुकेल तिथें मी सांगेन."

तो तरणा भटजी लगेच पुढें झाला. त्यानें शांतूच्या वडिलांना हाक मारून पाटावर बसवलं. त्यांच्याकडून संकल्प सोडवला. मग होमहवन झालं. त्यानंतर भटजीनें यजमानाला आमच्यापुढें बोलावलं. त्यानें आमच्या खुरांवर पाणी घातलं. पाड्याला गंध लावलं. माझ्या कपाळीं कुंकवाचं बोट ओढलं. त्याच्या पाठीवर पंचाची घडी उलगडून टाकली. माझ्या पाठीवर खण घातला. दोघांच्या गळ्यांत माळा बांधल्या. ते सगळे भटजी मग आमच्याभोंवतीं गोळा झाले. मोठमोठ्यांदा हेल काढून मंत्र म्हणूं लागले. मधून मधून आम्हां दोघांवर तांबड्या अक्षता फेकूं लागले. घरांतलीं सगळीं माणसं पहायला गोळा झालीं. शांतू तर सगळ्यांच्या पुढें. तिच्या टपोऱ्या डोळ्यांत कसले तरी नकळते भाव तरंगत होते.

मीं ताडलं कीं हे भस्म फासलेले भटजी माझं लग्न लावीत आहेत. अन् तें कोणाशीं, तर शेपटीच्या गोंड्याचे केस झडलेल्या, अंगांत कसलंच पाणी नसलेल्या अन् पाठीवर टाकलेला पंचा चघळण्याचा अर्बुजपणा करणाऱ्या त्या पाड्याशीं. मीं मनांत म्हटलं, 'या मैंदाशीं माझं लग्न ! हुंः ! विनोदच आहे. येऊं दे तर खरा नवरा म्हणून माझ्यापाशीं लगट करायला; पोटकुळांत तोंड खुपसून नाहीं आडवा घातला तर माझं नांव दुसरं.'

माझे हे विचार किती तापले असते कोण जाणे ! पण एकाएकीं ते शमले. आणि त्याचं कारण म्हणजे पुढे आलेला फराळ. शांतूनें एक सूप आणून आमच्या-पुढें ठेवलं. त्यांत कोंडा नव्हता; तर सगळं भातच होतं. भात म्हणजे आमची मेजवानीच. आम्हां दोघांना मिळून एकाच पात्रांत हें भोजन वाढलं होतं. पण मी काय त्या खतरुडाला दाद देतें ! कांठाशीं तोंड घालून मी तें सूप एकदम माझ्या बाजूला ओढलं अन् सपाटा लावला. माझे नवरोजी पुढें पाऊल टाकायला धजलेच नाहींत. अन् आले असते तरी एक कण मीं त्याच्या जिभेला लागूं दिला नसता. 'कोल्ह्याला द्राक्षं आंबट' म्हणतात, तसा तो आपला खालच्या मानेनें पुढ्यांतलं पायदळीं तुडवलेलं गवत कुरतडीत राहिला.

मला भीति वाटत होती ती शांतूची. म्हटलं ती 'चूड' येऊन माझ्या पुढ्यांतला घांस काढून घेते कीं काय ! पण या वेळीं माझा हा आगाऊपणा पाहू-नहि तिनं कांहीं हालचाल केली नाहीं. 'काय पाडी चावट आहे !' एवढंच म्हणून ती नुसती हसली. तिच्या पोटीं माझं कौतुक मावत नव्हतं.

पण तो गोड घांस अंगीं लागायचा दिवस नव्हता तो. खाणं आटपून जीभ आडवी फिरवीत मीं मान वर केली मात्र; एक नवंच अरिष्ट माझ्या रोखानें पुढें येत होतं. होमांत तापवून लाल लाल केलेला एक लहानसा त्रिशूळ हातांत धरून एक भटजी यमासारखा आमच्याकडे येत होता. मी टक लावून वाघरं पडल्यागत नुसती बघतच राहिलें. तो जवळ येतांच 'हम्मॉऽऽ !' असा आक्रोश अभावितपणें माझ्या तोंडून फुटला. त्या वेळीं मीं जी ओढण घेतली ती जिवाच्या आकांताची. पुढें दोन दिवस माझ्या मानेवर दाव्याचा तो करकोचा राहिला होता. पण—

मी उगीच ओरडलें होतें. माझी भीति वृथा होती.

तो भटजी माझ्या वाटेला आलाच नाहीं मुळीं. तो सरळ त्या पाड्यापुढें उभा

राहिला. एका भटजीनें त्याचा गळा धरला. दुसऱ्यानें दुसऱ्या बाजूनें त्याच्या पोटकुळाला दोन्ही हातांचा दाब दिला. आणि काय घडतंय तें पुरतं कळण्यापूर्वीच पहिल्या भटजीनें तो जळता त्रिशूळ त्या पाड्याच्या उजव्या जांघेवर टेकला. 'चर्र्र्' असा सूक्ष्म आवाज झाला. शांतू अन् इतर बायका बघायला उभ्या होत्या, त्यांनीं 'स्ऽऽ' असा सीत्कार केला. पाड्याची तेवढ्या जागेवरची लव जळल्याची घाण आली. एक काळा डाग कातडीवर स्पष्ट उमटला. त्यानें जागच्या जागीं उडी मारली. दुसऱ्याच क्षणाला त्याच्या पोटाखालची जमीन भिजली. त्याच्या डोळ्यांत ओली कणव जमा झाली. डागलेला पाय एकदोनदा त्यानें झाडला. मला त्याची दया आली. कां कोण जाणे; पण तो माझ्याजवळ सरकला अन् त्यानें आपलं मुस्कट माझ्या मानेखालीं घातलं. मग मात्र रागावलें मी. झटकन् त्याच्यापासून दूर होतांना मीं त्याला म्हटलं.

"माझा नवरा व्हायला आला होतास नाहीं का? घे मग. तुला मेल्या हेंच फावे!"

एवढं हें जळकं कृत्य उरकल्यावर भटजींनीं शांतूच्या बाबाला आमच्यापुढें हात जोडून उभं केलं. कांहीं मंत्र त्याला म्हणायला लावून आम्हां दोघांचीं बिरडीं मोकळीं करायला सांगितलं. त्यानं तसं करतांच तो म्हातारा भटजी पुढें येऊन अस्पष्टशा शब्दांत आम्हांला उद्देशून मंत्र बोलला.

"जलं पिब, तृणं भक्ष, यथासुखं क्रीडस्व!"

मी कशाला त्याची ती बडबड ऐकायला थांबतें! माझा कालपासून डोळा होता त्या धडेखालच्या केळीवर. तिचं अंगणांत वांकून आलेलं हिरवंगार सोप माझ्या डोळ्यांत खुपत होतं. तो ओला घांस जेव्हां मान उंचावून नि जीभ लांब करून मीं ओढला, तेव्हां त्याचा दांडा मुळांतूनच मोडला. मीं म्हटलं 'बरं झालं.' पण शांतू म्हणाली. 'हा चोंवटे!' आणि तिनें मला 'हैक् हैक्' करून हाकललं. मी बाणासारखी पाटापर्यंत गेलें अन् पाय न भिजवतां पलीकडे कुळागरांत उडी टाकली.

सहज म्हणून मागें वळून पहातें तों शांतू त्या पाड्यालाहि माझ्यामागून ढकलीत होती. पण तो आळशी लोंढरा तिथून हालायलाच तयार नव्हता. जेवढं ढकलावं तेवढंच एक पाऊल तो पुढें टाकी अन् पुन्हां स्तब्ध. त्याला मोकळं चरायला नको होतं का? कदाचित् त्याचा तो तसमुद्रेचा डाग चुरचुरत असेल अन्

त्याला कांहीं सुचतच नसेल. पण शांतू कसचो त्याला ऐकते ! तिनें त्याला ढकलीत ढकलीत, पाटाच्या खालीं घातलं अन् ती हात धुऊन वर चालती झाली.

नवरा म्हणून नसला तरी सोबत म्हणून त्यानें माझ्याबरोबर यायला माझी हरकत नव्हती. तसा तो आलाहि. मी इथला एक घास, तिथला एक घास ओरबाडीत चाललें होतें. कुठें चाललें होतें कोण जाणे ! कारण मला तें गांव, ती दिशा अगदीं नवीन होती. माझ्यासारखाच तोहि नवखा होता. शिवाय त्याला पुढाकार घेण्याचं मुळींच धाडस नव्हतं. तो आपला माझी शेपटी धरून मागून मागून येई. आम्ही चरत चरत खालीं वहाळापर्यंत गेलों. तिथें होतं सोलींचं रान. तिथल्या दलदलींत पाय लागले रुतायला. म्हणून माघारीं फिरलों. उजव्या अंगाला वायंगण दिसलं. कोवळं लुसलुशीत अन् हिरवं हिरवंगार. चार आडव्या घासांत पोट भरून निघावं. पण केवढा मेढेकोट होता त्याच्याभोंवतीं ! जवळ असून तें दूर होतं, दुर्लभ होतं.

तिथून मग आम्ही परत फिरलों. पाटाचं पाणी गढूळ करीत खालीं गेलों. तिथें एक घर दिसलं, घरापुढं आंगण दिसलं अन् अंगणाच्या पेळेकडे दोन ठेंगण्या केळी दिसल्या. अंगणांत दोघे तिघे बाप्ये बसले होते. म्हटलं आम्हांला काय करतील ! पण दुर्दैव आमचं....आमचं म्हणण्यापेक्षां त्या पाड्याचं. त्यांतला एक मिशाळ बाप्या उठला अन् हळूच मागून येऊन त्यानें त्या पाड्याची मानगूट पकडली. ते होते ठाकर. त्यांना या गावांतल्या वृषोत्सर्गाचा वास लागला होता अन् ते फुकटांतला पाडा धरून नेण्यासाठीं आले होते. त्यांचं काम साधलं होतं. ते त्याला आतां पावसाळ्यांत जोताला राबवणार होते अन् हिंवाळ्यांत नंदीबैल शृंगारून गांवोगांव हिंडवणार होते.

ते माझ्या वाटेला मात्र मुळींच गेले नाहींत. पण नुसत्या कल्पनेंतल्या भयानेंच मी तिथून पळालें. मीं दूर उभी राहून पाहिलें. त्या बिचाऱ्यानें जरासुद्धा मस्ती केली नाहीं. तो निमूटपणें त्यांच्या मागून जाऊं लागला. मला वाईट वाटलं. जरा दूर कुठें चरायला जायचं, तर तेवढींच एकास दोघं झालों असतों. नशीब त्याचं !

एक निसासा टाकून मी तिथून चालूं लागलें. कारण अजून आजच्या दिवसाची भूक निवायची होती. पोटाच्या दोन्ही पाखली अजून चोपलेल्याच होत्या. दुपारच्या वेळीं एखाद्या वृक्षाच्या छायेंत रवंथ करीत विश्रांति घ्यायला अजून बरेच घास

पोटांत जायला हवे होते. माझ्या समोर हिरवं कुळागर अथांग पसरलं होतं. मागदांड्यावर गवतहि वाढलेलं होतं. मला वाटलं कीं, हें आतां सगळं माझ्याच मालकीचं. मी प्रथम जरा बाजूबाजूनें हिंडलें अन् मग कुंपणांत एका ठिकाणीं डोकं खुपसून, शरिराचा संकोच करून, एका कुळागरांत प्रवेश मिळविला.

पण माझा तो भ्रम होता. त्या हिरव्या कुळागरांतल्या एका पातीवरसुद्धा माझी सत्ता नव्हती. ज्या कुळागरांत मी उतरलें होतें, त्याचा मालक पाठोपाठ तिथें आला आणि पुरता एक घास चघळायच्या आंतच त्यानें एक शिवी हासडून पोफळाएवढा एक दगड माझ्यावर भिरकावला. माझ्या पाठीवर तेवढीच त्याची खूण उमटली. मला तिथून पळणंच भाग पडलं. दिवसभर मी इकडे तिकडे गांवभर हिंडलें. आणि संध्याकाळीं वामन्या जोशाच्या आंगणांत पुनश्च रुजू झालें.

वामन्या जोशी सकाळींच माझा संबंध तोडून मोकळा झाला होता. पण मला काय त्याचं ! मीं आपली तेंच माझं घर म्हणून तिथें गेलें. पण एकटी शांतू सोडली तर सगळयांनींच मला 'हडत् हुडुत्' केलं. इतर सगळया गुरांना वामन्या जोशानें बांधलं अन् त्यांच्यापुढें पेंढा टाकला; पण मला मात्र गोठ्यांत जाऊं दिलं नाहीं. 'मी हिला गोठ्यापुढच्या मोकळ्या जागेंत वईच्या खुंटाला बांधतें' असं शांतू म्हणाली; पण सगळ्यांनीं तिला वेड्यांत काढलं.

मी लोचटासारखी अंगणांत बसूनच ती रात्र घालविली आणि सकाळीं उठून उदरंभरणासाठीं चालती झालें. हाच क्रम मीं नेहमीं चालू ठेवला. चोरूनमारून का होईना; पण थोडंबहुत ओलं अन्न माझ्या पोटांत पडे. वरच्या रानांत गेलें कीं काजूच्या चार रसदार मुट्यांनीं माझी तहानभूक शमे. चार वेलीहि तिथेंच तोंडीं लावायला मिळत. कसं तरी भागे.

त्यामुळें एका महिन्यांत माझी कळा पालटली. लव आखूड होऊन अंगाबरोबर बसली. माझा मूळचा तांबूस रंग पुन्हां तिकतिकूं लागला. ठाणमाण चांगलं जमलं. गळ्याखालचं रोडमाणकं जिरून पोळी चांगली लवथवूं लागली. सर्वांगांत वीज सळसळूं लागली. इतके दिवस मी सगळ्यांना भीत असें; पण आतां गांवांतलीं पोरंबाळं मलाच भिऊं लागलीं. एकदोघांना मीं उचलून पाडलंसुद्धा. हो, त्यांनीं उगाच कां माझ्या वाटेला जावं !

माझ्या या दिशीं दिशीं चढत जाणाऱ्या यौवनाच्या कळा शांतू मायाळू

नजरेनें पहात होती. माझ्यावरतीं तिची माया अथांग होऊं लागली होती. मला तरी शांतूवांचून दुसरं कोण होतं तिथें! आमच्या दोघींच्या दृष्टिभेटींतून कसली तरी गूढ संवेदना पाझरत होती. मला संध्याकाळीं घरीं यायला उशीर झाला कीं शांतू अस्वस्थपणें माझी वाट पहात उभी राही. मला राग भरे. मी तिच्या तोंडाशीं तोंड नेलं कीं मग तिचा राग निवे. ती मग माझ्या गळ्यांत गळा घाली. मला कुरवाळी. माझ्याशीं लडिवाळपणें बोले. तिनं माझ्या पाठीवर थाप मारली कीं मी कृतज्ञतेनें तिथल्या तिथें भोंवरा करीं. शांतूकडे माझा अवखळपणा जिरे. मी तिचा चोळीच्या किनारीखालचा गोरा दंड चाटूं लागलें, कीं माझ्या जिभेचा खरखरीतपणा सोसत नसूनहि ती थोडा वेळ स्तब्ध राही. मग दंड बाजूला घेतांना माझ्या मुसंडी-वर एक नाजूक चापट मारून ती मला म्हणे. ‘लाडांत नको येऊं अशी...’

मी आतां चौर्यकर्मांत चांगलीच तरबेज झालें होतें. कुंपणांत मुसंडी खुपसून तें तटातटा मोडणें आणि कुठूनहि शेतांत घुसणें हा आतां माझ्या पायाचा मळ झाला होता. पोटरीस आलेल्या भाताच्या रोपांवर मी आडव्या जिभेनें ताव मारीत असें. कोणी पकडायला आला कीं, शेपटी ताठ करून सूंऽबाल्या. येतांना एका ठिकाणीं कुंपण मोडायचें तर जातांना दुसऱ्या ठिकाणीं. मी एखाद्याच्या परसांतहि याच पद्धतीनें शिरें आणि तिथलीं वांग्या–मिरच्यांचीं रोपें अन् अळसुंद्याचे वेल सफाचट करीं. एखाद्या गोठ्यांत रिगें आणि तिथल्या तान्ह्या गाईला ढुशी देऊन तिच्या पुढ्यांतलं आंबोणाचं पातेलं रिकामं करीं. मला पकडायची कोणाची प्राज्ञा नव्हतीच. माझ्यावर वर्षाव व्हायचा तो शिव्यांचा अन् दगडांचा. पाठीवर नि पोटावर दसकांनीं टेंगळं.

तशा स्थितींत घरीं आलें कीं शांतू घरच्या माणसांना चोरून तेलाच्या उरळींत बोटं बुचकळी आणि माझ्या जखमांवर नि टेंगळांवर तेलाचे ठिपके सोडी. अशा वेळीं तिचं पालुपद ठरलेलं होतं. ‘धर्माची पाडी अन् कसे मेल्यांचे हात धजतात तिला मारायला कोण जाणे! दुष्ट मेले!’

लोकांच्या दृष्टीनें मीं गांवांत उच्छाद मांडला होता. सगळा गांव माझा वैरी बनला होता. शेजारीपाजारी रोज येऊन वामन्या जोशाकडे तक्रारी करीत. त्याच्यावर रागावत, संतापत. रोज त्या गांवांत निराळ्या अर्थानें त्याच्या पितरांचा उद्धार होत होता. त्याला तें सगळं असह्य होत होतं. तो मला धरायचा

प्रयत्न करीत होता अन् माझ्या मागून पळून पळून दमला कीं मला गाळी घालीत होता. 'हिला वाघ तरी कां खात नाहीं देव जाणे!' म्हणून वैतागत होता. एकदा तो असाच रागांत असतां शांतू माझी कड घेऊन कांहींतरी बोलली, म्हणून त्यानें तिलाच बडवून काढली. शांतू रडली, भेकली आणि एकांतीं माझ्या गळ्यांत गळा घालून कळवळ्यानें मला म्हणाली.

"पाहिलंस माणके! तुझ्यामुळें मला मार बसला. तूं असे वाईट गुण कां ग करतेस? मी अशानं तुझ्याशीं बोलायचीच नाहीं."

मला तेवढ्यापुरतं वाईट वाटे. मी माझे कणकभरी डोळे तिच्यावर स्थिर करून तिला जणुं आश्वासन देत असें. 'नाहीं ग शांतू! तुला दुःख होईल असं मी कांहीं करणार नाहीं.' पण सकाळ झाली, पोट रिकामं झालं, कीं सगळं बाजूला राही. जिथें हिरवं दिसेल तिथें जीव अनावरपणें उडी घेई. पोट भरेपर्यंत घराची, शांतूची, कुण्णाकुण्णाची मला आठवण होत नसे.

एक दिवस दुपारीं तिसऱ्या प्रहरींच मी घरीं आलें. मला पहातांच वामन्या जोशी शांतूला म्हणाला.

"शांतू, शांतू, पाडीला बांधून घाल. गवाणीचं दावं सोडून घे. पळ लवकर."

शांतूनें उल्हसित होऊन विचारलं.

"माणकीला बांधायची? तिला बाळगायची आपण? किती चांगलं होईल दादा. पुढल्या वर्षी ती गाभण राहील. सुंदर पाडा होईल तिला..."

"तूं आधीं सांगितलेलं काम कर."

शांतू लगेच दावं घेऊन पुढं आली. 'माणके, ये!' म्हणून तिनें मला बोलावलं. मी शांतूला वश होतेंच. लगेच मीं दाव्यांत मान अडकवली. तिनें मला नेऊन गोठ्यांत बांधली. माळ्यावरचा पेंढा बापाला न विचारतां उपसून माझ्यापुढें टाकला. वामन्या जोशाचे डोळे लुकलुकले.

तो उठला अन् पंचा खांद्यावर टाकून खालीं चालता झाला. थोड्याच वेळांत त्यानें गांवांतले चार लोक गोळा करून घरीं आणले. सगळ्यांनीं माझ्यावर नजरा रोखल्या. गोठ्यांत मी आणि अंगणांत शांतू अचंबित झालों. 'हा काय प्रकार आहे? कशाला हे लोक जमवले वामन्या जोशानं?' शांतूला रहावेना

म्हणून तिनें विचारलं. "दादा, कशाला तुम्ही या लोकांना आणलंत ?' वामन्यानें तिला उत्तर दिलं. 'तुझ्या माणकीला वाघाच्या धाडीवर घालायला.'

वामन्या जोशी पुढें अन् ते सगळे त्याच्या मागून गोठ्यांत आले. 'गणप्या, दावं सोड अन् घट्ट हातांत धर.' एका गोटीबंद तरुणाला त्यानें फर्मावलं. कांहीं तरी माझ्यावर अरिष्ट होतं खास. त्याला तोंड देणं भाग होतं मला. माझे डोळे तांबारले. गणप्या माझं दावं सोडायला वांकला तेव्हां मीं त्याला एक चांगली ढुशी ठेवून दिली. तो चार हात मागें उडाला. त्या रागाच्या सपाट्यांत त्यानें तिथलाच चिव्याचा दांडा उचलून माझ्या पाठींत हाणला. एक हात लांबीचा वळ माझ्या पाठीवर उठला. मी एकदम वांकलें; पण पुन्हां ताठ उभी झालें.

आतां ते चौघे मिळून माझ्या अंगावर आले. गणप्यानें माझे दोन्ही कान घट्ट पकडले. दोघे दोन बाजूला दांडे उगारून उभे झाले. शिरप्यानें माझं दावं सोडलं. मी तिथल्या तिथें उड्डूं लागलें. लाथा झाडूं लागलें. पण चौघांच्या बळापुढें माझं कांहीं चालेना. त्यांनीं थोड्याच वेळांत मला नरम आणलं.

शांतू अंगणांतून ओरडत होती. "अरे, कुठं नेतां तिला?... काय चालवलंय् तुम्हीं ? ...ती गायत्री आहे ना ? अन् पुनः देवाची... धर्माची ! दादा... गणपाकाका...... शिरपाकाका ! सोडा रे तिला !"

ती रडवेली झाली होती. माणकीला आपण दावं लावलं म्हणूनच हा प्रसंग ओढवला, असं तिला वाटलं असावं. पण तिच्या अवस्थेकडे कोणाचं लक्ष नव्हतं. त्यांच्या दृष्टीनें शांतू वेडी होती. नको तिथें दया दाखवीत होती. ते मात्र सगळे दयेला घरीं ठेवून आले होते. दोघेजण पुढें होऊन मला ओढूं लागले. दोघे मागें राहून दांड्यानें ढकलूं लागले.

पण मला तें गांव, तें घर, सोडायचं नव्हतं. दुसरीकडे कुठं जायचं नव्हतं. मीं मटकन् बसकल घेतली. ते दांड्यानें ढोसूं लागले, तरी उठलें नाहीं. पण शिरप्यानें माझी शेपटीच पिरगळल्यावर काय करूं ! खाड्दिशीं उठलें. म्हटलं, वाटेल तें झालं तरी पाऊल उचलायचं नाहीं. पण दोघांनीं काळाच्या हातांनीं ओढल्यावर गळ्याला ओढ बसली. पाऊल उचलणंच भाग पडलं.

मग मात्र मी चालू झालें. पुढच्या दुर्दैवाला सामोरी झालें. पण एवढ्यानें संपलं नव्हतं. वामन्या जोशानें आपल्या डोक्याचा पंचा सोडला आणि माझ्या

डोळ्यांवर बांधला. मला आंधळी करून ते नेणार होते. दूर कुठल्या तरी रानांत नेऊन सोडणार होते. उघड्या डोळ्यांनीं नेलं तर नेलेल्याच वाटेनें मी परत येईन, अशी त्यांना धास्ती होती. जिथें सोडायचं तिथें गेल्यावर मग ते माझे डोळे सोडणार होते आणि माझी दिशाभूल करणार होते.

मी आंधळी झालें. त्या स्थितींतच ते लोक ओढतील त्या दिशेला जाऊं लागलें. शांतू आंगणांत रडत, आक्रोशत होती तें मी ऐकत होतें; पण मला तिची मूर्ति पहातां येत नव्हती. हें माझं दुःख त्या ओढाताणीपेक्षांहि बोचरं होतं. शांतूला वाटलं कीं, आपली माणकी आतां आपल्याला अंतरली. ती पुन्हां कधींच आपल्या दृष्टीस पडणार नाहीं. तिच्या मनांत कांहीं तरी आलं. ती त्या लोकांना कळवळून म्हणाली.

"गणपाकाका! दोन मिनिटं थांब. फक्त दोनच मिनिटं." आणि एकदम तिचा शब्द थांबला. तिचीं धावतीं पावलं मीं ऐकलीं. ती लगेच परत आल्याचंहि मला कळलं. पाठोपाठ शब्दहि ऐकूं आले.

"दादा, पसाभर भात आणलं आहे मीं सुपांत. तेवढं माणकीला खाऊं दे. मग न्या तिला. जातांनाचा एक घांस......या घरचा शेवटचा घांस..."

"सगळ्या गावाचं शेत लंपासून आधींच माजली आहे ती अन् वर तूं भात खायला घाल तिला. मोठी आली आहे खाणारी—" असं म्हणून गणपानें एक काठी माझ्या पाठीवर ओढली.

पाठीमागून काय झालं तें मला माहीत नाहीं. शांतू किती रडली असेल, काय काय बोलली असेल त्याची कल्पना नाहीं. मी एकेका पावलानें तिथून दूर दूर होत गेलें. पाठीमागचं जग मला शून्य झालं. त्या वेळीं मला वाटलं तें एवढंच. 'याच माणसांनीं कांहीं महिन्यांमागें होमहवन करून मला चारा खा, पाणी पी, मन मानेल तशी वाग' म्हणून जाहीरपणें सांगितलं होतं. पण तेच लोक आपण काय बोल्लों तें विसरून मला गांवाबाहेर ओढून घालीत होते. माणसाचे खायचे दांत नि दाखवायचे दांत वेगवेगळे असतात असंच म्हटलं पाहिजे. यांचा शब्द खोटा, धर्म खोटा, सगळं कांहीं खोटं. फक्त दंभ तेवढा खरा! आमच्यासारख्या मोनजातीनें माणसावर कधींच विश्वास ठेवूं नये!

★ ★ ★

# वैशाखवणवा

तिसऱ्या प्रहराची वेळ आहे. माघ मासाचे दिवस आहेत. मी खिडकीजवळ घोंगडी आंथरून पडलें आहें. निळ्या स्वच्छ आकाशाचा तुकडा जेवढा मला इथून दिसतो, त्याकडे डोळे लावले आहेत. बाहेर पानगळ चालू आहे. त्यांतलीं कांहीं पिवळीं अर्धशुष्क पानं माझ्या खिडकीशीं आणून वारा त्यांना खेळवीत आहे. कंटाळला कीं एकाच थपडेनें त्यांना भलतीकडेच कुठें तरी फेंकून देत आहे. भाऊ, मी पडल्या पडल्या विचार करीत आहें.

माझ्याहि दुर्दैवाच्या वाऱ्यानें मला कांहीं काळ खेळवलं अन् शेवटीं इथे आणून फेंकून दिलं. अवघा एका वर्षाचा कारभार. कालचक्राचा एकच फेरा. गेल्या माघांत मी तुमच्या उबेंतून बाहेर पडलें. माहेरचं खेडं सोडून शहरवजा एका गांवांत एका दुकानदाराची सून म्हणून नांदायला आलें. चार नग अंगावर घालून मिरवूं लागलें. नव्या जीवनांतल्या नव्या सुखांची पहांट पाहूं लागलें.

आजहि माघच चालू आहे. पण आज मी कुठें येऊन पडलें आहें अन् कशा अवस्थेंत ! भाऊ, तुमच्या कानांवर गेली आहे का ही गोष्ट ? बहुधा नसेलच. तुम्हीं कानांवर पट्ट्या बांधल्या आहेत. डोळ्यांवर झांपड ओढलं आहे. पोरीचा कसलाच विचार करायचा नाहीं, असं तुम्हीं ठरवलं आहे. सासरीं येऊन मुलीला दर्शनहि न देतां निघून जाणाऱ्या बापाबद्दल दुसरं मी काय म्हणूं ! इतकी आलिप्तता तुम्हीं कुठून पैदा केलीत भाऊ ! सगळ्याच बापांची मनोवृत्ति अशीच असेल का ? ' मुलगी दिली ; मोकळा झालों. आतां ती अन् तिचं नशीब ! '

पोथ्या-पुराणांतसुद्धा हेंच वाचायला मिळतं. शकुंतलेला सासरीं पाठवल्यावर पुढे तिचं बरंवाईट काय झालं, याची कण्वानें एका शब्दानेंसुद्धा कधीं वास्तपुस्त केली नाहीं. सीतेला वनांत टाकलं, हें काय जनकाला समजलं नसेल ? कोणाचा कोण नव्हे तो वाल्मीकि तिचा धर्माचा बाप झाला ; पण जनकानें त्या पहिलटकरणीची नुसती दृष्टिभेटसुद्धा घेतली नाहीं. भाऊ, तुम्हीसुद्धा त्याच जातीचे झालांत का हो ?

मी वाल्मीकीवांचूनच वनांत पडलें आहें. होय, वनांतच. अगदीं रानवट गांव. वस्ती बेताचीच. घरांत एकटी एक म्हातारी सासऱ्याची आत्या. तीहि जगाल

नि जन्माला विटलेली. माझ्या रूपानें आपल्या उरावर एक धोंड येऊन पडली आहे असं ती समजते. ती तसं बोलूनहि दाखवते. शेजारच्या बायकांना वाटतं कीं, मी म्हणजे कोणी तरी रहस्यमय स्त्री आहें. दुसऱ्या शब्दांत सांगायचं तर अवदसा आहें.

भाऊ, मी सीतेच्या पायाची धूळसुद्धा होऊं शकत नाहीं. पण या स्थितींत मला वारंवार तिचं स्मरण होतं. ती वनांत पडली खरी; पण आश्रमांतल्या आयाबाया तिच्याभोंवतीं गोळा झाल्या. दिवसरात्र तिला त्यांनीं सोबत केली. तिचंच नव्हे, तर तिच्या गर्भाचंसुद्धा मंगल चिंतिलं. रामानें त्यागल्यामुळें झालेल्या दुःखाचं कुसळ तिच्या काळजांतून निघावं म्हणून सगळ्या झटल्या. पण भाऊ ! मला इथं काय मिळतं !...

भाऊ, तुम्ही एकदा तरी येऊन जा हो ! माझी स्थिति पाहिलीत तर तुमच्या छातीचा कोट ढांसळेल. तुमच्या अंगणांतली ही वेल तुम्हीं उपटून दुसऱ्याच्या दारीं लावलीत; पण तिथें तिचीं मुळं जमिनींत शिरलींच नाहींत. तिला कोणीं तसं करूं दिलंच नाहीं. एवढंच नव्हे तर ही कृत्या आपल्या डोळ्यांपुढें नको म्हणून सासऱ्यानें आपल्या खेड्यांतल्या या जुन्या घरीं मला निर्दयपणें फेंकून दिलं. मी वाळलें आहें, रक्तहीन झालें आहें, डबडघाईला आलें आहें. उपेक्षा, आबाळ, मानभंग आणि भविष्यकाळीं अंधार, यांमुळें एखाद्या स्त्रीला जें जें होऊं शकेल तें तें सगळं मला झालं आहे. बरं, मरून जावं म्हणेन तर तीहि वाट मोकळी नाहीं. माझ्या उदरांत एक जीव दिशींमाशीं वाढतो आहे...

भाऊ, माझी होडी बुडते आहे हो ! एकदाच अन् शेवटचं दर्शन देऊन जा मला. मी तुमच्यापुढें बसेन, माझ्या निःश्वासाचा वारासुद्धा तुम्हांला लागणार नाहीं इतक्या अंतरावर बसेन. सगळं रामायण तुम्हांला ऐकवीन. बावनकशी सत्य तुमच्यापुढें उभं करीन. ज्या गोष्टी वडीलधाऱ्यांच्यापुढें उच्चारायला स्त्रीची जीभ लुळी पडेल, त्यासुद्धा तुम्हांला ऐकवीन. खतखतणारं हृदय तुमच्यापुढें मोकळं करीन. मग तुम्ही मला सांगा, कीं 'संजे, हें तुझं चुकलं. हा तुझा अपराध.' भाऊ, तुम्ही घालाल तें माप घेण्यासाठीं मीं पदर पसरून ठेवला आहे.

तुम्हांला आयुष्यांत दोनदा मीं रडतांना पाहिलं. एकदा मी लहानपणीं विषमज्वरानें कढून घालमेल करूं लागलें तेव्हां अन् दुसऱ्यांदा माझी वरात निघतांना.

आतां तुम्हीं आणखी एकदाच रडावं, अशी माझी इच्छा आहे. इजा-बिजा अन् तिजा ! तसे तुम्ही रडलांत कीं मी समजेन कीं, जगाच्या दृष्टीनें कांहींहि असलं तरी तुमच्या दृष्टीनें मी निरपराधी आहें. मग माझं कांहींहि होवो.

मी सासरीं गेलें अन् तुम्ही भरल्या घरांत दीनवाणे झालांत. तुमची दृष्टि सर्वत्र मला शोधूं लागली. माझा शब्द ऐकण्यासाठीं तुम्ही जिवाचे कान करून राहूं लागलांत. तुम्हांला वाटायचं कीं, सरळ उठून माझ्या सासरीं यावं अन् मला डोळेभर पाहून परतावं. तुम्हींच सांगितलं होतंत् मला एकदा हें. तसे तुम्ही एकदीं आलांतहि. एकदा आल्यावर पुन्हाहि यावंसं वाटलं. पण व्याह्यांच्या घरीं वारंवार जाणं बरं नव्हे; म्हणून तुम्हीं अनेकदा तुमच्या ऊर्मी दाबल्यात.

भाऊ, तुम्ही मन मारायला शिकलांत ते या वेळीं. संजो आतां आपली उरली नाहीं. ती परक्याचं धन झाली आहे. आतां तिचा मोह आवरला पाहिजे. नाहींतर आपला निभाव लागायचा नाहीं. मी दुसऱ्यांदा माहेरीं आलें तेव्हांच मला तुमच्या या बदलत्या मनोवृत्तीचा सुगावा लागला. पण तो मोह कांहीं लेचापेचा नव्हता. तो तुम्हांला आवरेना, चैन पडूं देईना. म्हणून मग तुम्ही मलाच वारंवार माहेरीं बोलावूं लागलांत: मला एकटीलाच नव्हे कांहीं; माझ्याबरोबर आपल्या जांवयालहि.

एकदा बोलवायचंच म्हटलं कीं निमित्तं काय हवीं तेवढीं—आज काय संसार-पाडवा, उद्यां काय तळीपासला मान्कुराद आंबा उतरून आढी घातली आहे, परवां काय पहिली मंगळागौर माहेरीं जोडप्यानें पुजायची आहे, अशीं किती तरी. जांवई अन् मुलगी. तुमच्या वत्सल दृष्टीनें लक्ष्मी-नारायणाचा जोडा. लज्जा, संभ्रम, कटाक्ष या माझ्या मुखचंद्राच्या नव्या कळा तुम्ही आवडीनें पहात होतां. आम्र-तरूवर चढवलेली आपली मोगरीची वेल कशी काय त्याला व्यापते, वेढते, याचा अदमास घेत होतां. लेकीमुळें तुम्हांला जांवई जिवाआगळा झाला होता, का जांवयामुळें लेक प्रियदर्शिनी झाली होती, हें मला कळत नव्हतं. कोण तीं त्या जांवयाचीं कोडकौतुकं...!

अडसरं तोडलीं कीं माड खराब होतो, अशी तुमची ठाम समजूत. कुणीं शहाळं मागितलं कीं तुमच्या कपाळाला आंठी पडायची. पण जांवई आल्यावर भिव्या गड्याला माडावर चढवून शहाळ्यांची पेंडच्या पेंड तोडायला लावतांना तुम्हांला कशा हर्षाच्या उकळ्या फुटत होत्या, तें मीं पाहिलं आहे. आणि

म्हणूनच पुढें आपल्या एकुलत्या मुलीच्या बाबतींत तुम्ही या थराला याल याचं मला स्वप्नसुद्धा पडलं नाहीं. शेवटीं टोंकाला गेलांतच तुम्ही—पूर्वी मायेच्या बाबतींत ; आतां उदासीनतेच्या बाबतींत.

मला कळला आहे याचा अर्थ. तुम्हांला वाटतं, मुलीनें आपलं नाक कापलन्. तुमची प्रतिष्ठा ढांसळली म्हणून तुम्ही असे काळवत्री दगड झालां आहांत. मुलगी आणि प्रतिष्ठा यांत प्रतिष्ठेचं पारडं जड आहे. मी म्हणतें, असूं द्या ! पण त्या गोष्टीला मी कितीशी कारणीभूत आहें, याची ओझरती तरी चौकशी कराल का नाहीं !......

माझी ही मुकी कैफियत निःश्वासांच्या वाटे वाऱ्यांत मिसळून तुमच्या कानां-पर्यंत जाऊं दे म्हणून मी बोलतें. मोठे मोठे डोळे असलेले, कपाळावर उभी शीर असलेले, स्थूल अंगाचे अन् रुंद चेहऱ्याचे माझे भाऊ, माझ्यापुढें बसले आहेत—नाहीं नाहीं—मीं त्यांच्या मांडीवर मस्तक टेकलं आहे, अशी कल्पना करून मी आंतल्या आंतच बोलतें.

भाऊ, त्या माहेरच्या खेपा अन् तेच दिवस तेवढे माझ्या वांट्याला आनंदाचे, उल्हासाचे ठरले. माझ्या सुखाच्या कळा वाढत वाढत तिथवर येऊन पूर्ण झाल्या अन् मग एकदम अमावास्या. तुमच्याकडचा दिवाळसण करून मी सासरीं गेलें तिथपासून माझ्या सुखाला ग्रहण लागलं. सगळं कांहीं ठीक आहे, बिनघोर आहे, अनुकूल आहे, म्हणून विश्रब्धपणें शय्येवर अंग टाकावं अन् चटकन् भिंती-वरची पाल अंगावर पडावी तसंच झालं माझं.

होय पालच. गोरी, विषारी पाल. भोल्या गवळ्याची पोर. पायांत शिंदेशाही तोडे, हातभर गोंदणी, चोळीच्या किनारीपाशीं रुप्याचे बाजूबंद, इरकली लुगड्याचा डोक्यावरून घेतलेला पदर अन् डोळ्यांत नि जिवणीवर सगळे छटेल भाव, अशा रूपांत ती नित्य दोहींसांजा आमच्या घरीं यायची. आमच्या गोठ्यांत दुभती म्हैस होती ; पण तिची धार काढणं घरांत कुणाला जमत नसे. निरू तें काम करी. कधींमधीं भोला यायचा ; पण नेहमीं बहुधा हीच. तिच्या तोड्याचा पाय वाजला कीं 'हे' चरवी घेऊन तिच्या आधीं गोठ्यांत जायचे. एकदोनदा सासूबाई त्यांना म्हणतांना मीं ऐकलं होतं.

"अरे, तूं कशाला वेळ फुकट दवडतोस ! ती आणील कीं धार काढून."

त्यावर ह्यांनीं उत्तर दिलं होतं.

" आई, निरू चावट आहे. काढतां काढतां धारोष्ण अच्छेरपावशेर पिऊन जायची एखाद वेळ. "

एखादे वेळीं हे आरते-परते झाले तर ती सासूला विचारायची.

" आज धाकलं धनी कुटं गेलं ? माझ्यावर पारा कराया कोन ? मी धार काढतां काढतां प्यालों तर वो ?—"

ती ' प्यालों, गेलों ' असं पुरुषी बोलत होती. त्यावरून ती बेळगांवकडची आहे हें कोणालाहि समजून येण्यासारखं होतं. भोला अन् त्याचे आणखी चारदोन सगेसोयरे घाटावरून येऊन आमच्या गांवांत दुधाचा धंदा करीत होते. भोल्यानें निरूचं लग्न करून दिलं होतं ; पण ती तिकडचं सगळं ' उद्वासयामि ' करून माघारली होती अन् बापाबरोबर घाटाखालीं उतरली होती.

लग्न होऊन सासरीं आल्यापासून मी तिला पहात होतें. ती माझ्याशीं नेहमीं कुर्‍यानें वागायची. धड कधीं बोलायची नाहीं कीं माझी दखलहि घ्यायची नाहीं. मी तिला मनांतल्या मनांत म्हणें, ' मरेनास, मला काय करायचं आहे तुझ्याशीं ! माझं अडलं आहे खेटर...'

पण माझी ती चूक होती. खेटर नव्हे; तर माझा मोत्यांतला मोठा नग अडला होता तिच्याशीं. मला तें फार उशिरां कळलं. भाऊ, मी धुंदींत होतें, विश्वासावर होतें. कारण माझा नवरा ही तुमची निवड होती. ती कधीं फसायची नाहीं अशी माझी धारणा होती. तुम्ही एकदा माझ्याकडे ह्यांचं गुणवर्णन केलं होतं. ' संजे, तुला कसा सत्यवानासारखा नवरा मिळवून दिला आहे बघ...' मीहि त्याच दृष्टीनें त्यांच्याकडे पहात होतें. आदर आणि भक्तिभाव यांच्या चारी धारा मी त्यांच्या पायांवर सांडीत होतें.

पण भाऊ, तुम्ही एवढे व्यवहारचतुर, एवढे सर्वविषयीं सावध; पण या बाबतींत फसलांत. अगदीं वर्माच्या जागीं घसरलांत. मुलीच्या बाबतींत असं फसणं म्हणजे काळजाला कायमचा डाग घालून बसणं. पण तेंच तुमच्या अन् माझ्या नशिबीं आलं. ' वानलं तें घाणलं ' अशी स्थिति झाली.

त्या दिवशीं त्रिपुरी पौर्णिमा होती. सूर्यास्तानंतर लगेच चंद्र शरदाच्या निळ्या, स्वच्छ आकाशांत चढला होता. त्यानें आपल्या घरच्या दुधाच्या

सगळ्या चरव्या खालीं लवंडून दिल्या होत्या. हृदयसरोवरांतल्या सगळ्या कुमुदिनी एकदम फुलतील अशीच ती रात्र होती. मी निरांजन घेऊन परसदाराच्या तुळशीवृन्दावनापुढें आलें होतें.

**“ कार्तिका मासा तुळशिचीं सेवस्रें आले वृंदावनीं कृष्णदेव**
**सडे–संमार्जनें चौकी रांगोळिया घालिती बाळिया इंद्रनीळ....”**

ही कार्तिक मासांतली तुळशीची आरती म्हणून तिला प्रदक्षिणा घातली होती. मला आणखी कांहीं ठिकाणीं पणत्या पेटवून ठेवायच्या होत्या. मीं एक पणती पेटवून घेतली, ती वाऱ्यानें जाऊं नये म्हणून डावा हात तिच्या ज्योती-भोंवतीं धरला अन् गोठ्याच्या दारांत गेलें....पण गोठ्यांत अंधार होता. अंधारांत कुजबुज होती. अन् कुजबुजींत पाप होतं.

गोठ्याच्या छपरावर धवळी पौर्णिमा बरसत होती. गोठ्याच्या आंत अमावास्या गोळा झाली होती. मी तिथें प्रकाश करायला गेलें; पण ...हातांतील पणती विझली. तिथला अंधार माझ्या अंतरांत भरला. पाय लटलटूं लागले. छातींत सुरी खुपसल्यासारखं झालं. तशीच परत फिरलें. घरांत आलें अन् पदरांतच रडलें. निरू कसकसल्या धारा काढीत होती अन् हे कसला पहारा करीत होते तें स्वच्छ कळलं.

त्या रात्रीं मी धुमसतच राहिलें. पकडलेला चोर ‘ तें नव्हे, तसलं नव्हे ’ असं वारंवार करून प्रथम मला दुधखुळी ठरवण्याच्या प्रयत्नाला लागला. पण थोड्याच वेळांत त्याला कळलं कीं, मी पक्की आहें. मग त्यानें पवित्रा बदलला. चुचकारण्याची जागा रागानें घेतली. ‘ माझ्या गोष्टींत तुला नाक खुपसण्याची गरज नाहीं. तूं आपली पायरी संभाळून वाग. तुला कांहीं कमी पडलं नाहीं ना ?...’ अशी दटावणी मिळाली.

त्याच क्षणीं माझीं आंसवं सुकलीं. तीं बाहेर गळायचीं तीं आंत गळूं लागलीं. त्यांनीं ती रात्र माझ्यापासून दोन हात दूर राहून घालवली. तेवढ्या अंतरावरूनहि मला वाटलं, कीं मी एखाद्या तापलेल्या भट्टीजवळ झोंपलें आहें. त्यांच्या ‘ त्या ’ अनैतिक वर्तनापेक्षांहि रागानें माझा विरोध मोडून काढण्याची सुल्तानी मनोवृत्ति जी त्यांनीं दाखविली, तिनंच मी अधिक घायाळ झालें. भाऊ, माझ्या या शोकान्त नाटकाची नांदी झाली ती अशी.

मी त्या रात्रीं जागी होतें तोंवर विचार करीत राहिलें. माझ्या संसाराला लागलेली ही निरूची कीड काढून टाकलीच पाहिजे. पण कशी काढायची ती? सासू-सासऱ्यांना सांगून? छेः! माझ्या नवऱ्याची चहाडी मींच करणं यांत माझीच नाचक्की होती. एकदा वाटलं, कीं माहेरीं यावं अन् तुम्हांला सांगावं. पण अवघड जागीं झालेलं हें दुखणं तुमच्या कानीं कसं घालायचं? कोणाला न कळतां ही व्याधि दुरुस्त झाली असती तरच सगळ्यांचा आब रहाणार होता. विचारांतीं एक उपाय दिसला. सकाळीं उठून मी घरांत गेलें, मांडणींतली चरवी उचलली अन् सासूला म्हटलं.

"आपण जरा माझ्याबरोबर गोठ्यांत यावं."

"कां ग?"

"आज म्हशीची धार मी काढणार आहें."

"तूं!"

"होय. मला माहेरीं संवय आहे. म्हैस बाळगायची आपण अन् दुधासाठीं अवलंबून रहायचं त्या निरूवर. ती कधीं लवकर तर कधीं उशिरां आपल्या लहरीनें येणार. आपण रात्रीच्या दुधाचा चहा घ्यावा, हें मला नाहीं बरं वाटत."

माझ्या या बोलण्यानें सासू खुलली आणि माझ्याबरोबर गोठ्यांत आली. तिला म्हशीच्या तोंडापुढें उभी रहायला सांगून मी कांसेखालीं बसलें. निरू-इतक्या कौशल्यानं नव्हे; पण सावकाशपणें चरवींत झुरूमुरू धारा सुरू झाल्या. तिची घागरीएवढी ओटी आटवतां आटवतां माझ्या अंगांतून घामाच्या धारा फुटल्या. पण मी जिद्दीला पेटलें होतें. या कामांत मी यशस्वी झालें कीं निरूचा उठावा होणार होता. मी जेव्हां फेंसाळ, ओसंडती चरवी सासूच्या हातीं दिली, तेव्हां तिचा आनंदहि तसाच फेंसाळला.

आम्ही दोघी गोठयांतून बाहेर पडतों न पडतों, एवढयांत निरू आपल्या शिंदेशाही तोड्यांच्या जड पावलांनीं आपल्या नेहमींच्या ठमकाऱ्यांत तिथें प्रगटली. सासूनें तिच्यापुढें विरविरणाऱ्या फेंसाची चरवी धरून म्हटलं.

"ही बघ, आज माझ्या सुनेनेंच धार काढली. तुझ्यापेक्षां दोन धारा सरस. आतां तुझ्या पायधरण्या नकोत."

निरूच्या जणूं शेपटीवरच पाय पडला. तिनें माझ्याकडे रोखून बघितलं. ती दृष्टि नव्हती; तर दुधारी कट्यार होती. मीं तिचं मूळच उपटून टाकलं होतं. यापुढें कोणत्या निमित्तानें आमच्याकडे येणार होती ती? युक्तीनें मीं तिच्यावर विजय मिळविला होता. तोंडल्यासारख्या लाल ओठांची, सावळ्या, गुबगुबीत गालांची अन् थोराड हाडापेराची ती निरूरूपी नागीण जेव्हां तोंड वळवून फणकाऱ्यानें निघून गेली, तेव्हां मला हायसं वाटलं.

ह्यांना हें कळलं. एखादा कौतुकाचा नवरा असता तर म्हणाला असता. 'आज संध्याकाळीं तुझ्या हातचं धारोष्ण पिणार आहें मी.' पण त्यांनीं शब्दाची किंवा दृष्टीची शाबासकी तर दिली नाहींच; उलट तोंड दुर्मुखलं केलं. मी इतकी पाताळयंत्री असेन, दुखऱ्या भागावर चटकन् बिब्बा घालणारी असेन, याची त्यांना कल्पना नव्हती. त्यांचा रात्रीचा दंभ निराळा होता. तें अंधारांतलं रहस्य मला दिसल्याबद्दल ते मुळींच ओशाळले नव्हते. ते आपलं व्रत चालू ठेवणार होते अन् माझी भुवई उचलूं नये म्हणून नवरेपणाचा दाब देणार होते.

पण मीं केलं तें भल्तंच. त्यांच्या अंगाला त्यामुळें जाळ पडले. बोल्तां तर येईना अन् सहन तर होईना. त्या उभ्या दिवसांत ते माझ्याशीं तर सोडाच; पण आईशीं, भावंडांशींसुद्धा बोलले नाहींत. सासूच्या तें नजरेंत आलं. पण मीं म्हटलं, तापूं द्या. जितके अधिक तापतील तितके अधिक लवकर निवतील...

मीं योग्य तेंच केलं होतं. कुलस्त्रीच्या ब्रीदाला शोभेल असंच केलं होतं. पण तरीहि दिवस संपूं लागला, तसतसं माझं काळीज खालवर होऊं लागलं. न्यायी असो, अन्यायी असो; पण तो पुरुष होता. त्यामुळें रात्रीं खोलीला आंतून कडी लावतांना हातासकट माझी काया नखशिखान्त कांपत होती. त्यांचं आधण उकळून तयारच होतं. ते माझ्यापुढें बोटं नाचवीत मला बोलले.

"निरूला तूं बंद केलीस म्हणून तिचा—माझा संबंध तुटेल असं वाटलं काय तुला?"

"मी कुठं तसं म्हणतें? पण मला ती धार काढायच्या निमित्तानें इथें यायला नको आहे. तुम्ही तुमच्या-तिच्या संबंधाला काय तें नांव ठेवा अन् राजरोस तिला घरीं आणा."

"काय करशील ग तूं!"

“ मी आरत्या ओंवाळीन तुम्हां दोघांना. ”

भाऊ, काय सांगू तुम्हांला ! मी तोंडाला येईल तें बोललें. तेहि भडकले अन् मीहि भडकलें. त्यांना त्याच दिवशीं कळलं असावं कीं, ‘आपल्याला एका म्यानांत दोन तलवारी वागवतां येणार नाहींत. आपली बायको तिखट आहे. तिला नांदावायचं असेल तर निरूकडे पाठ केली पाहिजे.’ पण तें त्यांना जड होतं. तो पाश त्यांच्या गळ्याभोंवतीं घट्ट आवळलेला होता. मिटलेल्या कमळकळींत सांपडलेल्या भ्रमरासारखी त्यांची स्थिति होती. तो सुकुमार विळखा त्यांना तोडतां येत नव्हता. पण काय वाटेल तें झालं तरी त्यांनीं हा मनोनिग्रह करायलाच हवा आणि माझी क्षमा मागून मला शुद्ध आचरणाचं वचन द्यायलाच हवं असा माझा आग्रह होता. मी मग त्यांना खुल्या दिलानें क्षमा करणार होतें.

पण त्यांनीं मला तसं आश्वासन दिलं नाहीं. त्यामुळें आमच्यांतला दुरावा वाढत चालला. पडलेली फट रुंदावत गेली. सासूनें जाणलं कीं, मुलाचं अन् सुनेचं कांहीं तरी चांगलंच बिनसलं आहे. तिनें मुलाला विचारलं; पण मुलगा काय सांगणार ? मग मला छेडलं. पण मी तरी काय सांगूं ? मग सासू-सासऱ्यांचं खलबत झालं. त्यांत ठरलं असावं कीं, मीच नादान आहें, धुत्कारणारी आहें. कारण सासऱ्यानें एक दिवस मला हाक मारून म्हटलं.

“ सुने, अशी पुढं ये. ”

मी दाराआड होतें ती नाइलाजानें पुढें गेलें.

“ काय चालवलं आहेस तूं हें ? तुला घर नांदवायचं आहे ना ? तुला सून म्हणून आणली ती अच्युतशीं तेरीमेरीनें वागण्यासाठीं नव्हे. बायकोनें नवऱ्याच्या आज्ञेंत वागलं पाहिजे. लक्षांत ठेव. पुन्हां असलं कांहीं कानावर आलं तर खबरदार ! ”

भाऊ, म्हणजे पहा ! सासऱ्यानें चोराला सोडून संन्याशालाच फाशीं द्यायला काढलं. जणूं अपराधी होतें ती मीच. त्या रात्रीं माझा अश्रूंचा बांध फुटला. ह्यांनीं जवळ येऊन माझे डोळे टिपले. पाठीवरून हात फिरवला. विरोध त्याच क्षणीं कोलमडून पडला. माझ्यांतलं स्त्रीत्व—आधाराला भुकेलेलं स्त्रीत्व—त्यांच्या हृदयावर असहाय्यपणें कोसळलं. त्यांनीं पश्चात्ताप व्यक्त न करतांहि मीं त्यांना क्षमा केली. छेः ! पण हेंहि खोटं आहे. जाब विचारणारी, कबुली घेणारी, क्षमा

करणारी, स्वाभिमानी स्त्री त्या वेळीं माझ्यांतून कुठल्या कुठें पसार झाली होती. उरली होती ती 'गळा सुरी तुझ्या हातीं' म्हणून अंग टाकणारी शरणार्थिनी अबला!...

आणि काय आश्चर्य सांगूं भाऊ तुम्हांला! मी न मागतां ती कबुली मला मिळाली. कोरडी नव्हे, तर अश्रूंच्या उदकानें भिजवून दिलेली. त्या वेळीं माझा आवेग आवरून मलाच त्यांचे डोळे कोरडे करावे लागले. मला वाटलं, मीच वेडी आहें. मीच अपराधी आहें. उगीच मी विरोधाच्या आगींत आठ दिवस होरपळत राहिलें.

त्या रात्रीं त्या चार भिंतींच्या आंत कुठून तरी वसंत अवतरला. त्यानें आंब्याला मोहोर आणला. मोगरीच्या वेलावर पानागणिक कळ्या उमलवल्या. आंबा म्हणाला, 'ये, तुला उंच चढवतों. अनंगाच्या लहरींवर नाचवतों.' मोगरी म्हणाली ... पण काय? तिला जें म्हणायचं होतं तें ओठांच्या आंतच घुटमळलं अन् विरलं. डोळ्यांतल्या बाहुल्या काय बोलल्या असतील तें मात्र न कळे!...

दुसऱ्या दिवसापासून घरांतलं वातावरण बदललं. मी उल्हासानें वागूं लागलें. हे खेळीमेळींत आले. सासऱ्याला वाटलं कीं, आपण दिलेली हेमगर्भाची मात्रा सुनेला चांगलीच लागू पडली. त्यांच्या गर्वाचं पोषण झालं. आठदहा दिवस कसे चुटकीसरसे गेले तें कळलंच नाहीं.

पण मला ऐकूं येत नसलं तरी कुठं तरी पाल चुकचुकत होती. वास्तुपुरुष भूगर्भांतून अशुभाचे हुंकार काढीत होता. दैव माझ्यासाठीं मातीचे घांस घेऊन मार्ग चालूं लागलं होतं. अदृष्टाचा भोग माझ्यापुढें नाचण्यासाठीं आपलं सोंग सजवूं लागला होता. मला वाटलं त्याप्रमाणें निरू माझ्या संसारांतून हुळवादली नव्हती. ती छायारूपानें आजूबाजूला वावरत होती. तिनें आपलं जाळं आवरून घेतलं नव्हतं.... घटना दृष्टीआड घडली होती; पण तिचा ओला छाप एक दिवस त्यांच्या चेहऱ्यावर दिसला. मी शहारलें. दोन हात दूर झालें. क्षोभलें. ते समजले. मी जी शब्दांची आग पाखडीन ती सोसण्याची तयारी करून राहिले.

पण मीं अवाक्षर उच्चारलं नाहीं. माझ्या धनुकलीला दोरीच चढेना; तिथं शरसंधान कुठलं? जें काय बोलायचं तें मागेंच बोलून झालं होतं. नापसंती, तिरस्कार, क्रोध, दर्शवायचा तो मागेंच दर्शवून झाला होता. आतां करायची ती फक्त मागच्याची उजळणी. पण कशाला ती!...

त्या दिवसापासून पुन्हां माझ्यांत स्थित्यंतर झालं. मी अबोल, उदास बनलें. याच अवस्थेंत आणखी पंधरा दिवस गेले असतील. घरांतलं वातावरण कुंद झालं. पुन्हां सासूच्या कपाळीं आंठ्या. सासऱ्याच्या मुद्रेवर प्रश्नचिन्ह. ह्यांच्या चर्येवर काळी छाया. सासू-सासऱ्यांनीं ठरवलं कीं, मला नवऱ्याची गोडी नाहीं. कदाचित् माझं मन दुसरीकडे कुठें तरी ...

अशा स्थितींत मार्गशीर्ष गेला. पौष आला अन् मला कळलं कीं, मी दोन जिवांची झालें आहें. त्या येत्या प्राण्याची घरांतहि चाहूल लागली; पण वडील माणसांनीं त्याचं स्वागत केलं नाहीं. ह्यांना काय वाटलं देव जाणे! जिथें धड बोलणंहि नाहीं, तिथें भावदर्शन कुठलं! मला मात्र वाटलं कीं, या बिघडलेल्या वातावरणांत हें व्हायला नको होतं. माझ्या विषण्ण अन् आक्रसलेल्या मनःस्थितींत अंकुरलेलं हें बीज कसं काय वाढेल, पोसेल, कोण जाणे!

माघ लागला अन् एक दिवस मला यांची चर्या उतरलेली दिसली. मी चरकलेंच. कांहीं झालं तरी तो माझा कुंकवाचा धनी होता. हे जेव्हां 'भूक नाहीं' म्हणून रात्रीं खोलींत पडून राहिले, तेव्हां सासूनें येऊन नाना प्रश्न विचारले. पण ह्यांचं एक नाहीं कीं दोन नाहीं. सासूनें त्याचा अर्थ घेतला कीं, सूनच हें सगळं बिघडवते. तीच आपल्या पोराला सुख लागूं देत नाहीं. ती माझ्यावर एक जळता कटाक्ष टाकून अन् एक हुंकार सोडून तिथून चालती झाली. सगळ्यांची निजानीज झाल्यावर मग मीं शेजारीं बसून ह्यांना विचारलं.

"काय होतंय तुम्हांला? डोकं का दुखतंय?"

पण खिन्न अशा मौनावांचून मला दुसरं उत्तर मिळालं नाहीं.

"मला नाहीं का सांगायचं? तुम्ही असं विचित्र वागतां अन् त्याचं खापर माझ्या माथ्यावर फुटतं. जणूं कांहीं मींच तुमचं सगळं बिघडवलं आहे."

त्यावर हे लगेच उठले. माझा हात हातांत घेऊन आणि कारुण्यानें ओथंबलेली दृष्टि माझ्या दृष्टीला भिडवून कातर स्वरांत मला म्हणाले.

"मी संकटांत सांपडलों आहें. मला सोडवशील?......"

आतां मीहि घाबरलें. माझं काळीज उडूं लागलं.

"मीं तुम्हांला सोडवायचं! कसं सोडवूं! माझ्या हातीं आहे का तें! मला सांगा ना काय तें."

" तें नाहीं मला सांगतां येणार. "

" असं काय बरं करतां ? मला अंधारांत कां ठेवतां ? कळूं दे तरी मला. "

" नाहीं. तें तूं मला विचारूं नको. "

म्हणजे पहा. संकटांत पडलों म्हणायचं, माझी मदत मागायची. अन् तरीहि सगळं मला चोरून. मला उद्वेग आला या वृत्तीचा.

" ठीक. मग मला कुठें बळी द्यायची असेल ती द्या. मी तयार आहें. "

" बळी नको जाऊं. मला फक्त तीनशें रुपये आणून दे. "

" कुठून ? "

" तुझ्या बापाकडून. "

" माझ्या बापाकडून कां ? मामंजींकडे मागा. "

" तें शक्य नाहीं. तूं उद्यां माहेरीं जा. मी तुला पाठवायची व्यवस्था करतों. "

" अन् भाऊंनीं नाहीं दिले तर ? ते खोलांत शिरून चौकशी करूं लागले तर ?"

" काय हवं तें सांग त्यांना. प्रसंग दुर्धर आहे. तुला तुझा नवरा हवा—"

" असं कां बोलतां तुम्ही ? मला असं कात्रींत कां धरतां ? तुम्ही जोंवर स्पष्ट सांगत नाहीं तोंवर मी भाऊंच्याकडे जाऊं कोणत्या तोंडानं ? "

" मग मर जा ! चालती हो माझ्या खोलींतून. "

ती अपमानाची सणक माझ्या मस्तकांत भिनली. मी दार उघडून सरळ खोलीच्या बाहेर आलें अन् तिथेंच एक जुनेर टाकून आडवी पडलें. कोणाला सांगायच्या या यातना ! कोणापुढें हृदयावरचा घाव उघडून दाखवायचा ? मी विचार करूं लागलें. ' जिवावरचं संकट ' या ह्यांच्या शब्दांत कांहीं तथ्य नाहीं असं मला वाटूं लागलं. अन् असलंहि, तरी मामंजी कांहीं नामर्द नव्हते. मला कल्पना आली ती ही कीं, ही निरूची मागणी असावी अन् ते जर तिला मिळाले नाहींत तर ती ह्यांना लाथ मारणार असावी. बरं होईल तसं झालं तर. सुंठी-वांचून खोकला जाईल. मला पाठवताहेत भाऊंच्याकडे रुपये मागायला. ह्यांनीं एक कमरेचं सोडून माथ्याला गुंडाळलं, म्हणून मी...

माझा तिथेंच उत्तर रात्रीं केव्हां तरी डोळा लागला. सकाळीं मी जागी होऊन पाहिलं तों स्वारी अंथरुणावर नव्हती. सहज उशाकडे नजर गेली तर तिथें एक चिठ्ठी होती. मीं ती उचलली अन् उलगडली. त्या तीन ओळींवर अधाशासारखी माझी नजर फिरली.

'मी जिवाला कंटाळून निघून जात आहें. कदाचित् या जगांतूनहि निघून जाईन. माझा शोध करूं नये.'

चिठ्ठी वाचली आणि माझ्या अंत्रमाळा उडाल्या. मीं सासूला ती दाखविली. सासूनें गळा काढीत ती सासऱ्याच्या हातीं दिली. सासऱ्यानें पुढचा कांहीं विचार करायच्या पूर्वी मला पुष्पांजलि वाहिली. "ही—हिच्यामुळें हा प्रसंग ओढवला. हीच माझ्या मुलाच्या मुळावर आली..." मीं तें ऐकलं. मला ऐकून घ्यावं लागलं. सासऱ्यानें मग पणजी—मडगांवपासून सावंतवाडी—बेळगांवपर्यंत शोधासाठीं माणसं रवाना केलीं. पण कोणीहि त्यांचा पत्ता आणूं शकलं नाहीं. मग सासू-सासऱ्यांना वाटलं कीं, ह्यांनीं जिवाचं कांहीं बरं-वाईट करून घेतलं. सासू गलितगात्र झाली. सासरा कपाळावर हात घेऊन बसूं लागला. मला माझ्या खोलींत तुरुंगवास झाला. कोणीं मला कोंडलं नव्हतं. कारण माझ्याकडे कोणाचं लक्षच नव्हतं. मी होऊनच तोंड लपवून बसलें होतें. सोबतीला माझी चिंता.

'...ह्यांनीं खरोखरच आत्मघात केला असेल का? मग कुठें? तळं, विहीर, नदी, समुद्र...एवढं धाडस होईल त्यांच्या हातून? तरणाताठा जीव विहिरींत, नदींत लोटवेल? कुणीं सांगावं? हो, एरवीं माझा पुरता सूड कसा उगवला जाईल? कोणी तरी नक्की बातमी आणीपर्यंत कपाळींचं कुंकूं पुसायचं नाहीं एवढंच...'

या अवस्थेंत चार-आठ दिवस गेले. नंतर एक दिवस दुपारीं तिसरा प्रहर संपायच्या वेळेला निरूचा बाप भोला, त्याचे दोघे-तिघे सोबती, तिची आई अन् खुद्द निरू, इतकी मंडळी अचानक आमच्या ओसरीवर चढली. भोलानें सासऱ्याला हांक मारली ती जरा दमांतच. सासऱ्यानें पाहिलं कीं, कांहींतरी प्रकरण आहे. त्यानें त्या मंडळीला परसदारच्या ओटीवर बोलावून घेतलं. भोला आपल्या साथीदारांसह बसला. निरूची आई कोपऱ्यांत उभी राहिली अन् तिच्या आडोश्याला निरू.

"काय खबर?" सासऱ्यानें विचारलं.

"खबर माझ्या पोरीची."

"काय झालं पोरीला?"

" तुमच्या मुलानं माणसांतनं उठवली ! दुसरं काय ? "

आणि सासरा क्षणभर स्तब्ध झाला. त्यांच्या डोळ्यांपुढें काजवे लकलकले. ज्याचा काडीमात्र अंदेशाहि नाहीं, असं कांहीं तरी एकदम त्यांच्या कानांवर आदळलं होतं.

" म्हणतोस काय तूं ? "

" मंग काय खोटं म्हणतों कीं काय ? बगा कीं एकदां पोरीकडे. तीन महिन्यांचं पोट वाढलंय तिचं. "

" पण माझाच मुलगा गुन्हेगार याला पुरावा काय रे ? "

" तुमचा पोरगा पळून गेला यापरीस दुसरा कोणता पुरावा व्हावा तुमास्नी ? " भोल्याचा सोबती गुरगुरला.

" म्यां त्याला धरलं होतं. म्हटलं पोरीची काय ती सत-गत लाव. न्हाईं तर तुझ्या बापाला सांगतों बघ. तर पळूनच गेला कीं ! " भोल्यानें पुरवणी जोडली.

" अरे, काय कुभांडं आणतां तुम्ही हीं एकेक ! " सासऱ्यानें वैताग दाखवला.

" हीं कुभांडं न्हाय. ही तुमच्या पोराची करणी हाय. पोरीला भुलथापा दिल्यान् नि गळा कापल्यान्. तुमच्या घरीं ठिवून जाणार आहों आम्ही तिला. तिची काय ती सोडवाट करा. डाग्दराकडं न्हेली तर तो तीनशें रुपये मागतो. कुठनं आणायचे आम्हीं रुपये ?... " भोल्याच्या बायकोनें तोंड सोडलं.

सासऱ्याची मुद्रा बघण्यालायक झाली. अब्रूचा प्रश्न निर्माण झाला. भोल्यानें ही गोष्ट गांवभर केली असती. कदाचित् पोलिसांकडेहि गाऱ्हाणं नेलं असतं. हे तीनशें रुपये आणून देण्याबद्दल मला कां गळ घालीत होते, कोणतं संकट त्यांच्यापुढें होतं तें मला त्या वेळीं कळलं.

मी माझ्या खोलीच्या खिडकींतून तो प्रवेश चोरट्याप्रमाणें पहात होतें. निरूचं तोंड उतरलं होतं. तिचा तो उद्दाम नखरा कुठल्या कुठें पळाला होता. चारचौघांत तिच्या अब्रूची उधळमाधळ चालली होती. निरूच्या नांवानें मी जळत होतें. माझ्या संसारावर तिनेंच निखारा ठेवला होता. पण या वेळीं मला तिची करुणाच आली. एकापरी तिची विटंबना झाली होती अन् दुसऱ्यापरी माझी. दोघीहि आम्ही स्त्रीजातीचे कर्मभोग भोगीत होतों.

माझ्या दुर्दैवाची तरी चातुरी खरीच. जो बीजभूत गर्भ मी माझ्या ओटींत वाढवीत होतें त्याचाच दुसरा सोबती निरूच्या पोटांत पापपुण्याची पर्वा न करतां वाढीस लागला आहे, हें विंदान त्या दैवानें मला दाखवलं. डोळे फुटेपर्यंत तें मीं पाहिलं अन् मग खालीं बसून घळघळां रडलें. थोड्या वेळानें ती मंडळी निरूला घेऊन निघून गेली. सासऱ्यानें त्यांची योग्य ती संभावना केली आणि त्यांना वाटेस लावलं.

आणि माझ्या मनांत पुन्हा विचार उठला. आतां हे लोक निरूचं काय करतील ? ते जें काय करतील त्याची कल्पना आली आणि माझं अंग शहारलं. ‘देवा, त्या नासावत्या जिवाचा शाप माझ्या कुसव्याला तर बाधणार नाहीं ना ?…’ कारण आतां त्या एकाच आशेवर मला माझं जीवन धरून ठेवायचं होतं.

त्या मंडळीची पाठ वळली मात्र; सासरा तणतणत माझ्या खोलींत शिरला. भोला येऊन अब्रू काढून गेला, दक्षिणा घेऊन गेला त्याचा वचपा त्यानें माझ्यावर काढला.

“ तूं माझं घर बुडवलंस. तूं माझा मुलगा मला नाहींसा केलास. तूं नीट वागतीस, त्याला जीव लावतीस, तर तो बाहेरख्याली झाला नसता. तूं चालती हो माहेरीं. काळं कर इथून. माझ्या दृष्टीपुढें राहूं नकोस …”

आणि भाऊ, त्याच दिवशीं तुमच्याकडे माणूस रवाना झाला. ‘ असाल तसे निघून या ’ म्हणून तुम्हांला फर्मान सुटलं. तुम्ही दुसऱ्या दिवशीं आलांत. येऊन ओटीवर बसलांत. एरव्हीं मी तुमच्या स्वागताला पुढें यायची. तुमच्याशीं दोन शब्द केव्हां बोलेन असं मला व्हायचं. पण आज कोणत्या तोंडानें पुढें येऊं ?

सासरा बाहेर गेला. त्यानं घडला वृत्तांत तुम्हांला सांगितला. नुसता नव्हे, तर आपलं दूषित मन त्यांत मिसळून. ‘ तुमच्या मुलीनें माझ्या घराचे तीन तेरा केले. बया पायगुणाची ठरली. एका वर्षांत सगळ्या देवी जेववल्या. यापुढें ती माझ्या घरांत नको. तुम्ही तिला घेऊन चला. एवढ्यासाठींच तुम्हांला बोलावलं होतं…

मी म्हणतें, सासऱ्याचं एक ठीक. एवढा मोठा मुलगा ‘ ना नपश्यत् ’ झाल्यावर त्याचा तोल सुटणं एकापरि साहजिक. पण भाऊ, मी दोष देतें ती तुम्हांला. तुम्हीं जरा डोकं शांत ठेवायला हवं होतं. जिच्यावर हे आरोप झाले ती आपली मुलगी आहे आणि चालू घटकेला ती संशयांतलं वैधव्य भोगते आहे,

एवढी जाणीव तुम्हीं ठेवायला हवी होती. पण तुमचा स्वर चढला तो सासऱ्याच्या वरताण !

" जिनें सासर पाड घातलं ती माझी मुलगीच नव्हे, असं मी समजतों. तिला माहेरीं न्यायची म्हणजे आपल्या हातांनीं बेअब्रूच घरीं न्यायची कीं नाहीं ? तुम्ही तिचं काय हवं तें करा. माझ्या वांट्याला ती मेली, खपली !..."

आणि तुमचा आवाज थांबला. मला सगळ्यांनीं सगळं म्हटलं होतं. फक्त तुम्ही काय म्हणतां तेवढंच ऐकायचं राहिलं होतं. तेंहि आतां स्पष्ट ऐकलं. तुम्हींहि फुंकर न घालतां घावच घातलात. पण तरीहि मला थोडी आशा होती. तुम्ही खोलींत याल. ' संजे, काय ग झालं हें ? ' असं मला म्हणाल. मी तुमच्याकडे व्याकुळ होऊन पाहीन. तुमच्या मांडीवर डोकं ठेवून भावनांना वाट मोकळी करीन. मी निरपराधी आहें हें माझ्या मुद्रेवरूनच तुम्हांला कळेल...मी तुमची वाट पहात राहिलें. तुमच्या पावलांचा कानोसा घेत राहिलें. पण तुम्ही माझ्या खोलींत आलां नाहीं.

मग माझा जीव राहीना. मी हळूच खोलीच्या बाहेर आलें. माजघर ओलांडून ओटीवर तुम्ही दिसलां नाहीं. मीं आजूबाजूला पाहिलं. कोपऱ्यांत तुमची छत्री नव्हती. खुंटीला तुमचा रुमाल नव्हता. तुमच्या अस्तित्वाची एकहि खूण पडवींत नव्हती. भाऊ, तुम्ही निघून गेलां होतां. मला न विचारतां, न सांगतां. .

आणि त्यानंतर दुसऱ्याच दिवशीं सासऱ्यानें मला या खेड्यांत, आपल्या जुन्या घरीं आणून टाकलं. परित्यक्तेचं जिणं मी इथें जगतें आहें. मरण ही कांहीं वाटते तितकी भयानक गोष्ट नाहीं, असं आतां मला वाटूं लागलं आहे. मी हवं तेव्हां तें बिनदिक्कत जवळ करूं शकेन. पण आंतून तो उदरांतला वाढता जीव ओरडतो. ' आई, तूं मरूं नको. तुझं मरण हें माझंहि मरण ठरेल ... ' अन् मलाहि वाटतं कीं, आपल्यावरचा हा घरबुडवेपणाचा कलंक धुतला गेल्यावांचून मरण्यांत शोभा नाहीं. पण माझा न्याय करणार कोण ? माझा दावा मांडणार कोण ? म्हणून मला तुमची आठवण येते. भाऊ, तुम्ही मला न्याय मिळवून द्या. एकदा येऊन भेटून चला. एकदा माझी कर्मकथा ऐका.

तुम्ही म्हणाल, ' एवढं तुला वाटतं तर तूं ये अन् काय तें सांग मला. ' पण शक्य नाहीं तें. तुमची मुलगी आहें मी. माहेर माझ्या वांट्याला वैकुंठ आहे ; पण

या अवस्थेंत नव्हे. तुमच्या घरीं येऊन मला तुमचा तुच्छतेचा दृष्टिक्षेप घ्यायचा नाहीं. तुम्हीं माझ्याकडे आलं पाहिजे. माया जाऊं दे मसणांत. पण निदान कर्तव्य तरी पार पाडाल ? आपण व्याह्यांचं म्हणणं तेवढं ऐकलं, मुलीची बाजू आपल्याला कांहींच कळली नाहीं, असं तुम्हांला एकदासुद्धा नाहीं का वाटलं ? भाऊ, तुमच्याशिवाय मी कोणावर ठपका ठेवूं ?......

मला ठाऊक आहे, कीं तुम्हीं येणार नाहीं. माझं हें अरण्यरुदन ठरणार आहे. अशा वेळीं वाटतं, कीं आज आई असती तर किती बरं झालं असतं ! तिनें तुमच्या मनाची पाकळी माझ्याकडे वळवली असती. तुमचं कठिण झालेलं अंतर आपल्या अश्रूंनीं थोडं तरी मऊ केलं असतं ...... पण छे ! या म्हणण्याला कांहीं अर्थ नाहीं. तिचं तुम्ही कितीसं ऐकत होतां तें काय मीं लहानपणीं पाहिलं नाहीं ? तुम्ही ते तुम्ही अन् तुमचा हट्ट तो तुमचाच हट्ट !

पण तरीहि जीव तुमच्या नांवानें आक्रोश करतो. सभोंवतीं उठलेला वैशाख-वणवा त्याला सहन होत नाहीं. माझ्या डोळ्यांतल्या पाण्यानें तो विझत नाहीं. त्यांत तुमच्या डोळ्यांतले दोन थेंब पडूं देत. म्हणून तुम्हांला विनवितें —

भाऊ, एकदां तरी भेटून जा !



# बहिष्कार

दुर्दैव आधीं येऊं नये अन् आलेंच तर तें नातेवाईक माणसाच्या रूपानें येऊं नये. कारण त्याच्याशीं मुकाबला करणें मोठें दुर्घट होऊन बसतें. वाघ आल्यास सामर्थ्य असलें तर त्याच्या अंगावर बंदुकीचा बार काढतां येईल; पण मेहुण्याला —प्रत्यक्ष बहिणीच्या नवऱ्याला तुम्ही काय कराल! त्याला चटका दिला कीं त्याचें दुःख बहिणीच्या डोळ्यांत उभें रहायचें. तें पाहिलें कीं आईचें काळीज गलबलायचें. अन् आईला दुखलें कीं सरतेशेवटीं ती संवेदना आपल्यालाच येऊन भिडायची. जगन्नाथाची नेमकी हीच अवस्था झाली होती.

त्याची आक्का आईची लाडकी होती, अजून सडी होती आणि त्यामुळें अनेकदा माहेरीं ये-जा करीत होती. ती आली कीं तिला पोंचवायला म्हणा, न्यायला म्हणा तिचा नवरा म्हणजे जगन्नाथाचा भावजीहि येत होता. पण आजचें त्या दोघांचें येणें कांहीं निराळेंच होतें. आज गड्यांच्या डोक्यावर पेट्या, वळकट्या होत्या आणि चिरगुट-पांघरुणांचीं गाठोडींहि होतीं. जगन्नाथाला प्रथम कांहीं उमजच पडेना. पण संध्याकाळीं मायलेकी एकत्र बसल्यावर आक्कानें आत्मपुराण सुरू केलें आणि तें ऐकल्यावर त्याला उलगडलें कीं—

आक्काच्या घरीं हस्तिनापुर निर्माण झालें आहे. कौरव-पांडवांची भाऊबंदकी माजली आहे. भावजीच्या भावानें, बापाच्या मृत्युसमयीं मिळालेलें डबोलें गडप केल्याचा भावजीवर आरोप केला आहे. 'सुईच्या अग्राएवढी मातीसुद्धा तुला आतां इथें मिळायची नाहीं,' म्हणून त्याला घरांतून बाहेर काढलें आहे. या प्रकरणांत सगळा अन्यायी काय तो आक्काचा मोठा दीर असून भावजी अगदीं धुतल्या तांदुळागत निर्मळ आहे—अन् तो आतां इथेंच राहून भावाविरुद्ध सरकार-दिवाण करणार आहे...

आणि हें पुराण संपवल्यावर त्याची फलश्रुतिहि आक्कानें आईला ऐकवली.

"शेवटीं 'सत्यमेव जयते' च होईल. आम्हांला घराभायरीं करणाऱ्या त्या दिराचं तळपट होईल. बघशील तूं आई! आतां 'हे' पुरते खवळले आहेत. अन् ह्यांचा राग म्हणजे—"

जगन्नाथाच्या आईनें 'तसंच होवो ग बयो' म्हणून लेकीला आशीर्वाद दिला आणि जगन्नाथ अन् त्याची बायको वत्सला या दोघांना भावजीसाठीं घराच्या डाव्या अंगाची उभी खोली साफ करायला सांगितलें. सुनेनें लगेच केरसुणी उचलली. जगन्नाथानें पाठोपाठ सामान लावलें. स्वतःसाठीं तयार झालेल्या त्या खोलींत आक्का अन् भावजी हें जोडपें 'सुखं च मे शयनं च मे' साठीं प्रविष्ट झालें, तेव्हांच जगन्नाथ अन् वत्सला यांना स्वतःच्या शयनगृहांत जाण्याची अनुज्ञा मिळाली. त्या रात्रीं जगन्नाथाला लवकर झोप येईना. तो वत्सलेला म्हणाला.

"आतां कसं ग ?"

"हा प्रश्न माझा आहे, म्हटलं."

"म्हणजे ?"

"इतके दिवस सासूबाई एकट्या होत्या. आतां त्यांच्या जोडीला वन्सं. दोन पात्यांची कात्री अन् मधें माझे तुकडे."

"कांहीं घाबरूं नकोस तूं. मी आहें."

"कशाला मी आहें ? या घरांतल्या काडीवर तरी सत्ता चालते का तुमची ? सासूबाई तुम्हांला अजून कुकुलं बाळ समजतात !"

"अग चल ! पाहीन-पाहीन अन् अधिकच व्हायला लागलं तर एक घाव अन् दोन..."

तीं कांहींहि म्हणोत; पण त्या दोघांच्या पोटांत त्या दिवशीं भयाचा गोळा उठला हें खरें. आतां त्यांना एकमेकांवाचून कोणाचा आधार नव्हता. एकमेकांचें बळ घेऊन त्यांना आतां दुप्पट व्हायला हवें होतें. न बोलतां त्यांना तें कळलें आणि त्या रात्रीं त्या दोघांची मिठी अधिकच दृढ झाली.

जगन्नाथ म्हणजे त्या गांवचा गांवमित्र. त्याच्याच वयाचे सात-आठ तरुण त्या गांवांत होते. ते एकमेकांच्या घरीं जात होते, खात होते, पीत होते, कामाधामांत एकमेकांना मदत करीत होते अन् फुरसतीच्या वेळीं सगळे जमून पत्तेहि खेळत होते. अगदींच छोटेंसें गांव. त्यामुळें तिथें सहभाव होता, सहकार्य होतें. प्रत्येकाला प्रत्येकाची गरज पडायची. एका पाटाच्या पाण्यावर जगणारा नांदणारा, तो लहानसा मानवगुच्छ होता. कोणाला कोणाच्याहि घरीं परकेपणा नव्हता.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं जगन्नाथ गुरें राखण्याच्या स्वाधीन करून घरीं आला, तेव्हां त्याच्यासंगें गणप्या आणि मोऱ्या हे दोघे सोबती होते. आल्यावर त्यानें आईला म्हटलें.

" आई गे ! आम्हाला खायला दे."

आईनें त्या तिघांसाठीं केळीचे फाळके मांडून त्यांवर दशमी अन् चटणी वाढली. तिघेहि गप्पागोष्टी करीत खाऊं लागले. त्यांचा तो घरांतला हास-परिहास मागीलदारच्या अंगणांत आपलीं कागदपत्रें वाचीत बसलेल्या भावजीच्या कानीं आला. त्याची एकतानता भंगली. तो उठला अन् घरांत आला. गणपतीच्या दोंदाचा, बेंबीखालीं पंचा नेसलेला, जानव्याची निवीति पोटावर रुळवणारा, थलथलीत थोबाड खांद्याला चिकटलेला, लठ्ठपणामुळें केवळ आडवाच डोळ्यांत भरणारा, बाह्याव्याच्या शेंगांसारख्या जाड चिकटलेल्या बोटांच्या मुठींत केळीच्या शेनवताची लांब विडी धरलेला, एक काळासांवळा पुरुष पुढें उभा राहून आपल्या-वर डोळ्यांतले निखारे फुलवीत आहे, हें जेव्हां गणप्या अन् मोऱ्या यांनीं पाहिलें तेव्हां त्यांचें हास्य तर मावळलेंच ; शिवाय तोंडांतला घांस तोंडांतच घुटमळला.

" काय रे, तुम्हांला तुमचीं घरं नाहींत ? लोकांच्या घरीं मांड्या ठोकून दशम्या हादडायला शरम् नाहीं वाटत ? "

ते मुलगे लगेच पान टाकून उठले अन् चालते झाले. आक्कानें आईकडे दृष्टि-क्षेप करून सुचविलें कीं, ' बघ आई ! याला म्हणतात व्यवहारज्ञान. ' पण हें जांवयाचें व्यवहारज्ञान सासूला विशेषसें रुचलें नाहीं. जगन्नाथ तर ' आ ' वासून बघतच राहिला. त्या बिचाऱ्याला मान तोडल्यागत झालें. पण एवढ्यांत भावजी जगन्नाथावरहि घसरला.

" काय रे जगन्नाथ ! तुझ्या घरांत काय समाराधना आहे ? आल्यागेल्याला म्हणे दशमी दे. मडक्या माळ्यावर चढतील अशानं. "

जगन्नाथाचा तो दिवस अत्यंत अस्वस्थतेंत गेला. ती बातमी त्याच दिवशीं गांवभर पसरली. दुसऱ्या दिवशीं गुरांच्या माळावर तिची चर्चाहि झाली. ' आतां जग्याच्या घरीं जायचं म्हणजे विचार करायला हवा ! ' गणप्या म्हणाला. जगन्नाथाचें तोंड बघण्यालायक झालं. त्याच्याकडे त्याचे सोबती येणार नाहींत म्हणजे त्यानें तरी कोणत्या तोंडानें त्यांच्या घरीं जायचें ?—त्या दिवशीं

मोऱ्याच्या दारावरून तो आला. पण त्यानें बोलावलें तरी त्याच्या पडवीवर चढला नाहीं.

घरीं येतो तों भावजी दह्याचें पाळें समोर घेऊन न्याहारीवर यथास्थित ताव मारीत बसला होता. जगन्नाथाला तें पाहून अंतरीं सहस्र विंचू डसले. वस्तुतः तो घराचा मालक ; पण तो घरीं येईपर्यंतहि भावजीला दम निघाला नव्हता अन् पोराआधीं जावयापुढें ' बाळवाटी ' ठेवतांना आईच्याहि जिवाला कांहीं वाटलें नव्हतें. वत्सलेनें जेव्हां त्याचें पान पुढें आणलें तेव्हां तो तुटकपणें म्हणाला. ' मला नको ; मी खाऊन आलों आहें. ' तो तिथून बाहेर चालता झाला. वत्सलेला त्यांतलें खोटेंपण उमगलें होतें. ती पाटावर तांदूळ धूत असतांना तो जेव्हां निसाण्यावर कोयती घासायला आला, तेव्हां ती म्हणाली.

" तुम्हीहि खाऊं नका अन् मी पण खात नाहीं. आपण दोघं समिधेसारखीं सुकून राहूं या. हं ऽ ऽ ! "

" म्हणजे ! तूं दशमी खाल्ली नाहींस ? "

" घरांत उपाशीं असतांना आपण खायचं, हें माझ्या आईनं शिकवलं नाहीं मला. " वत्सलेनें एक सजल कटाक्ष जगन्नाथावर टाकला.

त्यानें ' च्—च् ' म्हटलें, पण पुढचें ऐकायला ती थांबली नाहीं. ती वाटेवरून आंगणांत अन् आंगणांतून पडवीवर गेली आणि तिच्या जोडीनें रोवळीच्या कोपऱ्यांतून अखंडपणें एक जलधाराहि गळत गेली. जगन्नाथाला वाटलें कीं ती वत्सलेच्या अंतरांतली प्रेमधाराच आहे.

जगन्नाथाच्या पडवीवर एक उंच सोपा होता, त्यावर बसून भावजी वाटेनें जाणाऱ्या-येणाऱ्यांच्या बचेऱ्या मारी. तो त्याचा नित्याचा व्यवसाय ठरला होता. घरीं आलेल्याचें कांहीं तरी असलें नसलें वैगुण्य काढून तो आपणच खो खो हसत सुटे अन् तो माणूस खट्टू झाला कीं वर आक्काकडे पाहून डोळे मिचकावी. एक दिवस शेजारचा दामूआण्णा कांहीं तरी कामासाठीं पडवीवर आला तर भावजीनें ' या गुरुमहाराज ! ' म्हणून त्याचें स्वागत केलें. तो गांवांतलें पुढारीपण करी म्हणून त्याला तो टोला होता. पण त्यानें अगदीं भोळा भाव दाखवून प्रत्युत्तर केलें.

" भावजी, माझी एवढी पदवी चढली नाहीं अजून. "

" मग केव्हां चढायची ? "

" भावाच्या टाळूवर हात फिरवून सासुरवाडीला जाऊन पडलों, म्हणजे मग !"

दामूआण्णाचा हा फटकारा अगदीं ओल्या वादीचा होता. भावजीला तो अगदीं कडकडून झोंबला. त्यानें हातांतली विडी टाकून खोलीची वाट धरली. जगन्नाथाला हायसें वाटलें. त्यानें वत्सलेकडे नेत्रसंकेत केला आणि तिचेहि डोळे समाधानानें लुकलुकत असल्याचें त्याला दिसलें.

त्या दिवशीं संध्याकाळीं पडवीवर बैठक भरली. भावजीनें डाव्या हाताच्या तळव्यावर उजव्या हाताची बुक्की मारीत नि आपली फोफशी काया गदगदा हालवीत नाकांतल्या आवाजांत म्हटलें, ' मी सॉंसुरवॉंडीला येऊन पडलों म्हणून या ग्रामस्थांच्या बापाचं काय खरचतं ? ' त्यावर ' बघवत नाहीं; डोळे फुट्तात लोकांचे ' म्हणून आक्कानें अडकित्त्यानें कचदिशीं सुपारीचा रोठा कापला. ' लोकांचं कशाला ऐकावं आपण ? बोलतील तिकडे ऐकतील. ' प्रेमळ सासूनें त्यावर सांत्वनाचें सारवण घातलें.

अलीकडे घरांतल्या त्या तिघांहि मोठ्या माणसांनीं वांटणी करून घेतली होती. आक्का अन् आई यांनीं वत्सलेला सरळ करायचें अन् आक्का अन् भावजी मिळून जगन्नाथाला शिस्त लावायची. भावजीचें स्पष्ट मत होतें कीं, जगन्नाथानें कुळागरांतलें, शेतांतलें काम झाल्यावर सरळ येऊन पडवीवर बसावें. ते मित्र नकोत नि त्या चकाट्या नकोत. आपल्या पायावर पाय द्यावे, कमरेवर बुक्क्या माराव्या, पाठ कांडुळावी, हेंच त्याच्या दृष्टीनें जगन्नाथाच्या नरदेहाचें सार्थक होतें. त्याला आपल्या दृष्टीसमोर ठेवून सुतासारखा सरळ करणें हें जणुं भावजी या नात्यानें तो आपलें कर्तव्य समजत होता. जगन्नाथानें झुकांडी दिली अन् तो शेजारघरीं पत्ते खेळत असल्याचा वास लागला, कीं भावजीची हलट ठेवलेली.

" जगन्नाऽऽथ ! "

बिचारा जगन्नाथ हातांतला डाव टाकून घरीं पळत येई. आल्यावर भावजीचा डाव्या तळव्यावर उजव्या मुठीचा बुक्का मारून नाकांतला सवाल.

" कॉंय मिळालॅं राजावर एक्का मारून रे ? कुठला मोकासा घेतलॉस ? ऑं ! मूर्ख कुठला ! विष्णुसहस्त्रनॉंम म्हण बसून इथें. "

या नित्य जाचाला कंटाळून तो एक दिवस एकांतीं आपल्या आईला म्हणाला.

"भावजीला घरांतून जायला सांग.... तुला जड वाटत असलं तर मी सांगतों."

त्यावर आई त्याच्यावर वाडग्याएवढे डोळे करून कडाडली.

"मूर्ख आहेस. त्यांच्या घरीं अन्न नाहीं म्हणून का ते तुझ्या घरीं आले आहेत! तुला वडिलांचं छत्र नाहीं, पाठीचा भाऊ नाहीं. अशा स्थितींत ते तुझ्या घरीं आले हा केवढा आधार तुला! मेल्या, दगड समजून चिंतामणि पायांनीं लोटायला निघालास, तें तुला कांहीं कळतं का? त्यांचं सरकार-दरबारांत केवढं वजन आहे! अन् हीच का तुझी बहिणीची माया?—तरी बरी, एकच आहे. भलतं-सलतं त्यांना कांहीं बोलशील तर नाक आदळून प्राण देईन तुझ्यापुढें..."

जगन्नाथाला आईचा राग आला; पण पुढें बोलतां येईना. तो तिथून उठून कुळागरांत चालता झाला. कुळागराच्या शीतल छायेंत आणि जळाच्या जवळिकेंतहि त्याची ती मानसिक आग शमली नाहीं. एवढ्यांत तिथें त्याला वत्सला दिसली. ती तळींत धुतलेलें धुणें जवळच्या पोफळींना बांधलेल्या दांडीवर वाळत घालीत होती. तिनें त्या वस्त्राचा एक पदर ओढला आणि त्या भारानें दांडी सुटून खालीं आली. तिनें जगन्नाथाला पाहिलें आणि 'उभारत' हाक मारली. तो जवळ येतांच त्याला दांडी बांधून देण्याबद्दल विनवलें. तो तिला मदत करायच्याऐवजीं 'वेंधळी आहेस—गाढव आहेस—अक्कलशून्य आहेस!' अशी तिची खावड काढीत सुटला. वत्सलेनें तें सगळें निरपराध बोलणें ऐकून घेतलें अन् न राहवून त्याला म्हटलें.

"ही बघा वन्संच्या अन् भावजींच्या धुण्याची मोट. धुतां धुतां माझ्या दंडांचे तुकडे पडले अन् वर तुम्ही मलाच ताणतां. मलाच नव्हे; माझ्या आई-बापांनासुद्धां अक्कल नव्हती, म्हणून त्यांनीं मला तुमच्या घरीं दिलं. घरांत सगळ्यांचीं खेटरं खातें तीं तुमच्या आशेवर. अन् तुम्हीच असं करूं लागलांत तर..."

वत्सला मटकन् खालीं बसली अन् तिनें आरक्त तळव्यांनीं आपलें तोंड झाकून स्फुंदायला सुरुवात केली. जगन्नाथाची सणक एकदम उतरली. त्या

अश्राप अन् कष्टल्या जिवाचा शब्दवेध केल्याबद्दल त्याला फार वाईट वाटलें. घरांतल्या त्या दूषित वातावरणांत तीच एकटी त्याची कैवारीण होती. मग त्यानें तिची दांडी तर बांधून दिलीच अन् जातां जातां इकडेतिकडे पाहून तिच्या आसूंचें हसूंत रूपांतर करायलाहि कमी केलें नाहीं.

भावजी एकच महत्त्वाचा उद्योग करी आणि तो म्हणजे डिचोलीच्या वाऱ्या. डिचोली हें कोर्टकचेऱ्यांचें ठाणें. त्यानें तिथें भावाविरुद्ध दावा मांडला होता. डिचोलीहून घरीं आला कीं जेवायला बसल्यावेळीं तो आपल्या बायकोला नि सासूला आपण त्या रणक्षेत्रावर आज वाणीची तलवार कशी वावडली तें मोठ्या फुशारकीनें सांगे. मग सासू कौतुकानें मनांत म्हणे, ‘ वकील ग बाई ! ’

भांडणें, भांडायला लावणें, आगींत तेल ओतणें, मजा पहाणें अन् शक्य तर त्यांतूनच आपल्या पोळीवर तूप ओढणें, हा भावजीचा जातिस्वभाव होता. त्यामुळें त्या गांवचा एकोपा त्याच्या डोळ्यांत खुपे. कुठें तरी ठिणगी पडावी, तें प्रकरण कोर्टांत जावें आणि त्याची कज्जेदलाली आपल्याला मिळाली अशी त्याची आकांक्षा होती. त्या उद्देशानें त्याची काकदृष्टि सगळीकडे भिरभिरत होती.

चिंतोबा आणि रामनाथ हे दोघे त्या गांवचे सख्खे भाऊ. दोघेहि वांटण्या करून विभक्त झाले होते; पण एकमेकांचें प्रेम संभाळून होते. या भावजीची विखारी नजर त्यांच्यावर गेली. त्या दोघांत बोटचेपा होता तो रामनाथ. भावजीनें त्याच्याशीं सलगी धरली. आपलें मोठेपण नि शहाणपण तो त्याच्या अपक्व बुद्धींत कोंबूं लागला. तो भारला जातो आहे असें दिसून आल्यावर हळूच एक दिवस त्याच्यापुढें त्यानें सूतोवाच केलें.

“ तो झरीपासला माड तुझा भाऊ खातो याचा अर्थ काय रे ? तो तर चक्क तुझ्या शिमेंत आहे. भाऊ तुला ‘ पिशाक पिंपळ ’ दाखवतो अन् आपली तुंबडी भरतो. अन् तूं आपला तुकाराम. अरे, एक माड म्हणजे वर्षाचं बारा पंधरा रुपयांचं उत्पन्न. तूं यंदा गणेशचतुर्थीच्या पाड्याला तो माड पाड. जाऊं दे भावाला कोर्टांत. मी बघून घेईन. ”

एकदा, दोनदा, तीनदा असें परोपरीनीं भरवल्यावर रामनाथाचा लोभ जागृत झाला. मग खरोखरच एक दिवस त्यानें तो माड पाडला. भावजीला हर्षाच्या उकळ्या फुटल्या. एक मासा त्याच्या गळाला अडकला. चिंतोबानें तें पाहिलें

आणि तो संतापला. भावाभावांत बाचाबाची झाली. रामनाथाचीं दुरुत्तरें ऐकून चिंतोबानें डिचोलीला जाण्यासाठीं डोक्याला रुमाल बांधला.

पण वाटेंत दामूअण्णाची आणि त्याची गांठ पडली. दामूआण्णा हा त्या गांवचा अनभिषिक्त पंच. त्यानें चिंतोबाला फिरवून आणलें. दुसऱ्या दिवशीं गांवकीचा मेळा बोलावला. दोघांहि भावांना एकत्र आणलें. रामनाथला प्रश्न विचारतांच तो भावजीच्या जोरावर भिशाटें उडवूं लागला. दामूअण्णानें त्याला म्हटलें.

" तुझं बाष्कळ बोलणं नको. तो माड चिंतोबाचा आहे हें सगळ्या गांवाला ठाऊक आहे. तुलाहि तें ठाऊक होतं. पण आज नळराजाप्रमाणें तुझ्या हृदयांत कलि शिरला आहे. या गांवांत चार महिने तो दबा धरून बसला होता. आज त्यानें तुला गांठलं. ठीक आहे. मी हा एक नारळ तुळशीच्या पायरीवर ठेवतों. ' मीं पाडलेला माड माझा आहे, ' असं या गांवकीच्या देखत म्हणून तूं तो नारळ उचल. चिंतोबाला मी तो माड तुला द्यायला लावतों. आजच नव्हे; वंशपरंपरेनें. "

दामूअण्णा उठला. त्यानें तुळशीपाशीं समई लावली आणि पायरीवर एक असोला नारळ ठेवून दिला. ' हं, ऊठ. ' त्यानें रामनाथला म्हटलें. पण रामनाथचें धूड उचलेना. तो बसल्या जागीं कांपूं लागला नि काळाठिक्कर पडला. त्यानें आपली चूक कबूल केली. दामूअण्णाचा हेतु साध्य झाला. तो म्हणाला.

" तूं वाईट वाटून घेऊं नको. ही तुझी बुद्धि नव्हे, हें मी जाणतों. दुर्जनांची सावली पाडून घेतली कीं असाच बुद्धिभ्रंश व्हायचा. अरे, ' हर हर ' म्हणणारे पुष्कळ असतात, पण आगीचे चटके सोसावे लागतात जी सती जाणारी असते तिला. झालं तें झालं. तुझ्यांतलं सत्य अजून मेलं नाहीं, ही समाधानाची गोष्ट आहे. घरीं जा अन् पाडलेले नारळ चिंतोबाच्या घरीं पोंचते कर. "

त्यावर चिंतोबा म्हणाला.

" नको. ते त्याच्या मुलाबाळांना खाऊं देत. त्याची बुद्धि ताळ्यावर आली तेवढ्यांत मला सगळं पावलं. "

तो विषय संपला. जमलेले लोक पंचे झटकून उठूं लागले, हें पाहून दामूअण्णा पुन्हा म्हणाला.

"थांबा. ही बैठक एवढ्यावर संपली नाहीं. आज आपल्याला आणखी एक महत्त्वाचा निर्णय घ्यायचा आहे. आपल्या गांवांत एक दुष्ट कीड येऊन बसली आहे. जगन्नानाथाच्या आईनें तिला आपल्या घरीं पोसलं आहे. जगन्नाथाचा भावजी आपल्या घराला चुडणी लावून इथें आला आहे. या गांवांतहि त्याला आग-जाळ उठवायची आहे अन् तिच्यावर आपली पोळी भाजायची आहे. याच्याकडे त्याची निंदा अन् त्याच्याकडे याची चुगली असं त्यानं चालवलं आहे. एकाला सांगायचं 'रां' अन् दुसऱ्याला सांगायचें 'डे' आणि कशी काय ठिणगी उडते तें पहात बसायचं. या गावांतली नांदणूक बिघडली कीं त्याची पंढरी पिकणार आहे. याला आतां एकच उपाय—तो म्हणजे आजपासून आपण सर्वांनीं जगन्नाथाचं घर वर्ज्य करायचं. जोंपर्यंत त्याची आई आपल्या कौतुकाच्या जांवयाला घरांतून घालवीत नाहीं, तोंपर्यंत जगन्नाथाच्या घरीं अन्नोदक घेणं नाहीं. त्याच्या कवाडींत पाय ठेवणं नाहीं. मंडळी, मी म्हणतों हें तुम्हांला कबूल आहे का ?"

सगळ्यांनीं एकमुखानें 'कबूल' म्हटलें. पांचामुखीं परमेश्वर गरजला. बहिष्कार हें त्या छोट्या गांवाचें नारायणास्त्र होतें. बहिष्कृत म्हटलें कीं त्याचा गांवाशीं संबंध तुटला. तो गांवांत असून गांवाभायरा झाला. मग त्याचे हाल कुत्रा खायचा नाहीं. या अस्त्राच्या भीतीनें प्रत्येकजण आपापल्या मर्यादेंत वागे. त्यामुळें गांवाचें ऐक्य अबाधित राही. एखादे वेळीं चीर गेली तर ती चटकन् सांधली जाई. बहुतेक न्यायनिवाडे तिथल्याच निःस्वार्थी पंचांच्या मुखानें होत. कोणी उतूं लागला, मातूं लागला, तर ताबडतोब त्याच्या डोळ्यांत अंजन घातलें जाई.

भावजीला हा गांवकीचा निर्णय कळला. त्याला वाईट वाटलें. त्याच्या कपाळाला आंठ्या पडल्या. बहिष्कार पडला म्हणून नव्हे; तर एक अर्धवट हातीं आलेलें रामनाथाचें सावज निसटलें म्हणून. गांवच्या लोकांनीं हा कोर्टांत जाण्याजोगा नामी विषय आपसांत निकालांत काढला, ही गोष्ट त्याच्या स्वार्थाच्या दृष्टीनें बिघडली.

पण खरें दुःख झालें तें जगन्नाथाला. आपण समुदायांतून वेगळें पडलों, जणुं माणसांतून उठलों, या जाणिवेनें तो तळमळूं लागला. त्यानें घरीं येऊन घडला वृत्तांत आईला सांगितला. तीहि क्षणभर अस्वस्थ झाली. जावयामुळें ही आपत्ति ओढवली, हें न कळण्याइतकी ती मूर्ख नव्हती. बहिष्काराचे परिणाम तिला

ठाऊक होतें. तिनें पर्यायानें सूचना द्यावी म्हणून भावजीपुढें तो विषय काढला. लगेच भावजीच्या डाव्या तळव्यावर उजव्या हाताची बुक्की बसली.

" तुम्ही मुळींच घाबरूं नका. दशम्या–पोहे वांचले. जेवे–खाँवे वांचले. गांववाल्यावांचून कांहीं अडत नाहीं तुमचं. मी आहें खंबीर. एकेकाला असा वंगवतों! बहिष्कार घालतात काय ?...इथें कांहीं भाजून पेरलेलं नाहीं म्हणावं."

सासू जांवयाच्या शब्दशौर्यावर आश्वासली. दुसऱ्याच दिवसापासून बहिष्काराचा अंमल दिसूं लागला. कोणी त्यांच्या कवाडींत पाय देईना. गणेशचतुर्थीच्या दिवशीं चंद्र दिसूं नये म्हणून माणसें जशीं विरुद्ध दिशेला किंवा खालीं पाहून चालतात, त्याप्रमाणें वाटेनें जाते-येत. शेजारी त्या घरावर नजर पडूं नये म्हणून पाटाकडे पहात चालूं लागले. जगन्नाथाचें घर जणुं महारोग्याचें घर ठरलें.

जगन्नाथ त्या दिवसापासून उदास झाला. त्याला कशांतच गोडी उरली नाहीं. तो घरांत धड जेवीना कीं कोणाशीं धडपणें बोलेना. घरांतल्या कोणाचेंहि मुखावलोकन नको, असें त्याला वाटूं लागलें. तो कारणापुरेसा घरीं येई अन् दिवसभर कुळागरांतच माचोळीवर म्हणा, चुडतांच्या ढिगाऱ्यावर म्हणा, सुंदपणें पडून राही. वत्सलेचा जीव त्यामुळें तिळतिळ तुटे. ती मोठ्या माणसांची नजर चुकवून कुळागरांत येई, त्याला आळवी आणि डोळे ओले करी. मनांत आलें तर तो तिच्याशीं दोन शब्द बोले, नाहीं तर उगाच तिच्या अंगावर खेकसे. मग ती त्याला ऐकूं जाईल असें स्वगतच बोले.

" तुम्हां सर्वांना राग आहेत, लोभ आहेत, दुःखं आहेत. मी तेवढी या घरांतली भावनाशून्य शिळा. माझी कशाला कोणी वास्तपुस्त करायची! माझी तडफड दिसत नाहीं तुम्हांला. ईश्वराला तरी डोळे असूं देत म्हणजे झालं..."

प्रतिवर्षाप्रमाणें भाद्रपद उगवला अन् घरोघर गणपती आले. पण धुपारतीसाठीं, उत्तरपूजेसाठीं जगन्नाथाच्या घरीं कोणी आलें नाहीं. पंचखाद्याची एक मूठसुद्धा खर्च झाली नाहीं. वर्षाला तो गणपतीची मांडवी भरगच्च बांधायचा; पण या वर्षी आंब्याचे चार टाळे लोंबवण्यापलीकडे त्यानें कांहीं केलें नाहीं. फटाक्यांच्या एकाहि माळेला उदबत्ती लावली नाहीं. भावजीनें गणपतीची पूजा सांगितली आणि त्यानें केली. त्या पूजेंत अंतःकरणाचा ओलावा नव्हता. आनंदाचा अनुभव

नव्हता. दुसऱ्या दिवशीं त्यानें गणपति उचलला अन् तो अश्रूंनीं ओला करीत चोरासारखा एकट्यानेंच नेऊन वहाळांत बुडवला !

त्या रात्रीं गांवांत उत्सव मांडला होता. घुमटें धिमधिमत होतीं. समेळ कडकडत होते. झांजा खळखळत होत्या. फटाके वाजत होते. आरत्या-मंत्रपुष्पांचे तारस्वर उठत होते. ती काळी, पावसाची रात्र नुसती दुमदुमून राहिली होती. एकेका घरचा गणपती बुडत होता. केळीं, पपनसें, नारिंगें, महाळुंगें, काकड्या, हीं मांडवीचीं फळें तटातट तुटत होतीं आणि पंचखाद्याबरोबर सर्वांच्या मुखीं लागत होतीं. गांवांतलीं लहानथोर माणसें एकत्र जमून आपापल्यापरी सणाचा आनंद लुटीत होतीं.

पण तसें पाहिलें तर गांवांतल्या लोकांनाहि त्या उत्सवाचें खरें सुख नव्हतें. त्या रात्रीं शंभरदा तरी त्यांनीं जगन्नाथाची आठवण काढली. या उत्सवाच्या महापर्वांत आपण जगन्नाथाला खड्यासारखें फेकून दिलें, ही बोचणी सर्वांनाच लागली होती. जगन्नाथ हा त्या गांवचा उत्सवमूर्ति होता. प्रत्येक गोष्टींत पुढें. पोंचवायच्या वेळीं प्रत्येक गणपति तो उचलायचा. वाजवतां वाजवतां एक तरी घुमट त्यानें त्या रात्रीं फोडायचेंच. 'राजाधिराजाय' सुरू झालें कीं त्याचा आवाज टिपेला भिडायचा. पत्ते खेळायला बसला तर त्याचें पान सर्वांत मोठ्यांदा वाजायचें. कुठेंहि ढकला, सदा हसतमुख. त्यामुळें लोकांना घरोघरीं त्याची अनुपस्थिति जाणवत होती. त्याच्यावर कोणाचाच रोष नव्हता; पण तो मात्र त्यांच्यांतून बाजूला पडला होता.

बहुतेक गणपती दीड दिवसाचे गेले. उरलेले पांचव्या, दहाव्या दिवशीं गेले. पुढें आला पक्षपंधरवडा. घरोघरीं महालय सुरू झाले. 'इष्टैःसह भुज्यताम्' ही धर्माची आज्ञा पाळण्यासाठीं प्रत्येक गृहस्थ शेजारच्या सगळ्यांना जेवायला बोलवी. जगन्नाथानें तेंहि पाहिलें. त्याहि बाबतींत तो वंचित झाला. ज्या घरीं पक्ष असेल त्या घरीं मांडवावरची शाकभाजी आणि दह्याचा गाडगा रवाना करायचा ही त्या गांवची रीत. जगन्नाथाच्याहि घरीं दुभतें होतें. त्याच्याहि मांडवावर दोडकीं–पडवळें लोंबत होतीं. पण तीं सगळीं अभागी होतीं. दिल्याघेतल्याचें सुख तीं जगन्नाथाला देऊं शकत नव्हतीं. त्याला हें सगळें असह्य झालें. आला दिवस दीर्घ नि कंटाळवाणा होऊं लागला.

मग एक दिवस त्याला कांहीं तरी वाटलें अन् तो दामूआण्णाच्या घरीं आला. दामूआण्णानें त्याला प्रेमानें ‘ ये–बस ’ म्हटलें. तो कांहीं क्षण मूकस्तंभ बसला अन् मग म्हणाला.

“ दामूआण्णा ! तुम्हीं मला टाकलत. टाका बिचारे. पण मला आतां या गांवांत जगणं अशक्य आहे. मीं ग्रामत्याग करायचं ठरवलं आहे. सांगून गेला नाहीं असं होऊं नये, म्हणून तुमच्या कानांवर घालतों. घरीं कोणाला न कळवतां मी काळ्या रात्रीं...”

आणि जगन्नाथाला हुंदका फुटला. त्यानें ठरवलें होतें तें कुडी आणि प्राण यांच्या वियोगाइतकेंच दुर्धर होतें. दामूआण्णाहि त्यामुळें विचलित झाला. जगन्नाथाच्या जवळ जाऊन अन् त्याच्या खांद्यावर हात ठेवून त्यानें म्हटलें.

“ जगू, असं कांहीं करूं नको. हा बहिष्कार आम्हीं तुझ्यावर घातला नाहीं, तर आमच्यावरच घातला आहे. मी दरवर्षी गणपतीची गांवसमाराधना घालतों, तुला ठाऊक आहे. यंदा मीं ती घातली नाहीं. कां, सांग पाहूं. तुला बोलावतां येणार नाहीं म्हणून. विश्वास ठेव माझ्यावर. मीं सुक्याबरोबर ओलं जाळलं. निरुपाय होता माझा. पण तूं मात्र असला अविचार करूं नको. अजून थोडं सोस. मग सगळं गंगाजळ होईल. मी डोळ्यांत तेल घालून बसलों आहें—”

“ नाहीं, दामूअण्णा. यापुढें सोसायची तयारी नाहीं माझी. गौरीगणपती असे गेले. आतां दिवाळी तशी जाईल. तुम्ही सगळे एकत्र जमाल. घरोघरीं जाऊन पोहे खाल. मला वगळाल. माझं घर वगळाल. पत्ते खेळाल, आनंद कराल. मला मात्र तोंड लपवून बसावं लागेल. महारोग्यासारखं दूर रहावं लागेल. गांवानें ज्याला ओवाळून टाकलं त्यानें गांवांत राहूं नये हेंच खरं ! माझा निश्चय आतां बदलायचा नाहीं.”

जगन्नाथानें दामूआण्णाला चांगलेंच पेंचांत धरलें. तो बहिष्कार वस्तुतः त्याच्यावर नव्हता; पण बाधला होता मात्र त्याला. दामूआण्णाला तें ठाऊक होतें. तो जर आतां गांव सोडून निघून गेला असता, तर तें त्याच्या वांट्याला मोठेंच अपयश होतें. त्यामुळें दामूआण्णा विचारांत पडला. थोड्या वेळानें त्याला कांहीं तरी सुचलें. तो जगन्नाथाला म्हणाला.

" तूं जाणार हें निश्चित ठरलं का ?"

" होय, निश्चित."

" मग चल माझ्याबरोबर."

" कुठें ?"

" मी नेईन तिथें."

" हा आलों; चल !"

ते दोघेहि निघाले. दुर्गाच्या खावट्यांतून कुळागरांत उतरले. तिथून आडव्या उभ्या दांड्यानें चिंतोबाच्या घरापर्यंत पोंचले. अन् मग पुढें कुठें गेले तें मात्र कळलें नाहीं. दामूआण्णा थोड्या वेळानें परत घरीं आला; पण त्याच्याबरोबर जगन्नाथ नव्हता. दुपार झाली, दक्षिणायनांतला सूर्य मध्याह्नावरून कलला, घरोघर नैवेद्य–वैश्वदेव चालू झाले, कावळे काकबळीसाठीं गोळा झाले, तरी जगन्नाथ घरीं पोंचला नाहीं. वाट पाहून पाहून त्याची आई दमली आणि अंगणांत उभी राहून त्याला कुकारे घालूं लागली.

" जगन्नाथ रे हु हूऽऽऽ !"

भावजीचें पित्त तापलें होतें. वैश्वानर खवळला होता. घरांत पानें मांडून तयार होतीं. केवळ जगन्नाथामुळें त्याच्या हाता–तोंडाची गांठ पडायला विलंब लागत होता. भावजीला त्याचा राग आला. तो नाकांतल्या नाकांत पिरपिरूं लागला, ' रांडेच्याला दुपार नाहीं, तिपार नाहीं. कुठें वर तोंड करून भटकतो देव जाणे !' आणि त्यानें बायकोला आपल्या पानांत भात वाढायला सांगितलें. अत्रीच्या अनसूयेनें त्याची आज्ञा पाळली. भावजी आपोष्णी घेऊन गोळे भरूं लागला.

जगन्नाथाची आई अंगणांतून सारखी हाकाटीत सुटली होती; पण तिच्या एकाहि हांकेला ' ओ ' आली नाहीं कीं जगन्नाथ कुठूनहि उमटला नाहीं. तिचें काळीज गलबललें. वत्सला कावरीबावरी झाली. भावजी आंचवून पोटावर हात फिरवीत बाहेर आला आणि विडीचे झुरके घेतां घेतां त्यानें जगन्नाथाचें तर्पण करायला सुरुवात केली, ' गाँढव कुठलाँ ! अक्कलच कमी !... हैवान नुसता !...'.

त्या वेळीं मात्र सासूला जावयाचा सौम्यसा राग आला. ती म्हणाली.
" पडवीवर बसून गाळी मोजून काय होणार आहे ? आधीं त्याचा शोध लावा अन् मग काय शिव्या द्यायच्या असतील त्या द्या ! "

" कॉंहीं नको शोध करॉयला. कुकुलं बाळ नव्हे. येईल संध्याकाळपर्यंत. तुम्ही जेवून घ्या आधीं. "

पण आईचें आंतडें तें. तें काय असल्या शुष्क उपदेशाला मान तुकवील ! तिनें वत्सलेला अलतडचीं घरें बघायला पाठवलें. आपण उठून पलतडीस गेली. ' माझा कृष्ण देखिला काय ' म्हणून गोकुळांत गल्लोगल्लीं हिंडणाऱ्या यशोदेच्या व्याकुळतेनें घरोघर फिरली. पण भेटेल तो कानांवर हात ठेवी. ती परत घरीं आली तर वत्सला तुळशीजवळ उभी राहून मुळूमुळू रडते आहे.—म्हणजे तिलाहि पत्ता लागला नव्हता.

जगन्नाथाच्या आईला कळेना, कीं पोरगा गेला कुठें ! कुठें झाडावर चढून पडला असेल का ? कुठें नदीनाल्यांत उतरला असेल का ? कुठें देवचारानं पळवला, लपवला असेल का ?......तिला नाना कुशंकांनीं घेरलें. तिचें चित्त सैरभैर झालें. भावजी पडवींतल्या सोप्यावर उताणा पडून वामकुक्षी घोरत होता, त्याला तिनें निरुपायानें उठवलें. तो डाव्या तळव्यावर उजवी बुक्की मारून कपाळावर आठ्या चढवीत म्हणाला.

" आतॉं मी कुठें म्हणून शोधूं त्यॉंला ? जाणाराच्या दहा वाटा—छेः ! आफतच आली. "

" गांवांत चला. शेजाऱ्यापाजाऱ्यांना गोळा करा. त्यांची मदत घ्या. पुरुषासारखे पुरुष तुम्ही— "

" मी गांववाल्यांचं तोंडसुद्धा पाहणार नाहीं. "

त्याच वेळीं तुळशीवृंदावनाच्या आडून वत्सलेनें भावजीच्या नांवानें कडाकडा बोटें मोडलीं. म्हातारीला जांवयाचा अंदाज लागला. ती उठून दामूआण्णाच्या घराकडे धावली. तिला माहीत होतें कीं, प्रसंगीं पोचेल तर तो दामूआण्णाच ! ती तिथें पोंचते तों गणप्या, मोऱ्या, रामनाथ वगैरे बरेच गांवकरी दामूआण्णाच्या पडवीवर जमून जगन्नाथाच्या नाहींसें होण्याचीच चर्चा करीत होते. दामूआण्णा त्यांना सांगत होता.

" प्रहर दिवशीं माझ्याकडे आला होता तो. मला म्हणाला, 'मी ग्रामत्याग करून जातों.' मीं म्हटलं, जातोस तर जा. नाहीं तरी घरांत तुला कोण विचारतंय ! सासूला जांवई आहे भला भक्कम..."

जगन्नाथाच्या आईनें ते शब्द ऐकले. किंबहुना, तिनें ते ऐकावे म्हणूनच दामूआण्णा बोलला होता. ते तिच्या वर्मावर पडले. ती अंगणांतच बसकण घेऊन दामूआण्णाला म्हणाली.

" मागचं आतां काढूं नको. आधीं माझ्या पोराचा शोध लाव."

" सांग कीं तुझ्या जांवयाला. तो शंभर माणसं आणून उभीं करणार होता ना तुझ्या दारांत ? तुला गांववाले काय करायचे आहेत ? "

" असं नको रे म्हणूं ! "

" नको कसं ! आम्हीं सर्वांनीं तुझ्या घरीं येणं-जाणं नि अन्नोदक वर्ज्य केलं. एकदा तरी विचारायला आलीस का, कीं 'बाबांनो, आमच्या घरावर हा बहिष्कार कां ?' तुझं कर्तव्य होतं का नाहीं ? पण तुला चढला होता जावयाचा माज. आपला जावई शहाणा, कायदेपंडित, बोलका बृहस्पति—तो काय आपल्यावर आपत्ति येऊं देतो, असं तुला वाटत होतं. गांवानं वाळीत टाकल्यामुळें आपल्या चारचौघांतल्या पोराला काय यातना होत असतील याचा कधीं तरी विचार केलास का ? कां त्यानं पळून जाऊं नये ? मी म्हणतों, बरं झालं ! जाईल तिथें सुखी तरी होईल तो......"

जगन्नाथाच्या आईला दामुआण्णाचा तो भडिमार सहन होईना. ती ओक्साबोक्शीं रडूं लागली. 'काय चुका झाल्या असतील त्या पदरांत घ्या ; पण माझ्या पोराला परत आणा...' तिनें रडतां रडतां काकुळत्या सुरू केल्या.

" हें बघ. गांवांत कलागती लावणारा, दुहीचे सुरुंग पेरणारा, तुझा कर्कोटक जावई घरांतून निघाल्याशिवाय आम्ही कोणीहि कान हालवायला तयार नाहीं !"

" पण मी माझ्या तोंडानं कसं सांगूं त्यांना ? "

" मग आम्हीं सांगतों. नव्हे ; घालवतोंसुद्धा. आणि तुझा मुलगाहि शोधून आणतों. आहे कबूल ? "

" आहे. काय हवं तें करा. पण घराचा खांब घराला लागूं दे ! "

लगेच दामूआण्णा शेजाऱ्यांना म्हणाला. ' गणप्या, मोऱ्या, रामनाथ, उठा रे.' सगळे उठले आणि दामूआण्णाच्या मागोमाग जगन्नाथाच्या पडवीवर गेले. भावजी जानव्याची माळ करून संथपणें विडी वळीत बसला होता. त्याला दामूआण्णानें म्हटलें.

" काय भावजी ! फक्त विड्याच वळीत बसायचं का ? एवढा मोठा मेहुणा घरांतून परागंदा झाला. त्याचं कांहीं— "

" मग तुम्ही गांवकरी, शिमशेजारी आहांत ते कशाला हो ? "

" आम्ही आहोंत ते तुला घालवायला ! "

" तें ठाऊक आहे मला. पण घर माझ्या सासूचं आहे. तुम्ही कोण मला घालवणार ! "

" तें मग पाहूं. तूं ऊठ. कपडे कर. आमच्या मुखानं सासूच तुला सांगते आहे असं समज. "

" मी बरा जाईन ! इथल्या अर्ध्या इस्टेटीवर माझ्या बायकोचा म्हणजे पर्यायानें माझा हक्क आहे. हें अर्धं घर माझं आहे ! "

" ऐक जगूच्या आई ! या तुझ्या बृहस्पतीचे पोटांतले पाय आतां तरी दिसले का तुला ? ' जावई माझा भला ' म्हणत होतीस ; पण त्याचा मुदलावर डोळा होता, हें आतां तरी लक्षांत आलं का तुझ्या ? " दामूआण्णानें विचारलें.

" त्यांत काय झालं ? कायदा बोलतो आहे तसं. " भावजी निगरगट्टपणें म्हणाला.

" कायदा राहिला कोर्टात. पण तूर्त तूं इथून निखळ ! गणप्या, मोऱ्या, तुमची ताकद बघूं दे आज मला. या भावजीचं हें चुरमुऱ्यांचं पोतं इथून उचला अन् वहाळापलीकडे गांवाच्या सीमेबाहेर फेकून द्या. "

" तें काम आमचं. " ते दोघेहि उठले.

भावजी काय समजायचं तें समजला. त्यानें हातांतली विडी टाकली अन् खोलींत जाऊन कपडे चढवले. पाठोपाठ साध्वी आक्काबाईनेंहि गंगा-यमुना

वाहवीत गांठोडें बांधलें. जगन्नाथाची आई हें सगळें अगतिकपणें पहात होती. तिला आपल्या मुलीची करुणा येत होती. पण प्रकरण तिच्या हाताबाहेर होतें. त्या दोन तासांत जांवई मात्र तिच्या मनांतून पुरता उतरला होता.

भावजीनें पाट ओलांडून पलीकडे गेल्यावर घराकडे तोंड करून म्हटलें, 'याचं उट्टं न काढीन तर त्या बापाचं नांव सांगणार नाहीं!' त्याला कोणीं प्रत्युत्तर दिलें नाहीं. सगळे खो खो हसले मात्र. आई लेकीला चार पावलें पोंचवून परत आली. पोरगी तिच्या हातची गेली होती. आणि पोरगा मात्र अजून हाताला चढायचा होता.

पाठोपाठ सगळे गांवकरी पांगले. एका तासाच्या आंत दामूअण्णा जगन्नाथाला घेऊन घरीं आला. बाकीच्या सगळ्या शोधकांना कुकारे पडले. तेहि इकडून तिकडून तिथें जमले. आईचा जीव भांड्यांत पडला. वत्सलेनें आळवलेले सगळे देव तिला पावले.

"होतास कुठें बाबा तूं? केवढी धोंड आणली होतीस आमच्या उरावर!—" आईनें विचारलें.

"काय सांगूं तुला आई! गांवचा देवचार वाठारी! त्यानं मला अलगद उचललं आणि वायंगणाच्या मधल्या पाळंदीच्या तोंडावर तें सातिवणाचं झाड आहे ना, त्याच्या टेकशींत नेऊन बसवलं. भावजी अन् आक्का त्या पाळंदींतून जातांना मला दिसलीं. मी हाका मारूं लागलों तर शब्दच उमटेना बघ. तीं दोघं जेव्हां पायवाट सोडून मोठ्या रस्त्याला लागलीं, तेव्हां मला त्या वाठाऱ्यानं खालीं उतरून ठेवलं. जसं चढवलं तसं उतरलं."

"काय आश्चर्य आहे!" गणप्या म्हणाला.

"आश्चर्य कसलं त्यांत! वाठारी असले प्रकार लीलेनें करतो." चिंतोबा अधिकारवाणीनें म्हणाला.

"म्हणजे याचा अर्थ असा कीं, भावजी या गांवांत राहिला आहे, हें वाठाऱ्यालासुद्धां मान्य नव्हतं." रामनाथानें भाष्य केलें.

"तें जाऊं दे. जगूच्या आई, तुमच्या घरावरचा बहिष्कार उठला. आतां दिवाळी जवळ आली आहे. यंदा पायलीचे पोहे अधिक कांड. या वर्षी दिवाळीचं

पहिलं पोहेखाणं तुमच्या घरीं. कळलं ?" दामूअण्णानें उठतां उठतां समारोप केला.

थोड्या वेळानें सासू जरा डोळ्यांआड झाल्यावर वत्सला जगन्नाथाला म्हणाली.

"देवचारानं झाडावर चढवून ठेवलं काय ? खोटारडे कुठले !"

"खरं असो, खोटं असो. तुझ्या माझ्या मागची ती ब्याद तरी टळली ना !"

"टळली खरी; पण एक प्रहर इथें माझ्या अंत्रमाळा उडाल्या."

"बरं झालं. नवऱ्याची किंमत आतां कळेल तुला !"

"तें ठीक; पण बायकोची किंमत तुम्हांला केव्हां कळायची ?"

"ही, आतांच—". म्हणून जगन्नाथ चार पावलें पुढें सरकला आणि वत्सलेनें हळूच दार आड करून त्याला अडवलें.

★ ★ ★

# बळि

शंभुरावानें गड्याला माडीवरून कपडे आणायला सांगितलं. गड्यानें तें काम लगबगीनें केलं असतांहि तो त्याच्यावर कावला. धोतराचा पुढचा सोगा वर खोचतांना त्याला नेहमींइतके पिळे आले आहेत का नाहींत, याकडे त्यानं लक्ष दिलं नाहीं. कोटाची इस्त्री ठीक आहे का बिघडली आहे, हेंहि पाहिलं नाहीं. त्यानें टोपी डोक्यावर कशीतरी ठेवली. गड्यानं पुढं केलेली विजेरी खस्‌दिशीं डाव्या खिशांत कोंबली. वहाणा पायांत सरकवतां सरकवतांच खिशांतलं पाकीट बाहेर काढून त्यांत पुरेसे पैसे आहेत कीं नाहींत हे पाहून घेतलं. आणि अशा धुसमुसत्या अवस्थेंतच तो घराबाहेर पडून वाटेला लागला. तो कुठें जातो अन् कधीं परत येणार हें त्या वेळीं त्याला विचारणं म्हणजे आगींत तेल ओतण्यासारखं होतं. तो म्हार्दोळच्या जत्रेला अथवा पणजीला जात असेल अशी घरच्या माणसांनीं कल्पना करून घेतली.

तो असा अचानक निघून गेल्यामुळें कुणाला हायसं वाटलं असेल, तर तें गीतेला ! आतां तिला उरलेली संध्याकाळ अन् सगळी रात्र एकटं रहायला मिळणार होतं. एकांतीं बसून तिला आपल्या व्यथा-वेदनांचा परामर्श घेतां येणार होता. नवऱ्याचा शंकेखोर स्वभाव लग्न झाल्यापासूनच तिला जाणवूं लागला होता. अधिक परिचयानें तो कमी होईल, अशी तिची समजूत होती; पण तो कमी न होतां वाढीलाच लागला होता. त्यानं तिला वागणंच नव्हे, तर जगणंहि असह्य करून टाकलं होतं. अपमान म्हणजे मरण असं जर मानलं, तर ती त्या घरांत असंख्य मरणं मरत होती. पण असल्या मरणाचं शंभुरावाला सुतक लागत नव्हतं ! आपल्या कोणत्या कृतीचा कोणता अन्वयार्थ तो लावील, हें तिला कळत नव्हतं आणि तिच्या पोटांत सारखी धाकधुक रहात होती.

सासुरवाशिणीनें माहेरीं जाण्याची इच्छा करणं यांत तरी कांहीं पाप आहे का ? पण शंभुरावाला त्यांत तसं वाटलं होतं. त्यावरूनच थोड्या वेळापूर्वी केवढा फार्स केला होता त्यानें ! गीतेचा भाऊ त्या दिवशीं तिला माहेरीं न्यायला आला होता. उगाच अन् सुखासुखी नव्हे; तर घरांत तिच्या धाकट्या बहिणीचं लग्न निघालं होतं म्हणून. गीतेला खूप आनंद झाला होता. चार दिवस चार

मंडळींत राहतां येईल, बहिणीचं कौतुक करतां येईल, नित्याचीं सळं-कुसळं चार दिवस विसरतां येतील. अन् येतांना आईच्या कुशींत रिगून भारावलेलं मन हलकं करतां येईल, या मनोराज्यांत ती वावरत होती.

पण शंभुरावानं तिला पाठवण्याबद्दल मेव्हण्याला चक्क नकार दिला. 'आम्ही दोघं लग्नाच्या दिवशीं सकाळीं अक्षता टाकायला येऊं अन् संध्याकाळीं परतूं,' असं त्यानें त्याला सांगितलं. त्या उत्तरानें गीतेच्या एकदम डहाळ्या पडल्या. तिचं तोंड उतरलं. भावाला तें बघवेना. त्यानें शंभुरावापाशीं हट्ट धरला. धरणं धरल्यासारखं केलं. शंभुरावानें वस्तुतः मेव्हण्याचं कौतुक करायचं. बहिणी-वरल्या त्याच्या मायेची जाण दाखवायची. आपला निर्णय बदलायचा. पण त्यानें केलं तें अगदीं वेगळं.

"मूर्ख आहेस तूं. माझ्या बायकोनें केव्हां जायचं, किती दिवस रहायचं, तें मी ठरवीन. तूं आगाऊपणा करूं नकोस! मुकाट्यानें परत जा."

गीतेच्या भावाला तो अपमान सहन झाला नाहीं. त्यानें शंभुरावाला तितकंच तिखट उत्तर दिलं. त्यावर शंभुराव अधिकच खवळला. अन्योन्यविन्य बोलत सुटला. भाऊ तोंडास तोंड करूं लागला. मेव्हण्या-मेव्हण्यांचं कुरुक्षेत्र जुंपलं. गीतेनं हात जोडून भावाला बाजूला केलं म्हणून ठीक; नाहींतर तें प्रकरण कोणत्या थरावर गेलं असतं देव जाणे! 'पुन्हा तुझ्या घराची पायरी चढणार नाहीं!' असं शंभुरावाला बोलून भाऊ त्या घरांतून चालता झाला आणि त्याच्यामागून शंभुरावनेंहि तो राग निवण्यापूर्वींच घर सोडून कुठेंतरी प्रयाण केलं.

शंभुरावाची पाठ वळतांच गीता आपल्या शयनगृहांत गेली आणि तिनें पलंगा-वर आपली काया झोकून दिली. डोक्यावरून पांघरूण ओढून घेतांच तिला हुंदका फुटला. भरल्या घरांत तिचं अरण्यरुदन सुरू झालं.

पण असं तरी कां म्हणावं! ती विद्या होती कीं त्या घरांत. आपली माई अलीकडे नेहमींच कां कष्टी असते, हें तिच्या बालबुद्धीला कळण्याजोगं नसलं तरी आजचं तिचं दुःख तिला कळलं होतं. बापानें तिच्यादेखत तिच्या माईचा अपमान केला होता अन् त्याचा चिमटा तिच्याहि अंतःकरणाला बसला होता.

ती हळूच गीतेच्या खोलींत शिरली अन् पलंगापाशीं आली. गीतेच्या देहाचं मोटळं पांघरुणाच्या आंत कसं गदगद हालतं अन् उमसतं तें तिनें एखाद्या काष्ठ-

पुतळीप्रमाणें जवळ उभं राहून थोडा वेळ पाहिलं. मग तिला राहवलं नाहीं. ती आणखी दोन पावलं पुढं गेली आणि तिनें आपला गोंडस हात हळूच पुढं केला. तिच्या चादरीची कड चिमटींत धरून ती वर ओढली. थोड्या बळांत ती ओढली जात नाहीं असं पाहून अधिक जोर केला, तेव्हां तिथले दोन डोळे विद्येच्या नयनतारकांवर स्थिर झाले.

मग विद्येनें हांक मारली, " माई ग ऽ ! "

अमृतानं ओथंबलेली ती मंजुळ हांक गीतेच्या हृदयांत खोलपर्यंत शिरली. तिनें ' ओ ' म्हटलं नाहीं. फक्त आपला हात पुढें केला अन् तिला पलंगावर ओढली. तिला पोटाशीं घेऊन तिच्यावरून पांघरूण लपेटलं. दोघींची मिठी पडली. तिचा कोवळा देह गीतेच्या हृदयाशीं गोळा झाला. गुबरा गाल नितळ गालावर टेकला. वरच्या गंगा खालच्या नेत्रकुंडांत झिरपल्या. करुणरस खरा; पण त्याचीच गोड वडी पडली. गीतेच्या दुःखाच्या ढगाला सुखाची सोनेरी झांक आली. हेंच सुख, हाच बालजीवाच्या मिठीचा आनंद; पण तो हक्काचा, आंतडयाला पीळ घालून काळजाला ऊब द्यायला आलेला असा तिला हवा होता. त्याच्याच-साठीं ती आसुसली होती.

लग्न होऊन गीता त्या घरीं येतांच हीं पांच मुलं तिच्यापुढं धावून आलीं. दोन मुलगे आणि तीन मुली. मुलगे मोठे अन् मुली लहान. क्रमानें पाठीला पाठ लावून आलेल्या. विद्या त्या सर्वांत धाकटी. कुण्यातरी नातेवाईक आजी-बाईनें गीतेला, त्या वीस वर्षांच्या नव्या नवरीला सांगितलं.

" हीं सगळीं तुझींच मुलं हो ऽ ! "

गीता कांहीं बोलली नाहीं त्यावर, पण तिचं मन म्हणालं, ' हीं मुलं खरीं पण साक्षात् माझीं नव्हेत. माझं मूल अजून यायचं आहे. पोटच्या गोळ्याची सर यांना नाहीं येणार ! '

मुलगे मोठे होते ते गीतेपासून दूरदूरच रहात होते. शंभुरावाची त्यांना तशी सक्त ताकीद होती. मुली जवळ जाऊं पाहत; पण बुजत. भोंवतीं घोटाळतांना तिच्या मुद्रेवरचे भाव निरखीत. तिच्या डोळ्यांत आईची माया दिसते का पहात.

गीता त्या घरांत आल्यापासून त्या मुलींच्या मनांत एक नवी आशा निर्माण झाली होती. गीतेच्या सौम्य-शीतल मुद्रेनें आणि तिच्या कमालीच्या मधुर

आवाजानें ती निर्माण केली होती. विद्या दिवसेंदिवस तिच्याकडे अधिकाधिक ओढली जात होती. मोलकरीण बखोटीला धरून न्हाणीघराकडे नत असतां एक दिवस ती तिच्या हातून सुटून गीतेकडे धावत आली अन् म्हणाली, ' माई ग ! मला आज तूं न्हायला घालशील ?'

गीता ' घालीन ' म्हणाली अन् उठली. न्हाणीघरांत हंडाभर पाणी तापून तयार होतं. तिचे चिकट केस हलक्या हातानें चोळून तिच्या गोऱ्या सुकुमार, अनावृत देहाला आपादमस्तक न्हाणून काढतांना गीतेला एक अपूर्व सुख वाटलं. तेव्हांपासून विद्या सर्वस्वीं गीतेची झाली. तिला वाटलं, ही आपली आईच आहे. हिला माई म्हणायचं तें उगाच लोक सांगतात म्हणून.

शंभुरावानं हें लग्न गुपचूप केलं असलं तरी तें गांवांत अन् आसपासहि बरंच गाजलं होतं. तो सगळीकडे एक मोठाच चर्चेचा विषय झाला होता. पूर्वीचा एवढा पोरवडा असतांना चाळिशीच्या घरांत आलेल्या शंभुरावानें पुन्हा बाशिंग बांधावं हें कुणालाच पसंत पडलं नव्हतं. हें एका मुलीची मान चिरण्यासारखं आहे, असंच सगळ्यांना वाटत होतं.

पण मुख्य प्रश्न होता तो गीतेला काय वाटत होतं त्याचा. कारण या लग्नानें शंभुरावाशीं बांधली गेली होती ती तीच ! गृहप्रवेश झाल्यावर मोठ्या ऐटींत त्यानें तिला दाखवलं होतं, सांगितलं होतं, ' हा दागिन्यांचा करंड, हें उंची वस्त्रांनीं भरलेलं कपाट, हें सजलेलं शयनगृह, ही कोठी, हे नोकरचाकर, हा सगळा व्यापक प्रपंच—याची धनीण आतां तूं ...अन् ... अन् आमच्यासुद्धां स्वामिनी आपणच... अं ! पाहूं कळी उमलली का ?' पण गीतेला त्या घराचा धनीणपणा आपणांकडे आला आहे असं आजतागायत वाटत नव्हतं ! ती उल्हासितहि नव्हती अन् विषण्णहि नव्हती. जें जिवाला जडलं त्याच्याशीं बिनतक्रार जमवून घ्यायचं तिनें ठरवलं होतं. जिवाचा जोडीदार म्हणून शंभुरावावर प्रेम करणं तिच्या आवांक्याबाहेरचं होतं. पण ती त्याचा तिरस्कारहि करणार नव्हती. आईचे शब्द तिला आठवत होते–' प्रथम कांहीं दिवस अवघड वाटेल. पण उद्यां दोन मुलं झालीं कीं मग रुळशील आपोआप. ' ती तेच शब्द मनांत घोळवीत राहिली होती. ते खरे होण्याच्या दिवसाची प्रतीक्षा करीत राहिली होती.

शंभुराव तिला वाजवीपेक्षां अधिक जपे. ती कांहींतरी निराळ्याच जातीची जपणूक होती. ती कुठें बसली, कुठें उठली, कुठें गेली, कुणाशीं बोलली, या सर्व गोष्टींकडे

त्याचं बारीक लक्ष असे. तो शक्य तेवढो तिला आपल्या नजरेखालीं ठेवी. कुठल्याहि समारंभाला जातांना तो तिला बरोबर नेत नसे. घरीं कुणी पै-पाहुणे आले, तरी तिनें त्यांच्या दृष्टीस पडूं नये, अशी शिस्त त्यानें ठेवली होती. गृहलक्ष्मी खरी; पण अशा वेळीं सात पडद्यांआड. त्या घरांतला एक भाग तिच्यासाठीं नेमून दिलेला होता. शेजघर, स्वैपाकघर अन् परसदार! तेवढ्यांत तिनें वावरायचं. घरांत आल्यागेल्याची केवढीहि वर्दळ असो; तिनें कुणाला वाढाविढायचं तर नाहींच; उलट चोरासारखं चुलीजवळ बसून गिळायचं.

गीतेनें शंभुरावाशीं बिनतक्रार मिळतंजुळतं घ्यायचं ठरवलं होतं. पण त्यानेंच तिला ती गोष्ट अशक्य करून टाकली. आपल्या पडदानशीनपणाचा तिला विलक्षण तिटकारा येऊं लागला. त्याला जाब विचारायची सोय नव्हती. म्हणून मग ती स्वतःलाच डाफरून विचारूं लागली —

'हें असं कां? नांदत्या घरांत मलाच ही बंदिशाळा कां? तूं ह्या घराची मालकीण म्हणून हे मला सांगतात. पण मालकिणीनें काय घालतील तें खाऊन नुसती पलंगसवाशीणच बनायचं का? आमच्याच घरांत ही मुलखावेगळी तऱ्हा कां? काय डांचतंय् यांच्या मनांत! तरण्या बायकोची एवढी लाज वाटे, तर लग्न कशाला केलं यांनीं? यांची बायको होण्याचा गुन्हा केला, म्हणून का मीं ही नजरकैद भोगायची?...'

पण गीतेची ही तडफड शंभुरावाच्या कानांपर्यंत पोंचत नव्हती. तिच्या मुद्रेवरची स्पष्ट-अस्पष्ट नापसंती जाणवेल, इतकं त्याचं मन संवेदनाशील नव्हतं. तिचे निःश्वास त्याच्या काळजाला झळा लावीत नव्हते. तिच्या भावना समजून घ्यायच्या, आवडीनिवडी पुरवायच्या, तर त्याला आपलं धोरण गुंडाळून ठेवावं लागणार होतं. तिला मग थोडीबहुत मोकळीक देणं भाग होतं. आणि तेंच त्याला नको होतं. त्या बाबतींत तो पाषाणाची खोळ घेऊन बसला होता.

एक दिवस परसदारच्या न्हाणीघरांत गडी वावरत होते. पाटाचं पाणी तिथें नित्य ओझरत राहावं म्हणून पोफळीची पन्हळ पाटाला जोडून आंत आणण्याचं त्यांचं काम चालू होतं. गीता तिथें उभी राहून पन्हळ नेमकी कुठें पडावी म्हणजे ती सोयिस्कर होईल, हें त्यांना समजावून सांगत होती. इतक्या वर्षांनीं नवी मालकीण आपल्याशीं बोलायला आली म्हणून ते गडी कुतूहलानें तिचं बोलणं

ऐकत होते. एवढ्यांत शंभुरावानें डोळे मोठे केले. तिला अपमानित होऊन घरांत जावं लागलं. तो गड्यांवरहि घसरला हें तिनं जातां जातां ऐकलं.

दुसरा प्रसंग तर याहून जिव्हारीं भिडणारा होता. तिचा एक भाऊ आणि त्याचे दोघे मित्र तिच्या घरीं आले होते. तिसऱ्या प्रहरची वेळ होती. शंभुराव घरीं नव्हता. गीतेला साहजिकच जरा मोकळं वाटत होतं. तिनें चहाचा सरंजाम मांडला होता. सगळीं जणं त्याच्याभोंवतीं मंडळ करून बसलीं होतीं. माहेराकडच्या गप्पांना रंग भरला होता. हास्याचे कल्लोळ उठत होते. गीतेचा आत्मा फुलून आला होता. लग्न होऊन आल्यापासून माहेराचं तोंड पाहूं न शकलेली गीता त्या संभाषणांत रमली होती.

पण अचानक उगवलेल्या शंभुरावानें त्या खेळीमेळीला ग्रहण लावलं. बसलेल्या मंडळीकडे एक जहरी कटाक्ष टाकून तो सुसाट माडीवर गेला. वर पोंचतो न पोंचतो तोंच त्याची हांक गरजली, “ विद्या ! ”

विद्या गीतेच्याजवळ बसली होती. तिची जीभ एकदम टाळूला चिकटली. तिनं कसंबसं ‘ ओ ’ म्हटलं.

“ तिला वर यायला सांग ! ”

चाबकाचा फटका बसावा तशी गीता उठली. खालच्या मानेनें जिना चढली. माडीवर भ्रुकुटिभंग करून शंभुराव उभा होता. ती भयचकित रमणी पुढें आलेली पाहून तो तिरसटपणानें बोलला —

“ या घरची रीत वेगळी आहे. असं आल्यागेल्याशीं मिसळणं-खिदळणं इथें मंजूर नाहीं. जा, आपल्या खोलींत जाऊन बस. ”

गीता पुन्हा त्या बैठकींत परतूं शकली नाहीं. जातेवेळीं भावाला तिचा निरोप घेतां आला नाहीं. एका गृहलक्ष्मीचा तो अपमान होता. एका व्यक्तीच्या वाजवी स्वातंत्र्यावर तो घाला होता. असं कांहीं घडलं कीं गीतेला वाटे, याचं तोंडसुद्धां पाहूं नये.

पण तो तिचा नवरा होता. आपल्या सुखासाठीं तिला हवं तसं वाकवण्याची सत्ता त्याला पुरुषीपणानें दिली होती. त्याच्या प्रतिकाराला, त्याला सरळ करायला असमर्थ ठरलेली गीता मग स्वतःवरच चडफडूं लागे. ही अपमानाची आग

तिलाच आंतल्या आंत जाळूं-भाजूं लागे. विद्येचे अश्रु ती शमवायला पुरे पडत नसत. तिची लाडीगोडी गीतेचं तप्त मस्तक शांत करूं शकत नसे. पण कित्येकदा तिला असं मात्र वाटे कीं, विद्या म्हणजे या घरांत, नव्हे या बंदीखान्यांत आपल्याला फार मोठा आधार आहे. देवा, मला मूल देशील तें हिच्यासारखं लाघवी अन् जीव लावणारं असं दे ...

तीन वर्षं त्या घरांत गीतेनें काढलीं. पण अजून ती रुळली नव्हती. अजून संकोच अन् भय मोडलं नव्हतं. तिला कसलाहि स्वतंत्र अधिकार मिळाला नव्हता. ती त्या चार भिंतींत दिवसेंदिवस कोमेजत चालली होती. शंभुरावाच्या सावटांत तिच्या जीवनाचं रोपटं खुरटत चाललं होतं. जी आशा तिच्या हृदयांत, तिच्या अणुरेणूंत घर करून राहिली होती, तिच्या पूर्तीला अजून कुठेंच ठावाठिकाण नव्हता. जी गोड चाहूल तिला ऐकायची होती, तिचा ती कानोसा घेई. प्रत्येक महिन्याला, प्रत्येक पाळीला. पण तिच्या पदरांत पडे ती निराशाच !

तिला वाटलं, ‘ आपण सर्वावयवीं अव्यंग आहोंत; मग असं कां व्हावं ? वेलीला फळ कां धरूं नये ? कुणीतरी दुष्ट ग्रह आडवा पडला असेल. घराण्याची कांहींतरी देवदेवस्की राहिली असेल. ’

आणि मग स्वतःच्याच मतानें ती उपासनेच्या मार्गाला लागली. तिनें संकष्टीचा उपवास धरला. शनिवारीं एकभुक्त उपोषण पत्करलं. बाहेर जाऊन पिंपळाच्या झाडाला प्रदक्षिणा घालणं तिच्या हातचं नव्हतं; म्हणून तिनें आपल्या खोलींतच गुरुचरित्राची पोथी पाटावर मांडून तिला नित्य प्रदक्षिणा चालू केल्या.

थोड्याच दिवसांत शंभुरावाच्या हें निदर्शनाला आलं. तो अस्वस्थ झाला. ती पैसे खर्च करीत नव्हती. त्याच्या खिशाला तोशीस लावीत नव्हती. मग तो काय बोलणार होता तिला ? अन् कुठल्या तोंडानें बोलणार होता ? ती हें सगळं कां करते, हें मनोमन ठाऊक असूनहि एक दिवस त्यानें एकांतीं तिला विचारलं.

“ कशाला तूं ही देहदंडना करतेस ? तुला या घरांत काय कमी आहे ? ”

गीता कांहींच बोलली नाहीं. असल्या नाजूक गोष्टी काय तोंडानें उच्चारायच्या असतात ? त्या दुसऱ्यानं न सांगतां जाणून घ्याव्या. पण त्यानें तिचा किंचित् कृश झालेला हात हातांत घेऊन पुन्हा तेंच तिला विचारलं.

मग तिनं खालच्या मानेनं हळूच उत्तर दिलं, ' माझ्या दृष्टीनें पहावं एकदा. म्हणजे काय कमी आहे तें आपल्यालाच कळेल. '

" तें कळलं आहे मला. अन् म्हणूनच मी म्हणतों, जीं पांच मुलं आहेत तीं तुझींच नाहींत का ? "

" आहेत कीं. मी कुठें नाहीं म्हणतें ? पण त्यांतच एखादं सहावं आलं तर तें जड होईल का ? "

" जड नाहीं होणार; पण अधिकाची इच्छाच कां ? "

" बायकांच्या जन्माला आल्याशिवाय नाहीं तें कळायचं. "

नाजूक पण जाणवणारा फटकारा होता तो. शंभुरावाला तो निमुटपणें सोसावा लागला. त्यानें सोंग केलं खरं; पण झोंप कांहीं लवकर त्याच्या डोळ्यांना शिवेना. गीता शेजारीं नसती, तर कदाचित् ती आली असती. त्या तपस्विनीच्या हृदयांतली आग त्याला भाजीत होती. मातृत्वाच्या साक्षात्कारासाठीं जीव गहाण ठेवायला निघालेली ती स्त्री, केवळ जवळिकेनेंच त्याच्या अंतराची तगमग करीत होती.

सहा महिन्यांत तिनें गुरुचरित्राला लक्ष प्रदक्षिणा संपवल्या. आतां तिला त्या व्रताचं उद्यापन करायचं होतं. उद्यापनावांचून व्रताला श्रेय नाहीं, सुफळता नाहीं, हें तिला ठाऊक होतं. त्यासाठीं कांहीं होमहवन करावं लागणार होतं. दत्तात्रेयाची सुवर्णमूर्ति करून तिची महापूजा करावी लागणार होती. ब्राह्मण-सुवासिनी याना भोजन घालावं लागणार होतं. शें-दोनशें रुपयांचा खर्च होता; पण शंभुरावाच्या ऐपतीला तो मुळींच जड नव्हता. गीतेनं त्याची योजना आंखली अन् एका रात्रीं त्याच्या कानांवर घातली.

पण त्याचं उत्तर आलं तें मात्र तिच्या अपेक्षेच्या उलट !

" माझा असल्या थोतांडावर मुळींच विश्वास नाहीं. "

तुकडा मोडून दिल्यागत एवढं वाक्य बोलून त्यानें मान वळवली. तो झोपला होता अन् गीता त्याच्याजवळ बसली होती. त्याची ती उडवाउडवी ऐकून ती विरमली. तिला राग आला खरा; पण तरीहि तिनें नेमस्तपणा सोडला नाहीं.

" असं काय बरं ? माझ्यासाठीं एवढंहि करणार नाहीं का ? " तिची मूळचीच गोड वाणी कशी मधांत बुडून बाहेर येत होती. एखाद्यानं सर्वस्व अर्पावं असं

तिच्या वैखरींत सामर्थ्यं होतं. शंभुरावाला त्याची प्रचीति येत होती. पण तो दूषित झाला होता. त्यानें तिच्याशीं केलेलं वर्तन सद्धर्माचं नव्हतं. एका अविचारांतून दुसरा अविचार, दुसऱ्यांतून तिसरा—असा तो घसरगुंडीला लागला होता.

‘ उगाच मला सतावूं नको. माझा असल्या व्रतवैकल्यांवर विश्वास नाहीं. ’ हें जें त्यानें गीतेला उत्तर दिलं, तेंहि या अविचाराचंच द्योतक होतं.

“ कधींपासून विश्वास नाहींसा झाला ? ”

“ म्हणजे ? ”

“ म्हणजे असं कीं, या घरांत सगळे देवधर्म यथासांग चालत होते, आपण त्यांत भाग घेत होतां, हें मला कळलं आहे. विद्येच्या आईचीं उद्यापनं याच घरांत आपण केलीं आहेत. धाकट्या मुलाची मुंज केलीत, तेव्हां त्याचबरोबर आंतोडांतल्या पिंपळाचीहि मुंज आपण तिच्या सांगण्यावरून बांधलीत, हेंहि मीं ऐकलं आहे. मग माझ्याशींच कां एवढं निसुकपण ! तिच्याच जागीं आपण मला आणली आहे ना ! ”

पण शंभुरावाकडे त्याचं समर्पक उत्तर नव्हतं. म्हणून तो लगेच चिडून म्हणाला —

“ माझं डोकं उठवूं नकोस. मीं तुझं उद्यापन करणार नाहीं. ”

“ मी वांझ राहिलें तरी चालेल, असाच त्याचा अर्थ ना ! ”

“ हो, असाच. अगदीं अस्साच. तूं वांझच राहणार आहेस ! ”

“ हात जोडतें तुम्हांला. रात्रीच्या प्रहरीं मला शापूं तरी नका. काय व्हायचं असेल तें माझ्या नशिबानें होऊं दे ! ”

गीतेनें ती रात्र तळमळत घालविली. शंभुरावालाहि स्वस्थ झोप लागली नाहीं. एक विलक्षण दुरावा त्या दोघांमध्यें उत्पन्न झाला. आपण दुसऱ्या लग्नाच्या फंदांत पडून गाढवपणा केला, असं शंभुराव म्हणत होता, कीं दुसरं कांहीं कल्पीत होता देव जाणे ! पण गीता मात्र म्हणत होती. ‘ हा संसार नव्हे; हें असिपत्रवन आहे ! ’

गीतेच्या व्रताचं उद्यापन झालं नव्हतं. तें अर्धवट उरलं होतं. त्याला श्रेय नव्हतं, फळ नव्हतं. तिची आशा सुकली होती. ती आयुष्यांतला एकेक दिवस ढकलीत होती. असेच पंधरा दिवस तिनें ढकलले आणि एक दिवस तिचा नूर पालटला. प्रसन्न मनानें ती उठली आणि आधीं देवघरांत गेली. तिनं देवापुढं मस्तक टेकलं. गेले आठ दिवस तिला कांहींतरी निराळं वाटत होतं. कसली तरी मधुर आशंका तिच्या मनांत सारखी उठत होती. ' होय का नव्हे ' असा संभ्रम पडत होता. महिन्याच्या महिन्याला ठरलेलं जें व्हायचं, तें त्या पाळीला चुकलं होतं. आणि त्यानंतर एक, दोन, तीन असं करून तिनें पुरते आठ दिवस मोजले होते. ते उलटल्यावर मात्र तिची खात्री झाली होती. ' जें आपण नवससायास करून मागत होतों तेंच हें ! आतां शंकाच नको ! '

आणि तिचीं अष्टांगं एकदम पुलकित झालीं. डोळ्यांत निराळंच पाणी खेळूं लागलं. अंतरांत या लोकींचा नव्हे, असा कुठला तरी उल्हास भरला. तिनें विद्येला हांक मारून जवळ घेतली. विद्येचं मस्तक आपल्या हृदयावर टेकवलं.

तिनें मागच्या तळीजवळ जाऊन सोनटक्क्याचीं फुलें तोडलीं. गोठ्यांत येऊन चार दिवसांपूर्वी व्यालेल्या गायीचा गळा खाजवला. तिच्या गोजिरवाण्या वासराशीं ती थोडा वेळ बागडली. त्या दिवशीं श्रावणांतला रविवार होता. तो तिनं भक्तिभावानं पुजला. नीरांजन पाजळल्यावर तिनं त्या ज्योतींत आपल्या बाळाची जीवज्योत पाहिली. दुधाच्या बारक्या वाटीचा नैवेद्य दाखवतांना तिच्या मिटल्या डोळ्यांपुढें बिंदी-मनगट्यांचे अन् सायीसारख्या मृदु बोटांचे गोंडस हात तरळले. आज तिच्या मनांत कुणाचा राग नव्हता, तिरस्कार नव्हता, कांहीं नव्हतं. सगळ्यांचे सगळे अपराध पोटांत घालून ती निजानंदांत मग्न झाली होती.

रात्रीं शयनगृहांत जातांना तिचीं पावलं लटपटत होतीं. पण तीं भयानं नव्हे; तर ' आंतुलिया ' आनंदाच्या बळानें. ती पानाचा डबा घेऊन शंभुरावाजवळ बसली. आज तिच्या वांट्याला तो पति नसून इच्छादानी परमेश्वर होता. आजचा तिचा मनोभाव रमवण्याचा नसून सेवेचा होता. आज ती त्याची भक्त होती. पानाला चुना लावतां लावतां ती हळूच पण लाडिकपणें त्याला म्हणाली.

" तुम्हीं माझ्या व्रताचं उद्यापन केलं नाहीं ना ! नका करूं. पण देवाला माझी सेवा पोंचली. उद्यापनावांचूनच तो मला प्रसन्न झाला ! "

" म्हणजे कसा ? "

" म्हणजे कसा तें आपण ओळखा ना ! तें मी माझ्या तोंडानें कसं सांगूं ? "

गीतेच्या बोलण्यांतला ध्वन्यर्थ शंभुरावाला उमगला. अन् तो टेकून पडला होता तो ताड्कन् उठून बसता झाला. तिचे दोन्ही हात आपल्या हातीं घेऊन तो गीतेच्या अंगावर एकदम उसळला —

" काय सांगतेस तूं हें ! तुला दिवस गेले आहेत ? "

गीतेनें भयचकित होऊन नुसती होकारार्थी मान हालवली.

" शक्य नाहीं. गीता, हें शक्य नाहीं ! हा तुझा कांहींतरी भ्रम आहे....अन् भ्रम नसेल तर सरळ सरळ व्यभिचार आहे ! "

गीता थरारली अन् तितकीच उसळून बोलली, " काय बोलतां तुम्ही हें ! जिभेला हाड आहे का तुमच्या ? "

" हाड नाहीं अन् बोड नाहीं. खरं तेंच बोलतों. सांग...सांग आधीं मला. कुठें शेण खाल्लंस ? कोण हा तुझा यार ? बोल आधीं. नांव सांग त्याचं, नाहींतर चामडी लोळवीन तुझी ! "

शंभुरावानं तिचीं दोन्ही मनगटं रक्त सांकळेल इतक्या जोरानं दाबलीं. अति-क्रोधानं त्याची मुद्रा काळीनिळी झाली होती. रावणासारखा तो तिला खायला उठला होता. गीता नव्हे, तर पापांची खाण–एक कलंकित कृत्या आपल्या हातीं गवसली आहे, आतां हिला काय करूं, कसला वज्रकठोर दंड देऊं, असं त्याला झालं होतं !

गीतेला वाटलं, हें काय भलतं कुभांड ! ध्यानीं नाहीं, मनीं नाहीं अन् यांच्या अंगांत हा कालनेमि कां अन् कुठून संचारला ? यांच्या बोलण्याला कांहीं ताळतंत्र आहे का ! शीः शीः ! कसला घाणेरडा आरोप लादतात हे माझ्यावर ! तिनें दोन्ही भुजा उभारून त्या आरोपाचा इन्कार केला असता. पण तिचे हात त्याच्या हातांत अडकले होते. फक्त मान तेवढी तिच्या स्वाधीन होती. ती तिनें आडवी घातली अन् विश्वांतलं सगळं आर्त आवाजांत गोळा करून म्हटलं —

" असं काय हो लाजलावणं बोलतां ? मी अष्टौप्रहर तुमच्या डोळ्यांच्या पहाऱ्यांत असतें. अन् नसलें म्हणून तरी काय झालं ? मी कुलवंताच्या घरची मुलगी आहें. माझ्या आईनं बत्तिशीचा दिवा लावला आहे. "

" खरं बोलतेस ? आईची शपथ घेशील ? तुझ्या मंगळसूत्राची शपथ वहाशील ! "

" वाहीन, वाहीन ! विश्वांतल्या सगळ्या पवित्र अन् पूज्य वस्तूंची शपथ वाहीन. तेवढ्यानंहि विश्वास वाटत नसेल तर निखारा हातावर द्या माझ्या. तापल्या कढईतला पैसा काढ म्हणत असाल तर तोहि काढतें. पण या बाबतींत तुमचं मन साफ होऊं दे... "

शंभुरावानें एक लांब निःश्वास टाकला.

" मग गीता, तुला झालेला हा भ्रम आहे. हें 'तें' नाहीं. ही कांहींतरी शारीरिक विकृति आहे. तुला माझ्यापासून मूल होणं शक्य नाहीं. ती आशा करूं नको. विद्या जन्माला आली अन् मी लगेच त्या गोष्टीचा बंदोबस्त करून टाकला आहे. तुझी मुलाची इच्छा या जन्मीं पुरी होणार नाहीं. "

शंभुरावानं तिचा हात सोडला, अन् तोंच गीतेनं आपल्या कपाळावर मारून घेतला.

" अग, आई ऽग ऽ ऽ ऽ ! "

तिच्या तोंडून एकच चीत्कार निघाला. तिला ते शब्द वज्रप्राय झाले. दुःखावेग असह्य झाला. पलंगावरून उठून तिनें भुईवर पासल घेतली. तिचा आक्रंद चारी भिंती फोडून बाहेरच्या मुसळधार पावसांत मिसळला. शंभुरावानें पहिला घाव तिच्या चारित्र्यावर घातला होता अन् तो तिनं आपल्या आत्म-सामर्थ्यावर परतून लावला होता.

पण हा दुसरा मर्माघात ! तो तिच्या मातृत्वावर होता. तिच्या समग्र जीवनावर होता. तो तिलाच काय, पण ब्रह्मदेवालाहि परतवणं शक्य नव्हतं. या आघातानें तिचे तुकडे पाडले होते. शंभुरावानें केलेला हा तिचा जनरक्ताचा खून होता. आपल्या विषयवासनेच्या पूर्तीसाठीं केवळ संपत्तीच्या बळावर त्यानें तो केला होता. एक प्रेमळ, सुंदर, साजिरं-गोजिरं जीवन, त्यानं भोगाच्या शिळेवर बळि दिलं होतं.

गीता खऱ्या अर्थानें त्याच क्षणीं मेली होती. पण अजून काळीज जिवंत होतं. तें उडत होतं, तडफडत होतं—' नाहीं नाहीं ! असं होणार नाहीं. मी होऊं

देणार नाहीं. मला मूल झालंच पाहिजे. तो माझा हक्क आहे. मी धरित्रीला तडे जातील इतक्या मोठ्यानें बोभाईन. आकाश-पाताळ एक करून जगाला सांगेन कीं, या अधम पुरुषानें ... छेः छेः ! हा पुरुष कसला ? हा पुरुष नाहीं. हा बाई नाहीं. हा कोण आहे कोण जाणे ! अन् याची शेज मीं अंथरली. कोण ही माझ्या जन्माची विटंबना ! याला जाब विचारणारा नाहीं का कोणी या जगांत ...'

एवढ्यांत समोरच्या भिंतीवर पाल चुकचुकली. ती जणूं म्हणत होती. 'गीते, जगावर विसंबूं नको. जग तुझ्या कामाचं नाहीं. तुझा जाब तूंच विचारला पाहिजेस. तुझ्या अंगांत तेवढं सामर्थ्य असलं तर पहा. स्वाभिमानाची ठिणगी जिवंत असली तर तिच्यावर फुंकर घाल. नाहींतर या चार भिंतींत सडत कुजत मर !'

